# काळांतील निवडक निबंध

## भाग आठवा.

शिवराम महादेव परांजपे

प्रस्तावनालेखक

ज. स. करंदीकर

पुनर्मुद्रण २७ सप्टेंबर १९४६

---

कागदी बांधणी : ३॥ रुपये ] [ कापडी बांधणी : ४ रुपये

# अनुक्रमणिका



एकंदर चालू महर्गतेमुळें " काळांतील निवडक निबंधाचीं, पुस्तकें जितक्या किंमतींत द्यावयाची माझी इच्छा होती तितक्या किंमतींत देतां आलीं नाहींत. याकरितां काळांतील निवडक निबंधाचे पहिले भागांत एक सवलतीचें कूपन टाकलें आहे. सवलतीची समग्र माहितीहि त्याच खंडांत दिली आहे. ग्राहकांनीं अवश्य वाटल्यास त्याचा फायदा घ्यावा.

व्यवस्थापक

य. गो. जोशी प्रकाशन, सदाशिव, पुणें.

# निबंध-परिचय

काळांतील निवडक निबंधांचा हा आठवा भाग आहे. दशावतारांतला आठवा अवतार श्रीकृष्ण हा जसा सर्वांत सर्व दृष्टींनीं श्रेष्ठ तसा हा निवडक निबंधांचा आठवा भाग सर्व भागांत श्रेष्ठ ठरेल. या भागांत प्रसिद्ध झालेले लेख मुळांत १९०५ सालीं प्रगट झाले. हें १९०५ साल हिंदुस्थानाच्याच दृष्टीनें नव्हे, तर आशिया खंडाच्या भवितव्यतेच्या दृष्टीनेंहि, क्रांतिकारक विचारांचें बीजारोपण करणारें म्हणून नावाजलें गेलें. याच वर्षांत जपानसारख्या टीचभर क्षेत्रफळांतल्या ठेंगू शिपायांनीं रशियासारख्या बलाढ्य साम्राज्यांतील धिप्पाड, सुसज्ज व लढायांत कसलेल्या वीरांना खडे चारून शरण यावयाला भाग पाडलें आणि याच वर्षांत दर्पोद्धत कर्झनशहानें बेगुमानपणानें अमलांत आणलेल्या वंगभंगाविरुद्ध प्राणपणानें लढण्याची प्रतिज्ञा करून वंगवासियांनीं स्वदेशी बहिष्काराचें शस्त्र म्यानांतून बाहेर काढून अभूतपूर्व अशा चळवळीनें भरतखंड दणाणून सोडलें. याच वर्षाच्या शेवटीं काशीक्षेत्रांत भरलेल्या राष्ट्रीय सभेच्या व्यासपीठावरून नामदार गोपाळराव गोखले यांनीं स्वराज्याच्या प्राणप्रतिष्ठेचा चतुःसूत्री मंत्र प्रथमच उघडपणें राष्ट्राला पढविला.

१९०५ सालांतल्या या संतप्त वातावरणाची ही पार्श्वभूमि लक्षांत घेतल्यास दे. भ. शिवरामपंत परांजपे यांच्या लेखणीची धार या वेळीं कशी तीक्ष्ण बनत चालली असेल याची वाचकांस कल्पना येईल. १८९८ पासून आपली विशिष्ट लेखनशैली कमावतां कमावतां दे. भ. शिवरामपंत यांनीं या वेळीं त्या कलेंतलें परिणतप्रज्ञत्व गांठलें होतें. कोणताहि गंभीर विषय आपल्या उपरोधिक भाषेच्या कक्षेंत आणून, वरकांती रेशमापेक्षांहि मऊ भासणाऱ्या शब्दपाशांनीं प्रतिपक्षाला करकचून बांधून त्याला हैराण करून सोडण्याचें लेखनपटुत्व आतां त्यांना करतलामलकवत् सहज साध्य झालें होतें. अस्वलानें प्राणघातक मिठी घातली असली तरी त्याच्या गुदगुल्यांनीं हंसतां हंसतां मुरकुंडी वळून जीव अधिकच हैराण व्हावा तशीच स्थिति हे लेख वाचतांना प्रतिपक्षाची होत असे. सुदैवानें या वेळीं अंतःकलहाचा

विषवृक्ष वाढीस लागलेला नसल्यामुळें, दे. भ. शिवरामपंतांच्या नजरेसमोर परकीय सरकार व त्याचे बगलबच्चे हेच काय तें एक शिकार करण्याजोगें सावज होतें आणि त्या सावजावर आपले छद्मी वाग्बाण सोडून शिवरामपंतांनीं त्यास पुरेपूर लोळवून टाकलें.

तथापि १९०५ सालाच्या अखेरपर्यंत हिंदुस्थानांत उघड उघड क्रांतिकारक चळवळीला सुरुवात झालेली नव्हती. राष्ट्रीय शिक्षणाच्या संस्था अद्यापि कोठेंहि उघडल्या नव्हत्या. चळवळीच्या वाढत्या पुरानें अद्याप स्वदेशी व बहिष्कार याच्या पलीकडची पायरी गांठली नव्हती. 'वंदे मातरम्' गीतासारख्या मंजुळ काव्याहून अधिक कर्णकटु शब्दप्रहार प्रतिपक्षावर केले जात नव्हते. परदेशांतून अद्यापि गुप्तपणें एकहि रिव्हाल्व्हर हिंदुस्थानांत आयात झाला नव्हता. बॉम्बगोळ्याची कला अवगत असलेला एकहि क्रान्तिकारक वीर अद्यापि परदेशांतून या देशाच्या किनाऱ्याला येऊन पोंचला नव्हता. हुतात्म्या चाफेकरांच्या वेळच रिव्हॉल्व्हरचे कानठळ्या बसविणारे आवाज हवेंत विरून जाऊन बहुतेकांच्या स्मरणांतूनहि जात चालले होते. रशियांतील क्रांतीलाहि वेसण घातली गेल्यानें तिचा आवाज मंदावला होता आणि त्याचा प्रतिध्वनि हिंदुस्थानांत उमटणें असंभवनीय झालें होतें. सारांश, क्रान्तिकारक विचाराचें बीजारोपण करण्याला भरतभूमि सर्वतोपरी अनुकूल होत चालली असली तरी क्रान्तिकारक विचाराच्या बीजाची पेरणी होऊन त्या बीजांतून अंकुर फुटून त्यानीं डोकें वर काढावयास अद्यापि बराच अवधि जावयास पाहिजे होता. अशा या बीजारोपणाच्या वेळचे हे लेख या आठव्या भागांत ग्रथित केले आहेत, हें लक्षांत घेतलें असतां त्या लेखाकडे पाहण्याची यथार्थ दृष्टि वाचकांस येईल व त्या पार्श्वभूमीवरून या लेखांतले स्वारस्य वाचकांच्या मनोभूमिकेवर यथार्थ बिंबेल. नाहींतर आजच्या अॅटम बॉम्बच्या युगांत फटाक्याच्या आवाजाची आणि 'छोडो हिंदुस्थान' च्या घोषणेपुढें सनदशीर हक्काच्या नम्रतापूर्व मागणीची जशी अवहेलना होते तशीच या मांजराच्या मिटलेल्या पंजासारख्या मऊमऊ भासणाऱ्या छद्मी भाषेंतल्या क्रान्तिसूचक विचारांचीहि अवहेलना व्हावयाची. उपहासगर्भ लेखाहून अधिक स्पष्ट व कटु भाषेंत लेख लिहिण्याचा तो काळ नव्हता. अर्थातच अशा काळांतला पुढारी त्या वेळच्या सर्व लेखकांत अग्रेसर होता कीं नाहीं

आणि त्यानें आपल्याला असलेल्या स्वातंत्र्याची परिसीमा गांठली होती कीं नाहीं, एवढीच कसोटी या लेखास लावून पाहावयाची. आणि या दुहेरी कसोटीस हे लेख पूर्णपणें उतरतात यांत शंका नाहीं. लेखकाच्या तिरंदाजीनें प्रतिपक्षी घायाळ होत असल्याचें गमक हेंच कीं, प्रतिपक्षी लेखकावर संतप्त होऊन त्याच्यावर फेर हल्ला करण्यास टपलेला होता आणि लेखकाचें कौशल्य हेंच कीं, त्याच्यावर असा फेर हल्ला करण्याला प्रतिपक्षाला योग्य संधि मिळालीच नाहीं.

१९०६ त क्रान्तिपक्षाच्या ज्या प्रक्षोभकारक चळवळी व्यक्त स्वरूप धारण करत्या झाल्या त्यांचें बीजारोपण १९०५ सालांत केलें जात होतें. बंगालची फाळणी करण्याचा आपला हट्ट कर्झननें तडीस नेला आणि ज्या दिवशीं ही दुहेरी राज्यव्यवस्था बंगाल्यांत प्रत्यक्ष सुरू झाली, तो १६ आक्टोबर १९०५ हा दिवस बंगालनें सुतकी दिवस म्हणून पाळला आणि त्या दिवशींच राष्ट्रीय बहिष्काराची शपथ बंगाल प्रांतांत जाहीर सभांतून उच्चारली गेली व राष्ट्रीय झगड्यास सुरुवात झाली. जपाननें रशियाचा खुष्कीवर व दर्यावर सपशेल पराभव केल्यामुळें रशियात अत्याचार सुरू झाले आणि त्यांच्या वार्ता हिंदी जनतेच्या कानावर येऊन आदळूं लागल्या. पं. शामजी कृष्णवर्मा यांनीं हिंदभूमि सोडून युरोपांत आपलें वास्तव्य करण्याचें ठरविलें आणि तिकडे राहून होतकरू हिंदी तरुणांस शिष्यवृत्त्या देऊन त्यांच्यातून क्रान्तिकारक पुढारी निर्माण करण्याचा पाया घातला. याच सुमारास कर्झनच्या राजीनाम्यामुळें कर्झनशाही अचानकपणें संपुष्टात आली, त्यामुळें हिंदी जनतेला आपली चळवळ नेटानें चालविण्यास एक प्रकारें प्रोत्साहन मिळालें. अशा या परिस्थितींत या आठव्या भागांतले लेख श्रीयुत शिवरामपंत यांच्या तैलबुद्धींतून आणि जहरी लेखणींतून प्रकट झाले आहेत.

एका वर्षाच्या ५२ आठवड्यात ५२ अग्रलेख प्रसिद्ध झाले असले तरी या भागांत अवघे १८ लेखच समाविष्ट केले गेले आहेत. यावरून एवढे लेखच स्थिर स्वरूपांत राहाण्यास पात्र असून इतर लेखांचें महत्त्व हंगामी होय असें स्वतः लेखकाचेंच मत दिसतें. अर्थातच हे अठरा लेख म्हणजे अगदीं निवडक वाग्बाणाचें शरसंधान होय. या लेखांतून शिवरामपंतांनीं कोणतीं मतें प्रतिपादन केलीं, कोणत्या वावग्या मतांचें खंडन केलें, कोणत्या

कार्यकर्त्यांना प्रोत्साहन दिलें, सामान्य जनांना स्फूर्ति कशी दिली इत्यादि मुद्द्यांचा विचार करण्यांत येणार आहेच. पण 'काळांतील लेख' लिहितांना शिवरामपंतांच्या दृष्टिसमोर ध्येय काय असे या संबंधीं इतरांनीं अनुमान करीत बसण्यापेक्षां स्वतः शिवरामपंतच काय सांगतात हें पाहणें अधिक सयुक्तिक होईल. आणि शिवरामपंतांनीं या संबंधाचें स्वतःचे विचार याच भागांतील एका लेखांत प्रगट केले आहेत. 'आपण काय पेरावें' या मथळयाचा या भागांतला जो ९ वा लेख आहे तो या दृष्टीनें अत्यंत सूचक आहे. त्या लेखांत ते लिहितात कीं, "यावेळीं आपण आपल्या देशाच्या अभ्युन्नतीचें बीं पेरावें हें उत्तम होय." हा उपदेश अत्यंत इष्ट आहे खरा, पण तो अगदींच मोघम आहे. याकरितां त्याचें स्पष्टीकरण करण्यासाठीं ते पुढें लिहितात कीं, "अशा रीतीचीं अनेक बीजें पेरून अनुभव घेण्यांत येत आहे. परंतु आपल्या हिंदुस्थानच्या शेतामध्यें जें उगवायला पाहिजे आहे, तें यापैकीं कोणत्याहि बियांपासून उगवत नाहीं. अशा रीतीनें मागचे प्रयत्न निष्फळ झाले आहेत. म्हणून आतां आपण काय पेरावें, याच्याबद्दल पुनरपि शांतपणानें विचार केला पाहिजे. ......आजपर्यंत जें जें बीं पेरण्यांत आलें त्यापासून इष्ट परिणाम घडून येत नाहींत, हें अनुभवसिद्ध झालें आहे. याकरितां दर पावसाळ्यांत तेंच तेंच बीं पेरीत बसण्यांत कांहीं अर्थ नाहीं. आतां दुसरें कांहीं तरी असें बीज पेरलें पाहिजे कीं, ज्याच्यापासून आपल्याला पाहिजे आहे तसें पीक उत्पन्न होईल." यावरून या वेळेपासून शिवरामपंतांचा सनदशीर चळवळीवरचा विश्वास उडत चालला होता आणि क्रान्तिकारक विचारांचें बीं पेरण्याकडे त्यांचा कल झुकत चालला होता असें दिसतें. त्यांनीं 'क्रान्ति' शब्दाचा उल्लेख या लेखांत कोठेंहि केला नाहीं. तरी पण दरसाल भरणारी कॉंग्रेस, औद्योगिक परिषद, शिक्षण प्रसाराची चळवळ या सर्वांची त्यांनीं या लेखांत अशी प्रच्छन्न हेटाळणी केली आहे कीं, तीवरून त्यांना त्या वेळीं क्रान्तिकारक चळवळीविना दुसरा कोणताच मार्ग सफल होईल असें वाटत नव्हतें, असें सहज अनुमान बांधतां येतें. अतएव 'आपण काय पेरावें' या लेखांत त्यांनीं जे विचार ध्वनित केले आहेत त्याला अनुसरूनच यांच्याकडून क्रान्तीच्या बीजाची पेरणी चालू झाली असें यापुढील लेखावरून व्यक्त होतें.

आतां आपण क्रमवार एकेक लेख घेऊन त्या त्या लेखाचें तात्पर्य काय हें पाहात जाऊं. पहिल्याच लेखाचा मथळा ' जसे लोक तसे त्यांचे देव ' असा ठसठशीत आहे. सकृद्दर्शनीं हा लेख वेदांतपर आहे आणि त्यांत ' निष्कल, निष्क्रिय, शांत, निरवद्य, निरंजन ' अशा सच्चिदानंदस्वरूपी परमेश्वराला सगुण बनवून त्याच्या अंगीं भक्तांनीं अनेक गुण व कार्यें चिकटविलीं याचा निषेध दर्शविला आहे एवढेंच दिसतें. पण सूक्ष्म दृष्टीनें पाहिल्यास या लेखांतील मर्म लक्षांत येऊं लागतें. ' देवांनीं गुलामगिरींत प्रावीण्य मिळविल्याबद्दलच्या कथा राष्ट्राच्या प्रगतीला विघातक आहेत ' असा ठाम सिद्धान्त शिवरामपंतांनीं या लेखांत मांडला आहे. आणि त्याच धोरणानें ' राष्ट्राच्या राजकीय उन्नतीच्या दृष्टीनें ईश्वर स्वरूपाविषयीं विशुद्ध कल्पना असणें फार जरूर आहे ' असें ठासून सांगून राजकीय उन्नति आणि यथार्थ धार्मिक कल्पना या दोहोंची सांगड आहे व ती तोडतां येणार नाहीं हें सिद्ध केलें आहे.

हा संबंध किती निकट आहे हें दर्शविण्याकरितां या लेखांत जें विवेचन केलें आहे त्यात ' स्वतंत्र लोकांचे देव स्वतंत्र असतात आणि गुलामलोक आपल्याबरोबर देवालाहि गुलाम बनवितात ' असें विधान करून ' नारसिंहावताराची गोष्ट ही खरोखर स्वतंत्रतेच्या काळांतच लिहिली गेलेली असली पाहिजे, कोणताहि गुलाम नारसिंहाची गोष्ट लिहूं शकणार नाहीं,' अशा स्पष्टोक्तीनें स्वतंत्रतेच्या काळांतील देवाच्या कल्पनेचा एक दाखला देऊन त्यापुढें सेना न्हावी आणि दामाजीपंत यांच्या कथांचा उल्लेख करून ' ह्या गोष्टी ज्यांनीं रचिल्या, किंवा त्या खऱ्या घडल्या असल्या तर ज्यांना त्या मान्य झाल्या, त्यांच्या गुलामगिरीची छाया त्यामध्यें स्पष्ट दिसत आहे ' असें प्रतिपादन केलें आहे. आणि ' असल्या गोष्टींचा लोकांची गुलामगिरी वाढविण्याच्या कामीं किती वाईट परिणाम होत असला पाहिजे याची कल्पनाहि करणें कठिण आहे ' असा या संबंधांत इषारा दिला आहे. अशा रीतीनें हा लेख अतिशय मर्मभेदक पण बोधप्रद असा आहे.

' फक्त अर्धा उपास ' या मथळ्यावरून हा लेख कशासंबंधीं असावा याचा वाचकांना बिल्कुल थांग लागणार नाहीं. पण लेख वाचतां वाचतां त्यांतील व्यंग्यार्थ लक्षांत येऊं लागतो. उपहासगर्भ लेखाचा हा एक सर्वोत्कृष्ट नमुना मानतां येईल इतका तो बहारदार आहे. या लेखाची पार्श्वभूमि

थोडक्यांत अशी आहे.---१९०५ च्या एप्रिल महिन्याच्या ४ थ्या तारखेस सिमल्या नजीकच्या कांग्रा खोऱ्यांत एक खूप जोराचा धरणीकंपाचा धक्का बसला. या धक्क्यानें आसपासच्या ८० मैलांतील अनेक खेडींपाडीं उध्वस्त झालीं. त्यांत पालमपूर व धरमशाला हीं दोन मोठीं गांवें अगदीं जमीनदोस्त झालीं. सिमल्यांतील व्हाइसरॉयांच्या बंगल्यालाहि हा धक्का जाणवला आणि लेडी कर्झन यांना बंगल्यांतून घाईघाईनें बाहेर पडावें लागलें. या धरणीकंपानें मृत्युमुखी पडलेल्यांची संख्या निश्चित अशी कळलीच नाहीं. तथापि निदान १५ हजार लोक या भूकंपाला बळी पडले असावेत असा अंदाज प्रसिद्ध झाला होता. अशा या आपत्तींत सांपडलेल्या लोकांच्या मदतीकरितां विलायतेंत ' मॅन्शन हाऊस फंड ' उभारावा व ती मदत इकडे रवाना करावी असें विलायतेंतील कांहीं उदार व कनवाळू गृहस्थांनीं ठरविलें. या कल्पनेला प्रथम हिंदुस्थान सरकारकडूनहि रुकार मिळाला. पण मागाहून येथील ब्यूरॉक्रसीला काय वाटलें न कळे; विलायतेंत असा फंड उभारण्याची गरज नाहीं; येथल्या येथें फंड जमवून या आपत्तीचें निवारण करतां येईल असें कळविण्यांत आलें ! विलायतेंतल्या ' मॅन्शन फंडा ' ला हा जो खो घालण्यांत आला त्या खोडसाळपणाच्या दुष्कृत्यावर उपरोधिक कोरडे ओढण्याकरितां हा लेख लिहिलेला आहे. आपत्तींत सांपडलेल्या लोकांना पुनश्च आपल्या पायावर उभे करण्याकरितां व त्यांना घरेंदारें बांधून देण्याकरितां जी रक्कम लागेल तिच्यासाठीं इंग्लंडांतील लोकांना तसदी देण्याचें कारण नाहीं, एवढी रक्कम हिंदुस्थानच्या हिंदुस्थानांत सहज रीतीनें उभारतां येईल, अशा अर्थाचा जो निरोप व्हाइसरॉयकडून विलायतेस गेला त्या मनोवृत्तींतला निष्ठुरपणा या लेखानें व्याजोक्तीनें दर्शविला आहे. हिंदुस्थानांत ३० कोटी लोकसंख्या आहे. त्यांच्या खाण्याचा खर्च रोजचा सुमारें दोन कोट रुपये होतो. आणि कांग्रा खोऱ्यांतील आपत्तीच्या निरासार्थ ५० हजार पौंड म्हणजे सुमारें साडे सात लाख रुपये लागणार ! एकट्या पंजाब प्रांतांतच दोन अडीच कोटी लोकसंख्या आहे. एवढ्या लोकांनीं फक्त अर्धा दिवस उपास केला तर प्रत्येकाचा अर्धा आणा या हिशेबानें पंजाबांतच सुमारें साडेसात लाख रुपये चटकन उभे राहूं शकतील असा साळसूदपणाचा भासणारा हिशेब दर्शवून या लेखांत सरकारवर मर्मभेदक टीका केली आहे. ही सगळी

व्याजोक्ति किती कुशलतेनें नटविली आहे याची कल्पना येण्याकरितां मूळ लेखच वाचला पाहिजे, त्यावर कितीहि भाष्य केलें तरी त्या भाष्यांत मूळ लेखांतला मर्मभेदकपणा एकशतांशानेंहि उतरणार नाहीं.

'स्वदेशभक्तीची व्याख्या' हा तिसरा लेख आहे. विलायतेंत दादाभाई नौरोजी प्रभृति हिंदी पुढारी आणि वेडरबर्न, हिंडमन प्रभृति हिंदप्रेमी इंग्लिश पुढारी यांच्यांत हिंदुस्थानासंबंधीं जी चर्चा होत असे त्या चर्चेंत एके वेळीं दादाभाई म्हणाले कीं, 'Patriotism means making an end of foreign rule' ( परकीय राजसत्तेची परिसमाप्ति करणें म्हणजे स्वदेशभक्ति होय). दादाभाईच्या तोंडचें हें वाक्य प्रसिद्ध झाल्यानें शिवरामपंताना साहजिकपणेंच एक मोठेंच घबाड लाधल्याप्रमाणें वाटलें आणि मग त्यांनीं तें दादाभाईचें वाक्य पिंजून पिंजून त्यांतून असा निष्कर्ष काढला कीं, ज्या अर्थीं प्रत्येक माणसानें देशभक्त असावें अशी आपण अपेक्षा करतों त्या अर्थीं हिंदुस्थानांतील प्रत्येक माणसानें या देशांतून इंग्लिशांची सत्ता नाहींशी व्हावी असाच प्रयत्न केला पाहिजे. पण असा उत्तानार्थ मवाळ लोकांना मानवणार नाहीं, आणि इतरानाहि तो राजद्रोहात्मक वाटेल; याकरितां दादाभाईच्या वाक्याचा जो उत्तानार्थ आहे तो तसाच न घेतां त्याचा लाक्षणिक अर्थच आपण घेतला पाहिजे, असें म्हणून शिवरामपंतांनीं मूळ वाक्यांतील उघड अर्थाला मुरड घातली आहे आणि अखेरीस "सिमल्यास ज्या खोलीमध्यें (राज्यकारभाराचा) विचार करण्याकरितां दहा इंग्लिश लोक (व्हाइसरॉय व त्याचे गोरे सल्लागार) बसतात, त्या खोलींत दहाच्या दहा इंग्लिश लोक न बसतां सहा नेटिव लोक आणि चार इंग्लिश लोक बसले, म्हणजे झाली परकीय सत्तेची परिसमाप्ति" असला निष्कर्ष काढला आहे! विलायतेंत दादाभाईंनीं जें छातिठोक विधान केलें तें विधान जसेंच्या तसें हिंदुस्थानांत मांडण्याचीहि त्या वेळीं चोरी होती आणि शिवरामपंतांच्या लेखांतील स्वातंत्र्याची कल्पनाहि या वेळेपर्यंत ४ इंग्लिश कौन्सिलर आणि सहा हिंदी कौन्सिलर अशा काळ्यागोऱ्यांच्या संमिश्र कार्यकारी मंडळापलीकडे जाऊं शकली नव्हती. अर्थातच सद्यःस्थितींत या लेखाला ऐतिहासिक कथाभागाहून अधिक महत्त्व राहिलें नाहीं.

'हॉर्सपॉवरच्या पराभवाचा निष्फळ झालेला प्रयत्न' हा चौथा लेख बराच विनोदगर्भ आहे; पण या लेखाला एकंदरींत पाहतां चांगला रंग भरला नाहीं. पाश्चात्य राष्ट्रांतून त्या त्या देशाचा कारभार चालविण्याला पार्लमेंटें असतात व शेकडों लोक त्या पार्लमेंटचे सभासद होण्यासाठीं अहमहमिकेनें निवडणुकी लढवितात; हिंदुस्थानांत तशी पार्लमेंट नाहीं. तरी पण पार्लमेंटची नक्कल म्हणून सरकारनें म्युनिसिपालिट्या व लोकलबोर्डें इत्यादि संस्था 'स्थानिक स्वराज्य' या मोठ्या नांवाखालीं येथें स्थापन केल्या आहेत. या संस्थांकडे गांवांतील केरकचरा साफ करणें आणि दिवाबत्ती लावणें, याहून अधिक महत्त्वाचे अधिकार दिलेले नाहींत; तरीपण आपल्यांतील पुढारी या संस्थांच्या निवडणुकी मोठ्या चुरशीनें लढवितात आणि निवडणुकींत अपयश आलें तर सरकारची आर्जवं करून नॉमिनेशनमधून तरी आपलें नांव यावें म्हणून खटपट करतात आणि कोणीकडून तरी या 'कचरासफाई'च्या कामाला स्वतःला बैलांसारखे जुंपून घेतात, अशा लोकांची थट्टा करण्याचा या लेखांत रोख आहे. ज्या वेळीं म्युनिसिपालिट्या, लोकलबोर्डें, ग्रामपंचायत वगैरे संस्थांचा 'खराट्याचें स्वराज्य' म्हणून उपहास करण्याची प्रथा रूढ होती त्या काळांतला हा लेख आहे. बरें, या संस्थांचें महत्त्व न पटल्यानें त्यांची टर उडवावयाचीच तर ती तरी स्पष्ट भाषेंत लिहावयास काय हरकत होती? दादाभाईंची स्वदेशभक्तीची व्याख्या उघडपणें प्रतिपादण्यांत राजद्रोहाची धास्ती असल्यानें ती व्याख्या शर्करावगुंठित करून वाचकांच्या गळीं उतरविण्यांत आली. पण 'खटाऱ्याच्या स्वराज्या'ची थट्टा करण्यांत तर कांहीं तसा धोका नव्हता ना? मग या लेखांत व्याजोक्तीची गरज काय होती? याचा खुलासा असा आहे कीं, क्रान्तिकारक चळवळीचें बीजारोपण करण्यासाठीं उपरोधिक भाषा वापरण्याची जी संवय लागली, ती संवय इतकी पक्केपणीं अंगांत मुरली कीं, ज्या गोष्टी उघड शब्दांत बोलून दाखविण्यास हरकत नाहीं त्या गोष्टीदेखील अन्योक्तीशिवाय इतर रीतीनें बाहेर येईनाशा झाल्या. शास्त्री-पंडितांना सभांतून संस्कृतप्रचुर भाषा वापरण्याची संवय झाली म्हणजे घरीं भोजनप्रसंगीं 'आमटी तिखट झाली आहे' हें साधें विधानहि ते पांडित्यप्रचुर भाषेनेंच करतात, तसाच कांहींसा प्रकार शिवरामपंतांच्या लेखांचा व भाषणांचाहि झाला होता. असो.

हा केवळ परिस्थितिमूलक संवयीचा परिणाम आहे, एवढेंच म्हणून त्याची बोळवण करावी हेंच उचित होय.

'पहिला देशद्रोही' या लेखांत एक हिंदु व एक मुसलमान अशा दोघा देशभक्तांचा संवाद असून त्यांत हिंदूंच्या देशद्रोहामुळें हिंदुस्थानांतील स्वराज्यें धुळीस मिळालीं व देशाला पारतंत्र्य आलें अशा आक्षेपाला उत्तर म्हणून हिंदू गृहस्थानें 'मीरजाफर हा पहिला देशद्रोही' कसा याचें सविस्तर विवेचन केलें आहे. लेखाचा एकंदरींत रोख असा कीं, हिंदूंत किती देशद्रोही निपजले आणि मुलसमानांत किती देशद्रोही निघाले यांचा वाद-विवाद करण्यापेक्षां मागील देशद्रोहाबद्दल अनुताप वाटावा आणि सर्वांनीं इतःपर परमेश्वरावर दृढभाव ठेवावा म्हणजे तो आपल्या हिंदुस्थान देशाला लवकरच उन्नतीचे दिवस खात्रीनें दाखवील.

'ग्रीस देश कसा स्वतंत्र झाला ?' हा लेख अत्यंत मननीय आहे. काळ पत्रांत सहसा लेखमाला येत नसत. प्रत्येक अग्रलेख वेगवेगळा व स्वयंपूर्ण असे. तथापि क्वचित् प्रसंगीं एखादा महत्त्वाचा विषय एका लेखांत आवरतां येण्यासारखा नसला म्हणजे तीन चार लेखांची लेखमाला गुंफावी लागे. अशा या अपवादात्मक लेखमालेपैकींच ही लेखमाला आहे. ज्या राष्ट्राला स्वातंत्र्य संपादन करावयाचें असेल त्या राष्ट्रांतील देशभक्तांना स्वतंत्र झालेल्या अन्य देशांचे इतिहास अवगत असले पाहिजेत. इतिहासाची जशीच्या तशी पुनरावृत्ति होत नसली तरी समान परिस्थितींतून गेलेल्या राष्ट्रांचा इतिहास थोडाबहुत मार्गदर्शक होतोच. याच दृष्टीनें 'ग्रीस देश कसा स्वतंत्र झाला' ही तीन लेखांची माला शिवरामपंतांनीं यावेळीं गुंफिली. स्वातंत्र्याची निश्चित कल्पना डोळ्यांपुढें ठेवून चळवळ करण्याला प्रारंभ झाला होता. अशा प्रसंगीं देशाभिमानी कार्यकर्त्यांच्या पुढें अनेक राष्ट्रांचीं उदाहरणें वावरत असावीं या उद्देशानें ग्रीस देशाच्या स्वातंत्र्य-प्राप्तीचा इतिहास या लेखांतून निवेदन करण्यांत आला. हा लेख उपरोधिक नसून विधायक दृष्टीनें लिहिलेला आहे. त्यांत प्रथमतः आपला देश व ग्रीस देश यांच्या प्राचीन वैभवाचें साम्य दर्शविण्यांत आलें आहे. त्या नंतर ग्रीस देशावर राज्य करणारे तुर्क आणि आपल्या देशावर साम्राज्य गाजविणारे इंग्रज यांच्या राज्यपद्धतींतलें साम्य व वैषम्य दाखविण्यांत आलें आहे, आणि

नंतर ग्रीस देशाला स्वातंत्र्याची स्फूर्ति कशी मिळाली, स्वातंत्र्यसिद्धीसाठीं ग्रीक लोकांनीं आपली संघटना कशी केली, गुप्त संस्था कशा निर्माण केल्या व त्यांचें जाळें सर्वत्र कसें पसरलें, स्वातंत्र्यसंग्रामांत किती बलिदान केलें, किती हाल सोसले, आपत्तींतहि चिकाटी कशी दाखविली इत्यादि वर्णनें प्रसंगोपात्त करून असें अपरिमित कष्ट सहन केल्याशिवाय स्वातंत्र्यसंप्राप्ति होत नाहीं, हें तत्त्व वाचकांच्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न केला आहे. या विवेचनांत अनेक ठिकाणीं अर्थांतरन्यास साधून सर्वसामान्य असा जो बोध केला आहे तो सतत दृष्टीसमोर ठेवण्याजोगा आहे. नमुन्यादाखल पुढील सामान्य सिद्धांत पाहा.

( १ ) "आपला देश, आपला धर्म आणि आपली भाषा याबद्दलचा अभिमान ग्रीक लोकांच्या मनांत कायम होता. जेथें भावी स्वतंत्रतेचीं हीं बीजें कायम टिकविलीं जातात, तेथे परकीयांचा जुलूम कितीहि वर्षें चालू असला तरी योग्य वेळ येईल तेव्हां लोक स्वतंत्र होतात."

( २ ) स्वतंत्रतेची इच्छा आहे परंतु साधन नाहीं, अशा स्थितींत लोकांना एकच उपाय करतां येण्यासारखा असतो. तो उपाय म्हटला म्हणजे गुप्त मंडळ्या स्थापन करणें हा होय."

( ३ ) "दहा गुप्त मंडळ्या उघडकीस आल्या म्हणून हरकत नाहीं; परंतु त्यापैकींच एखादीनें कार्यभाग जुळून येत असतो."

( ४ ) "असल्या फसणाऱ्या गोष्टी हें एक प्रकारचें शिक्षण आहे. ह्यांत फसतां फसतां यश कसें मिळवावें हें सहज लोक शिकून जातात. गुप्त मंडळ्या फुटतात; तथापि जेथें गुप्त मंडळ्या बनल्याच नाहींत त्या देशावर स्वतंत्रताहि कधीं हंसली नाहीं."

( ५ ) "नुसता अतिशय जुलूम एवढेंच कारण राज्यक्रान्तीला पुरत नाहीं. हा जुलूम आपल्याला नको अशी बुद्धि लोकांच्या मनांत उत्पन्न व्हायला पाहिजे असते."

( ६ ) "पुष्कळ जुलूम का थोडा जुलूम, ही प्रतिकाराला अपेक्षित गोष्ट नव्हे. तर जुलूमाची चीड येणें हें राज्यक्रान्तीचें आदि कारण आहे."

( ७ ) "जुलमापासूनच जुलमी राजांचा नाश उत्पन्न होतो आणि अतिशय गांजणुकीपासूनचें गांजलेल्यां लोकांची स्वतंत्रता निर्माण होते;

हे सृष्टीचे नियम कधीं खोटे व्हावयाचे नाहींत."

(८) "आपल्या महाभारताने लोकांना स्फूर्ति येऊन शिवाजीच्या वेळीं ज्याप्रमाणें महाराष्ट्र स्वतंत्र झाला, त्याचप्रमाणें या वेळीं होमरच्या काव्यानें ग्रीक लोकांना स्वतंत्र केलें."

(९) "ज्ञानप्रसार ही स्वतंत्रतेची पहिली पायरी आहे. कवि हे राष्ट्राचे मार्गदर्शक होत."

(१०) "राज्यक्रान्तीला गुप्त प्रयत्न जितका अवश्य आहे तितकाच उघड प्रारंभहि हितकारक आहे. पूर्वी जें कृत्य करण्याची चोरी असते तें कृत्य पवित्र कर्तव्यकर्म बनून जातें. ज्यांना राजानें दंड केला असतो त्यांच्या भयानें राजे थरथर कांपूं लागतात ! जे राजद्रोहाच्या आरोपाला पात्र झाले असते ते सन्मान्य देशभक्त बनतात."

(११) "ग्रीसमधील धर्माधिकारी लोक देवाच्या स्मरणीचे लांकडी मणी ओढीत स्वस्थ बसले नव्हते. कित्येक ठिकाणीं तर धर्मोपदेशक बंड-वाल्यांचे पुढारीहि झाले."

(१२) "राज्यक्रान्त्या गुलाब पाण्यानें होत नसतात. हें इतिहासाचें तत्त्व कालत्रयींहि अबाधित आहे."

असो. असे उतारे देत बसल्यास सगळीच लेखमाला उतरून घ्यावी लागेल. सांगण्याचा मतलब हाच कीं, श्रीयुत शिवरामपंतांनीं अनेक देशांच्या इतिहासांचें आलोडन करून त्यांतून प्रत्येक देशाच्या स्वातंत्र्यप्राप्तीच्या साधनांचा परिचय करून घेतला होता आणि त्यावरून कांहीं सामान्य सिद्धान्त बांधून आपल्या देशबांधवांना त्या सिद्धान्तानुसार वागण्याची स्फूर्ति द्यावी हाच त्यांचा हे लेख लिहिण्यांत हेतु होता.

याच्या नंतरच 'आपण काय पेरावें' हा मार्मिक लेख आला आहे. त्या लेखाच्या मर्माचें दिग्दर्शन प्रथमारंभींच केलें असल्यानें येथें पुनरुक्ति करीत नाहीं.

'एका शेतकऱ्याचे उद्गार' या लेखांत हिंदुस्थानांतील शेतकऱ्यांची स्थिति किती शोचनीय झाली आहे, याचें अत्यंत हृदयद्रावक असें वर्णन आहे. परकीय सत्तेचा जाच सर्वांनाच असह्य होत आहे हें खरेंच, पण त्यांतल्यात्यांत शेतकऱ्यांना तो इतका असह्य झाला आहे कीं, जगण्यापेक्षां

मरण आलेलं बरें, असें त्यांस वाटत असल्याचें करुणरसपूर्ण वर्णन या लेखांत आहे.

'पावसानें अतिशय घाण केली' या लेखांत शिवरामपंतांची लेखणी पुनश्च उपरोधिक वर्णनाकडे वळली आहे. या वर्षी पावसाळा महिना दीड महिना लांबला होता; पण मागाहून पर्जन्याचें आगमन झालें. त्याबद्दल आनंद मानावयाच्या ऐवजीं, पाऊस पडला नसता तर सरकारकडून रिलीफ कामें सुरु झालीं असतीं, नवीन रेल्वेचीं कामें निघालीं असतीं, इरिगेशनचें पाणी शेतकऱ्यांना घ्यावें लागल्यानें त्या खात्याचें उत्पन्न वाढलें असतें, खडी फोडण्याची रिलीफ कामें सुरु झाल्यानें ज्या रस्त्यांनीं पूर्वी कधीं खडी पाहिली नव्हती अशा अनेक रस्त्यांनीं खडी पाहिली असती, शेतीचीं कामें नसल्यानें शहरांत मजुरांचा भरणा वाढून गिरण्यांच्या कामाला तेजी आली असती वगैरे वगैरे कल्पनातरंग चालवून पाऊस पडल्यानें आपला देश इतक्या चांगल्या गोष्टींना मुकला, असलें व्याजोक्तीचें वर्णन या लेखांत अथपासून इतिपर्यंत आहे. या सगळ्या उपरोधिक वर्णनांत दुष्काळ पडला असतां मिशनऱ्यांना आपल्या कळपांत शेकडों कोंकरें ओढण्याला संधि मिळते, व आकाशांतील बापाचा धर्म वाढत जातो, हा जो मोठा फायदा त्याला मिशनरी संस्था आंचवल्या, ही जी पावसानें मोठी घाण केली तिचा उल्लेख कसा आला नाहीं, याचें आश्चर्य वाटतें. शिवराम-पंतांच्या लेखांत हा उल्लेख अवश्य यावयाला हवा होता.

'मनापुढें खरा व स्पष्ट उद्देश असला पाहिजे' हा बारावा लेख विशिष्ट तात्त्विक विचारांना चालना देणारा आहे. देशांत अनेक संस्था निघतात, अनेक चळवळी होतात, वाङ्मय निर्माण होत असतें, पण या सर्वांपासून विशिष्ट फलप्राप्ति व्हावी असा मनोदय असल्यास आपलें उद्दिष्ट आपल्या मनापुढें तरी अगदीं स्पष्ट असलें पाहिजे. नाहींतर एका हेतूनें चळ-वळ सुरू करावी, तिच्यांत जोम चढण्यासाठीं निराळ्याच साधनांचा अवलंब करावा आणि त्यामुळें त्या चळवळीचें पर्यवसान भलतेंच व्हावें, असा प्रकार घडत असतो. उदाहरणार्थ, १८५७ सालच्या शिपायांच्या बंडाचाच इतिहास पहा. काडतुसामुळें धर्म बुडतो अशा भावनेनें जर बंड उभारलें गेलें तर तसलीं काडतुसें बंद केलीं गेलीं आणि सरकार कोणाच्याहि धर्मांत

हात घालूं इच्छित नाहीं असा जाहिरनामा प्रसिद्ध झाला कीं बंडाचें कारणच नष्ट झालें व बंड संपलें असें होणार; अर्थात्‌च त्यापासून स्वातंत्र्यप्राप्ति कशी होणार ? म्हणून स्वातंत्र्य प्राप्तिसाठीं बंड असेल तर तसाच स्पष्ट उद्देश डोळ्यापुढें ठेवला पाहिजे. . लोकांना चिडविण्याला गाईचीं व डुकराचीं काडतुसें हेंच साधन योग्य होतें. पण गाईच्या आणि डुकराच्या चरबीचीं काडतुसें नाहींत अशी शिपायांची खात्री झाली म्हणजे बंड थंडावतें; कारण संपलें कीं कार्य संपतें.

हीं व यांसारखीं अनेक उदाहरणें देऊन या लेखांत असा निष्कर्ष काढला आहे कीं, " खोटे उद्देश हे कोणत्याहि लोकांना खरी स्वतंत्रता कधीं मिळवून देऊं शकत नाहींत. धर्मासारख्या वरिष्ठ प्रतीच्या साधनाला असल्या कामीं लाविल्याच्या योगानें इष्ट हेतु सफल होत नाहीं आणि धर्माची मात्र व्यर्थ विटंबना होते." " नेदरलंड, फ्रान्स, अमेरिका, ग्रीस, इटाली इत्यादि राष्ट्रें जीं स्वतंत्र झालीं तीं अशा घरसोडीनें, आडपडद्यानें, किंवा तडजोडीनें स्वतंत्र झाली नाहींत. आपण स्वतंत्र व्हावयाचे हा एक स्पष्ट उद्देश त्यांनीं आपल्या डोळ्यांसमोर ठेवला होता व त्या उद्देशासाठीं त्यांनीं आपले सर्व दीर्घ प्रयत्न चालविले होते. आणि म्हणूनच त्यांना त्यामध्यें यश आलें."

यानंतरचा १३ वा लेखांक ' मंगळ ' हा कोणत्या हेतूनें लिहिला हें लक्षांत येत नाहीं. मंगळ हा राजकीय ग्रह आहे; शौर्य, पराक्रम, तेज, क्रोध, आवेश, अभिमान, युद्धनैपुण्य, राजवैभव इत्यादि अनेक उदात्त गोष्टींचा हा दाता आहे. युद्धांतील विजय आणि राष्ट्राचे उत्कर्ष हे या महात्म्याच्या कृपादृष्टीपासून उत्पन्न होत असतात, असें जें याचें वर्णन केलें आहे तें यथार्थ आहे. आणि त्यापुढें मंगळ ग्रहाला उद्देशून तूं—' हिंदुस्थान देशाकडे वक्रदृष्टीनें पाहू नकोस ' आणि ' हिंदुस्थानच्या भावी योद्धयांच्या जन्मकाळीं तूं आकाश मंडळांतील कुंडलीमध्यें अशीं स्थानें हस्तगत करून ठेव कीं, त्याच्या योगानें ते तेजस्वी, स्वदेशाभिमानी, पराक्रमी, परासहिष्णु स्वतंत्रवर्ती आणि वैभवशाली असे निपजतील.' आणि ' तुला अशी विनंती आहे कीं, इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, रशिया, जपान, अमेरिका हीं राष्ट्रें अभ्युदयाला आलीं त्या वेळीं तूं ज्या स्थानांत होतास त्याच स्थानांत तूं हिंदुस्थाना-करितां ये' इत्यादि ज्या प्रार्थना केल्या आहेत त्या फलज्योतिषशास्त्राला

धरून आहेत. तथापि शिवरामपंतांचा फलज्योतिषावर विश्वास होता कीं काय याविषयीं शंका आहे. त्यांचा विश्वास असो वा नसो. या लेखांत त्यांनीं मंगळाची जी स्वतःची नित्याची प्राथना दिली आहे तींतहि त्यांची राष्ट्राच्या अभ्युन्नतीची तळमळच व्यक्त होते.

परराष्ट्रांतील पराक्रमी देशभक्त आपल्या देशाच्या स्वातंत्र्यासाठीं आपल्या जिवावरहि उदार होऊन शत्रूशीं कशी टक्कर देत राहतो याचें एक अनुकरणीय व स्फूर्तिदायक उदाहरण म्हणून कॉकेशस पर्वताजवळील एका प्रांतांतल्या 'इमाम इस्माईल' या नांवाच्या स्वातंत्र्यवीराची कर्तबगारी या १४ व्या लेखांत वर्णिली आहे.

'दासबोध' हा १५ वा लेख अखिल महाराष्ट्रीयांस अत्यंत आदरणीय व मननीय असा वाटेल. या लेखांत राष्ट्रगुरु समर्थ रामदासस्वामी यांनीं महाराष्ट्राला पारतंत्र्यांतून डोकें वर काढून स्वतंत्रता देवीचें मंदिर उभारण्याला कशी स्फूर्ति दिली याचें बहारदार वर्णन आहे. १९०५ सालांत भावी क्रान्तीचीं जीं अनेक बीजें पेरलीं गेलीं त्यांत दासबोध ग्रंथाचें हें प्रकाशन याची प्रामुख्यानें गणना करावी लागेल. धुळ्याचे समर्थभक्त नानासाहेब देव यांनीं परिश्रमपूर्वक संशोधन करून डोमगांवच्या मठांतून कल्याणस्वामीच्या हातच्या दासबोधाची प्रत करून घेतली आणि त्या प्रतीवरून दासबोधाची ही शुद्ध आवृत्ति प्रसिद्ध केली. ही आवृत्ति प्रसिद्ध करतांना नानासाहेब देव यांनीं त्या ग्रंथाला जी अमोलिक प्रस्तावना जोडली त्या प्रस्तावनेनें दासबोध ग्रंथाच्या वाचनाची गोडी महाराष्ट्रांत पुनरुज्जीवित केली. लोकमान्यांच्या 'गीतारहस्य' ग्रंथानें राष्ट्रांत एक प्रकारचें नवचैतन्य निर्माण केलें हें निर्विवाद आहे. पण तत्पूर्वी दहा वर्षें नानासाहेब देवांच्या या दासबोधाच्या आवृत्तीनें या नवचैतन्याचें बीजारोपण करून ठेवलें होतें असें म्हणण्याला प्रत्यवाय नाहीं. असा अमोलिक ग्रंथ स्वातंत्र्यशाहीर शिवरामपंत परांजपे यांच्या हातीं पडल्यावर त्यांनीं त्या ग्रंथाचे पोवाडे कसे गायिले याची कल्पना या 'दासबोध' मथळ्याखालील लेखावरून वाचकांस येईल. स्वातंत्र्यदेवतेचीं स्तोत्रें गाण्याला आणि महाराष्ट्रीय जनतेंत नवचैतन्य निर्माण करण्याला आपल्याला हा एक नवा ठेवाच सांपडला असें पाहून त्यांनीं या ग्रंथाचे या लेखांत आदरानें स्वागत केलें आणि वाचकांना त्या ग्रंथांतील उत्तमोत्तम

विचारांचा परिचय करून दिला.

दासबोध ग्रंथ रामदासस्वामींनीं ज्या वेळीं लिहिला त्या वेळीं त्याचा उत्कृष्ट परिणाम महाराष्ट्रावर झाल्याची साक्ष इतिहासच देत आहे. पण त्या नंतर २५० वर्षें तो ग्रंथ बाजूस पडला होता. इतिहासभूषण राजवाडे यांनीं ग्रंथमालेंतून 'रामदास' या विषयावर लेख लिहून दासबोधाच्या अध्यापनास चालना दिली आणि त्याचाच सुपरिणाम होऊन धुळ्याच्या **सत्कार्योत्तेजक सभेनें** दासबोधाची ही नवी अधिकृत आवृत्ति काढिली. ही आवृत्ति हातीं पडतांच शिवरामपंतांनाहि स्फुरण चढलें आणि त्यांनीं या लेखांत दासबोध ग्रंथाचा आणि रामदासाच्या एकंदर शिकवणीचा परामर्श घेऊन महाराष्ट्रांत जागृति केली.

सत्कार्योत्तेजक सभेनें या कार्याला प्रारंभ केल्यापासून समर्थ रामदासस्वामींचें चरित्र आणि दासबोधाची शिकवण या विषयावर अनेकांनीं लेख लिहिले असतील. आणि वक्तृत्वपूर्ण व्याख्यानेहि दिलीं असतील. परंतु शिवरामपंतांनीं या लेखांत दासबोधाचें जें सार मार्मिकतेनें प्रकट केलें आहे तशी गुणग्राहकता कोणीच दाखविली नसेल. शिवरामपंत लिहितात —

( १ ) "गुलाम झालेल्या लोकांनीं आपल्या गुलामगिरीच्या पाशांतून कसें मोकळें व्हावें या विषयींचा बोध खरोखरच या ग्रंथांत सांगितलेला आहे. या दासबोधाच्या आंत दुसरा एक दासबोध आहे. या मोठ्या दासबोधांत एक लहान दासबोध आहे. रामदासांनीं केलेल्या या बोधांत दुसऱ्यांचे दास होऊन बसलेल्या लोकांनाहि बोध घेण्यासारखा कांहीं भाग आहे."

( २ ) "समर्थांच्या ग्रंथांतून वचनें काढून त्यांच्याच शब्दांनीं त्यांचीं चरित्रकृत्यें आणि मतें ओघानें जुळवून आणण्यांत दे. शंकरराव देव यांनीं फारच मार्मिकपणा दाखविला आहे."

( ३ ) "खनाळामध्यें जाऊन राहे। तेथें कोणीच न पाहे॥ सर्वत्रांची चिंता वाहे। सर्वकाळ॥ या ओवींत सांगितल्याप्रमाणें डोंगरांच्या निवांत आणि निर्जन खनाळामध्यें जाऊन समर्थ सदासर्वकाळ हिंदुस्थानांतील आपल्या सर्व देशबांधवांची चिंता वहात होते. हे लोक स्वतंत्र कसे होतील, परकीय लोकांचें येथील राज्य कसें लयाला जाईल, आणि स्वधर्माची व स्वराज्याची गादी स्वदेशामध्यें कशी संस्थापित होईल, ही विवंचना राः-

दासांना रात्रंदिवस लागली होती."

(४) "साधुसंतांचें, लोकांना मार्ग दाखविणारांचें, लोकांना उपदेश करणारांचें काम हातांत तलवार घेऊन शत्रूला जिंकावयाचें नसतें. अशा लोकांनीं शस्त्रच कशाला धरावयाला पाहिजे आहे? शस्त्रांतच काय जास्त आहे. भगवंताची भगवद्गीता हे सगळ्या शस्त्रांचें शस्त्र आहे."

(५) "अवतारी पुरुषांचीं प्रासादिक वचनें गांडीव धनुष्यामध्यें गांडीवपणा आणितात, तलवारीला तीक्ष्ण करितात, आणि बंदुकीला बत्ती देतात. रामदासांनींहि त्या वेळीं हेंच केलें. आणि केव्हांहि झालें तरी असेंच करावें लागतें."

(६) "राख फुकून टाकली म्हणजे तिच्या खालीं लाल आणि झळझळीत असा निखारा पाहिजे त्याला भाजून काढण्याला तयार असतोच. रामदासस्वामींनीं फक्त ही राख फुंकून टाकिली आणि त्याबरोबर सर्व हिंदु राष्ट्र तयार झालें."

(७) "मोंगल बादशहांनीं भाषणस्वातंत्र्य आणि मुद्रणस्वातंत्र्य यांचे हक्क लोकांना दिले नव्हते. त्यामुळें लोकांना उपदेश करण्याचें कामहि कांहीं तरी पांघरुणाखालींच करावें लागत होतें. रामदासांनीं राजकारणाला परमार्थनिरूपणाचें पांघरूण घातलें; लहान दासबोधाला मोठ्या दासबोधाचें पांघरूण घातलें, आणि आपल्या त्या वेळच्या राजकीय गुप्त मंडळांना धार्मिक मठांचें पांघरूण घातलें."

वर दिलेल्या उताऱ्यावरून शिवरामपंतांची दासबोध ग्रंथांकडे पाहण्याची दृष्टि काय होती व वरील लिहिण्यांत खोच काय आहे तें वाचकांच्या लक्षांत येईल. आत्मौपम्य बुद्धीनेंच त्यांना समर्थांच्या मनाचा ठाव घेतां आला व त्यामुळेंच तें दासबोधाच्या वर्णनांत इतकें रंगून गेले.

"**कौंट टॉल्स्टाय यांचीं दोन विलक्षण मतें**" हा एक अगदीं छोटासा लेख आहे. अलीकडे कम्यूनिस्ट, निहिलिस्ट इत्यादि पंथांतून जीं मतें प्रसृत झालीं आहेत त्यांतील कांहीं मतांचा उगम **काऊंट टॉलस्टाय** यांच्या लेखांत आढळतो. 'Property is theft' (संपत्ति म्हणजे चोरी,) 'Property is murder' (संपत्ति म्हणजे खून), 'There is no such thing as a state, as a Government' (सरकार वगैरे संस्था या सब झूट

आहेत ) इत्यादि विलक्षण मतें प्रतिपादण्यास त्या वेळीं नुकतीच टॉलस्टॉयनें सुरुवात केली होती. त्या वेळीं युरोपखंडांतहि हीं मतें मान्य झालीं नव्हतीं. मग हिंदुस्थानासारख्या मागासलेल्या देशांत तीं सर्वमान्य कशी होणार ? अर्थातच शिवरामपंतांनाहि तीं मान्य नव्हतीं, म्हणूनच त्यांनी त्या मतांना ' विलक्षण ' मतें असें म्हटलें आहे. पण मग त्यांनीं तीं मतें आपल्या काळपत्रांत उद्धृत तरी कां केली ? याचा खुलासा असा कीं, वैयक्तिक दृष्टया हें मत त्यांना मान्य नव्हतें. प्रत्येक खासगी व्यक्तीजवळ जो जो द्रव्यसंचय असतो तो चोरीनें आणि खुनानेंच संपादिला असतो असा सरसकट सिद्धान्त त्यांना मान्य नव्हता. तथापि राज्यें व साम्राज्यें यांची उभारणी ही दरवडेखोरीच होय, राज्यापहरण हे खून व दरवडे यांचेंच संमिश्र फल होय, विशेपतः कोणत्याहि एका देशावर परकीयांचें राज्य स्थापलें जाणें याच्या बुडाशीं अशीं दुष्कृत्येंच असणार, ही त्यांची समजूत, असल्यामुळें असल्या परकी साम्राज्याविषयीं टॉलस्टॉयसारख्या तत्त्वज्ञान्यांना काय वाटतें तें सामान्य जनांच्या कानावर पडावें, त्यांच्या मनांत तें बिंबवावें, याच हेतूनें त्यांनीं तो लेख लिहिला. परंतु कायद्याच्या कचाट्यांतून बचावण्यासाठीं त्यांनीं त्या लेखाचा समारोप करतांना ' हिंदुस्थानासारख्या देशांत सरकार निरुपयोगी आहे असें कोणालाहि म्हणतां यावयाचें नाहीं ' असें शेंपूट त्याला जोडलें आहे. यावरून शिवरामपंतांच्या लेखनाच्या धोरणावर बराच प्रकाश पडतो.

' एका खडी फोडणाराची गोष्ट ' आणि ' विषासाठीं कंठशोष ' हे शेवटचे दोन्ही लेख पूर्ण उपरोधिक आहेत. या लेखांत शिवरामपंतांनीं आपल्या उपरोधिक लेखनशैलीची परिसीमा गांठली आहे. त्यांतल्या त्यांत ' विषासाठीं कंठशोष ' हा दुसरा लेख तर फारच बहारीचा साधला आहे. पहिल्या लेखांत खेडेगांवांतील सुखवस्तु शेतकऱ्यांचीं मुलें शहरांत येऊन कशी बिघडतात, दुष्काळांत शेतकऱ्यांचे कसे हाल होतात, बेकारांचे प्राण वांचविण्यासाठीं म्हणून सुरू केलेल्या रिलीफ कामात कामकऱ्यांना किती निर्दयतेनें पिळून काढलें जातें, अखेरीस बेकार स्त्रिया मातृवात्सल्यासहि पारख्या होऊन दाईच्या नोकरीसाठीं आपल्या पोटच्या गोळ्याच्या नरडीला नख लावण्याइतक्या कशा निर्दय बनतात इत्यादि प्रकारांचे, अंगावर शहारे

आणणारे वर्णन काव्यमय भाषेंत या लेखांत केलें आहे. पण लेखाचें तात्पर्य याच्या पुढेंच आहे. गुलामगिरींत रुळलेल्या माणसाच्या मनोभावना इतक्या हीन दशेला पोंचतात कीं, त्याला ती हीनदीन स्थितीच अंगवळणी पडते आणि आपली स्थिति सुधारण्याचें विचारहि मनांत न आणतां, जर आकस्मिक रीतीनें त्या स्थितींतून सुटका होण्याची संधि त्याला सहजासहजीं मिळाली तरी तो गुलामगिरींतून आपली सुटका करून न घेतां तिलाच घट्ट कवटाळून तींतच आनंद मानूं लागतो, असें या लेखांत दर्शविलें आहे. ईश्वरानें दूत पाठवून अशा माणसाला स्वर्गांत चलण्याविषयीं पाचारण केलें असतां, येथल्यापेक्षां स्वर्गांत अधिक कांहीं नाहीं, उलट येथल्यासारखी रिलीफ कामें तेथें नाहींत, असें म्हणुन त्यानें देवदूताला 'येथून चालता हो' म्हणून सांगितलें आणि आपलें खडी फोडण्याचें काम चालू केलें असें या लेखाचें पर्यवसान आहे ! लेखांतील काव्यमय अतिशयोक्ति बाजूस सारून तात्पर्यार्थ घेतल्यास हिंदी जनतेची स्थिति अत्यंत हीनदीन झाली असून देखील ही आपली स्थिति सुधारावी असा विचारहि तिच्या मनांत येत नाहीं, मग ती सुधारण्यासाठीं प्रयत्न करणें तर दूरच राहिलें ! हिंदी जनतेची ही मानसिक अवनतीच आपल्या हातून स्वातंत्र्यप्राप्तीचे प्रयत्न होण्याच्या आड येते, हें तत्त्व या लेखांतून शिवरामपंतांनीं दिग्दर्शित केलें आहे.

शेवटच्या 'विपासाठीं कंठशोष' या लेखांतहि हीच दीनतेची मनोभावना व हाच न्यूनगंड वर्णिलेला आहे. मात्र या वर्णनाकरितां वर्ण्यविषय शेतकरी न घेतां साहेबाचा पट्टेवाला घेतला आहे. आगगाडींत नोकर लोकांकरितां एक वेगळा डबा राखून ठेवलेला असतो. त्या डब्यांत बसावयाला जातांना याला इतर नोकरदारांनीं हरकत घेतली; तेव्हां हा पट्टेवाला मोठ्या आढ्यतेनें 'मी देखील साहेबाचा नोकर आहे' असें प्रतिपादन करीत, त्यांच्याशीं तंडत बसतो आणि या अपराधाबद्दल साहेबानें लत्ताप्रहाराचा प्रसाद दिला असता, त्याची शरम वाटणें दूरच राहून 'हा पाहा पुरावा, आहे कीं नाहीं मीं साहेबाचा सर्व्हंट' असें म्हणून आपल्या शब्दाचा खरेपणा पटविण्याकरितां त्या लत्ता-प्रहाराचा पुरावा तो इतरांना दाखवूं लागतो, हा या लेखाचा मथितार्थ आहे ! हिंदी जनतेच्या मानसिक अवनतीचें असें चित्र रेखाटण्यांत वाचकांच्या मनांत आपल्या दीनदुबळेपणाची चीड यावी आणि त्यांनीं ही गुलामगिरी

झुगारून देण्याची ईर्षा मनांत बाळगून त्या दिशेनें प्रयत्न सुरु करावा असा लेखकाचा उच्च हेतु दिसतो.

काळांतील निवडक निबंधाच्या आठव्या भागांतील लेखांचा वाचकांना परिचय करून देण्यासाठीं हा ऊहापोह केला. तेवढ्यावरून वाचकांना यांतील लेख कसे देशाभिमान प्रेरित आणि स्वातंत्र्यलालसा वाढविणारे आहेत याची स्थूल कल्पना येईल. त्या लेखांची याहून अधिक गोडी प्रतीत होण्याला मुळांतूनच ते वाचले पाहिजेत. शिवरामपंतांच्या लेखांत इतक्या सूक्ष्म छटा आणि खाचाखोचा असतात कीं, त्यांची कल्पना केवळ वर्णन करून अथवा उतारे देऊन येऊं शकणार नाहीं.

या भागांत प्रसिद्ध केलेल्या लेखांशिवाय इतरहि कित्येक महत्त्वाचे लेख 'काळ' पत्रांत प्रसिद्ध झालेले आहेत. त्यांचा समावेश निवडक निबंधांत स्थल संकोचास्तव केला नसावा. पण ते लेखहि वाचनीय आहेत. विशेषतः 'कर्झनचा राजिनामा', 'वंगभंग' आणि 'बंगाल्यातील चळवळी', 'रशियांतील राज्यक्रांति', 'रशियन युक्त्या', 'स्वातंत्र्यकलह', 'भाला पत्रावरील राजद्रोहाचा खटला', 'दक्षिण आफ्रिकेंतील निःशस्त्र प्रतिकार' इत्यादि प्रकरणें अवश्य वाचनीय आहेत. आणि सर्वांनाच कांहीं त्या वेळच्या फायली मिळविणें व त्यांतून हे लेख वाचणें शक्य होणार नाहीं. याकरितां आमची अशी सूचना आहे कीं, प्रस्तुतच्या प्रकाशकांनीं पूर्वी प्रसिद्ध झालेले दहाहि भाग छापून प्रसिद्ध केल्यानंतर जुन्या फाइली चाळून त्यांतून जे कित्येक लेख अवश्य पठनीय असून प्रकाशित केले गेले नाहींत, ते एकत्र करून प्रकाशित करावे.

विद्याखात्याला व मुंबई विद्यापीठाला अशी सूचना करावीशी वाटते कीं, त्या संस्थानीं मराठी भाषेच्या अभ्यासाकरितां हायस्कूलांतून आणि कॉलेजां-तून यांतले कांहीं भाग अभ्यासाकरितां नेमून द्यावेत. प्रौढ व अलंकारिक मराठी भाषेचें स्वरूप समजण्याला व अनुकरणासाठीं कित्ता म्हणून पुढें ठेवण्याला शिवरामपंतांचे लेख उपयुक्त ठरतील. विषयाचें तर्कशुद्ध प्रतिपादन, विषयाची उपक्रमोपसंहारादि मांडणी, भाषेची सजावट, लेखांचें तात्पर्य वाचकांच्या मनावर ठसविण्याची शैली, विषयानुरूप अलंकारांची योजना इत्यादि लेखनाचीं अंगें विद्यार्थ्यांना शिकविण्याला असले निबंध विद्यार्थ्यांच्या

अभ्यासांत समाविष्ट झाले पाहिजेत. याकरितां विद्यापीठाच्या अभ्यासक्रमांत पुस्तकांची निवड करणाऱ्या मंडळींनीं या निबंधांच्या भागाकडे नजर वळवूनत्यांतील निवडक निबंध मराठीच्या अभ्यासकांस अवश्य पठनीय म्हणून नियुक्त केले पाहिजेत, तरच शिवरामपंतांची विशिष्ट भाषा शैली मराठी वाङ्मयांत चिरस्थायी होईल.

सदाशिव पेठ<br>
घ. नं. ६०७

ज. स. करंदीकर.

---

# जसे लोक तसे त्यांचे देव : : : १

काळ : अग्रलेख ता. ७-४-१९०५

हे परमेश्वरा ! तूं मूळचा निर्विकार, निर्विकल्प, निर्गुण, निष्कलंक, निरंजन, निष्क्रिय आणि स्वतंत्र असा आहेस. ज्यांना तुझ्या स्वरूपाचें योगसमाधीनें दर्शन झालें आहे, ते तूं असा आहेस म्हणून सांगतात. आणि ज्यांना तुझ्याबद्दल आगमादिकांवरून ज्ञान झालेलें आहे, तेही तुझ्या स्वरूपाबद्दल अशाच प्रकारचें वर्णन करितात. वेदांनीं तुला याच शब्दांनीं स्तविलें आहे. उपनिषदांमध्यें तुझ्या याच स्वरूपाचें प्रतिपादन आहे. बादरायणानीं आणि शंकरांनीं अनेक पूर्वपक्ष आणि उत्तरपक्ष करून, अखेरीस तुझ्या स्वरूपाबद्दलचें हेंच मत स्थापित केलें आहे. परंतु हें फक्त आमच्याच तत्त्वज्ञान्यांचें मत आहे असें नाहीं; इतर देशांतील विचारवंत तत्त्ववेत्तेही अखेरीस याच मताला येऊन पोहोंचलेले आहेत; व पोहोंचत आहेत. वास्तविक तुझें असें स्वरूप असतां व सत्, चित् आणि आनंद यांच्याशिवाय वास्तविक दुसरें कांहीं एक नसतां, हे परमेश्वरा ! तुझ्या रूपासंबंधानें आणि गुणांसंबंधानें या जगांतील लोकांनीं काय ढवळाढवळ केली आहे, याची तुला कल्पना तरी आहे काय ? सर्व जगाची व्यवस्था तूं उत्तम रीतीनें ठेवितोस अशी तुझी ख्याति आहे, परंतु प्रत्यक्ष तुझ्याच संबंधानें येथें किती अव्यवस्था माजलेली आहे, याच्याबद्दल तुला कांहीं तरी दाद आहे काय ? 'एकमेवाद्वितीयं ब्रह्म' अशा स्वभावाचा जो तूं त्या तुझे प्रकार किती झाले आहेत ! 'सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म' असें जें तुझें स्वरूप त्यावर असत्य अज्ञानाचीं लोकांनीं किती पुटें चढविलीं आहेत, आणि

' निष्कलं निष्क्रियं शांतं निरवद्यं निरंजनम्, ' हें ज्या तुझें लक्षण, त्याच्यावर इहलोकीं किती मनोविकारांचे आणि क्रियांचे आरोप केले जात आहेत, याच्याबद्दल तूं कधीं विचारही केलेला नसावा, असें दिसतें. तुझ्या स्वरूपा-संबंधानें जितके विपर्यास झालेले आहेत, तितके दुसरे कशाही संबंधानें झालेले नसतील. आणि तरीही तूं स्वस्थच आहेस, हें मोठें आश्चर्य आहे! तूं वास्तविक अवयवरहित असतां, आमच्या जगामध्यें तुला हात किती असावेत, डोळे किती असावेत, वगैरेंबद्दल कडाक्याचे वाद चालतात; व प्रत्येकजण आपापला पक्ष खुद्द श्रुतीच्या आधारावर सप्रमाण सिद्ध करून दाखवीत असतो. कोणी माणसें आपल्या स्वतःप्रमाणें तुला दोनच हात असले पाहिजेत, असें मानितात. कोणी ' देव म्हटला म्हणजे त्याला आपल्या-पेक्षां कांहीं तरी जास्त असलें पाहिजे ' या कल्पनेवर तुला आणखी दोनच हात चिकटावितात. कोणी तुला सहा हात आहेत, असें म्हणतात; आणि जो तूं मूळचा अपाणिपाद त्या तुला आठ हात दिल्यावांचून कित्येकांची हौस पूर्ण होत नाहीं. तुझें तोंड आणि डोळे यांच्या संबंधानेंही असाच घोंटाळा चाललेला आहे. आणि त्याची संख्या एक आणि हजार यांच्या-मध्यें नेहमीं कमी जास्त प्रमाणानें बदलत असते. अणूपेक्षांही जो तूं वास्त-विक अणीयान, त्या तुझा आकार, लांबी, रुंदी व उंची यांसंबंधानें तर कोठेंच कांहीं मेळ नाहीं. कोणी तुला लहानशा डबीमध्यें ठेवितात, आणि कोठें कोठें अतिशय विस्तीर्ण मंदिरेंही तुला पुरत नाहींत, असें जाणून कोणी तीं आणखी वाढवीत असतात. तुझ्या आकाराला लोकांनीं एक प्रमाण असें कोठेंच ठेविलें नाहीं. कोठें लहान, कोठें मध्यम आणि कोठें अतिशय मोठी, अशा तुझ्या मूर्ती बनविण्यांत येतात. आणि पुष्कळ प्रसंगीं तर मालकांची पैसे खर्च करण्याची शक्ति आणि सुतार, सोनार किंवा पाथरवट यांचें कौशल्य यांच्यावर, हे जगच्चालक परमेश्वरा! तुझ्या आकृतीचें प्रमाण अवलंबून राहिलेलें आहे. तुझें मूळचें स्वरूप कसेंहि असो; कारागीर लोक तुला जो आकार देतील त्या आकारांत आणि चितारी जो रंग देतील त्या रंगांत, हे विश्वव्यापक सृष्टिकर्त्या! तुला रहावें लागत आहे. ज्या तुझ्यापासून पृथ्वि, आप, तेज, वायु आणि आकाश हीं पंचमहाभूतें निर्माण होतात, त्या तुझें शरीर कोणी मातीचें बनवितात,

कोणी दगडाचें बनवितात, कोणी लांकडाचें बनवितात आणि कोणी धातूंचें बनवितात. ज्या प्रांतांत ज्या दगडांच्या खाणी उपलब्ध असतील, त्या प्रांतांत त्या मानानें त्या त्या दगडाचें शरीर तुला प्राप्त होतें ! जेथें संगमरवरी दगडाच्या खाणी असतील, तेथें तुला काळ्या दगडाचा बनवून तुझी किंमत कमी करण्याचें पातक कोणीही करीत नाहींत. परंतु जेथें निरुपायच आहे, तेथें काळ्या दगडाचे मधूनच तुझें सत्स्वरूप लोकांना फोडून बाहेर आणावें लागतें. तूं जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं सर्वत्र भरलेला असतांनाहि तुझ्या मूर्ती फक्त कांहीं ठिकाणींच स्वयंभू मानल्या जातात, आणि बाकींच्या ठिकाणींच्या मूर्ती उसनवार असल्या पाहिजेत, असें लोक समजतात. ह्या तुझ्या बहिरंगासंबंधाच्या गोष्टी झाल्या. परंतु तुझ्या अंतरंगाबद्दलही आम्ही इहलोकींच्या माणसांनीं असेच एकेक विलक्षण चमत्कार करून ठेवलेले आहेत. तुला आमच्यासारखेच क्षुद्र आनंदानें आनंदित होणारें आणि क्षुद्र दुःखानें दुःखित होणारें मन आम्हीं दिलेलें आहे, हें तुला माहित असेलच ! आणि तूं निर्विकार आहेस म्हणून श्रुती आणि स्मृती कितीहि ओरडत असल्या, तरी तुला आमच्यासारखेच मनोविकार आहेत, असें आम्हीं ठरविलें आहे ! आम्हांला जसे राग आणि द्वेष आहेत, त्याचप्रमाणें ते तुलाही असल्याचें आम्हीं कल्पिलें आहे. एखाद्या साध्या आणि विकारवश माणसाप्रमाणें तूं आमच्यावर रागावतोस, आणि लहर लागेल तेव्हां आमच्यावर खुषही होतोस. अशा मनोविकारांच्या तडाक्यामध्यें सांपडल्यामुळें तूं कधीं कधीं एखाद्या अगदीं क्षुद्र मनुष्याप्रमाणें वर्तन करतांना आढळतोस ! तुला एक पैशाची खडीसाखर दिली म्हणजे तेवढ्यावर खुष होऊन आमच्या एखाद्या श्रीमंत बाईची हजारों रुपये किंमतीची हरवलेली नथ जेथें होती तेथें तूं आणून ठेवतोस ! आणि एखाद्या कुळंब्याच्या बाईनें तुला कोंबडें दिलें नाहीं, तर तिच्यावर रागावून तूं तिच्या मुलाचा हिंवताप बंद करीत नाहींस ! तुला एखाद्या कचेरींतील कारकुनाप्रमाणें नवसाचा लांच दिल्यावांचून तूं लोकांचें काम करीत नाहींस आणि एखाद्या हट्टी मुलाप्रमाणें तुला पाण्यांत कोंडल्यावांचून तूं पाऊस पाडीत नाहींस, किंवा एखाद्या माणसाला लवकर घरीं आणीत नाहींस ! हे अनंता, हे पुरुषोत्तमा ! हे धर्म तुझ्या ठिकाणीं कसे संभवतात ? हे जे लोकांनीं तुझ्यावर अज्ञानामुळें अनेक अध्यारोप केलेले आहेत, ते तर सर्व

वाईटच आहेत; परंतु तूर्त या हिंदुस्थानच्या राजकीय स्थितीला अतिशय घातक असे जे कित्येक अध्यारोप तुझ्यावर झालेले आहेत, ते मात्र अतिशय दोषार्ह आणि असह्य असे आहेत.

हे परमेश्वरा ! तूं जरी सर्वोत्कृष्ट, सर्वश्रेष्ठ आणि सर्वगुणसंपन्न असा आहेस, तथापि तुझें सर्वांशांनीं आकलन करण्याला सर्वच लोक समर्थ असतात असें नाहीं. त्यामुळें कित्येक लोक आपआपल्या मगदुराप्रमाणें तुझ्या स्वरूपाची कल्पना करून घेतात. समुद्र हा जरी सर्व उदकांनीं संपूर्ण असला तरी ज्याच्यापाशीं जेवढें भांडें असेल, तेवढेंच तो त्याच्या मधून भरून घेणार ! आणि म्हणूनच जशी लोकांची किंमत असेल, त्या मानानें त्यांचे देव बनलेले असतात. मूळचें देवाचें स्वरूप कसेंही असो, देव मानणारे लोक जितके रानटी किंवा सुधारलेले असतील, तितकें त्यांच्या देवाचें स्वरूप रानवट किंवा सुधारलेलें असतें, असें या जगांतील निरनिराळ्या थरांवरच्या लोकांच्या स्थितीवरून दिसून येतें. रानांत राहणारे लोक वृक्षांना आणि विशिष्ट आकारांच्या दगडांना, भुतांना आणि मेलेल्या माणसांच्या अवशेषांना देव मानतात ! त्यांना नदीच्या पाण्यांत आसरा (अप्सरा) आणि डोंगरांच्या शिखरावर समंध दिसतात. पूर्वीचे ईजिप्तमधील जुने लोक पशूंनाही देव मानीत असत. देवाविषयींची कल्पना अज्ञानावस्थेमध्यें जास्त स्थूल असते. परंतु जसजशी लोकांमध्यें सत्यज्ञानाची वृद्धि होत जाते, तसतसा अज्ञानाबरोबर देवतांचाहि स्थूलपणा झडत जातो. आणि जसजसें ज्ञान सूक्ष्म होत जातें, तसतशी देवाची कल्पनाही सूक्ष्मत्व पावत जाते. वेदांतामध्यें 'नेति नेति' या श्रुतीनें जें परब्रह्मस्वरूप निषेधाच्या भाषेमध्यें वर्णिलेलें आहे, तो सूक्ष्मत्वाचा कळसच होय. तितक्या पायरीला पोहोंचणारे फारच थोडे भाग्यवान् पुरुष या भूतलावर अवतीर्ण होतात. सामान्य लोक म्हटले म्हणजे याच्यापेक्षां खालच्या कोटींतीलच असावयाचे, अशा जड लोकांमध्यें देवाविषयींच्या जड कल्पनाच प्रसृत झालेल्या असावयाच्या आणि म्हणूनच जडबुद्धीच्या लोकांनीं आपले मनोविकार देवावर लादून त्याची आपल्यासारखी एक मनोविकारयुक्त क्षुद्र व्यक्ति बनाविलेली असते. यावरून 'जसे लोक तसे त्यांचे देव' हा सिद्धांत बिनचूक दिसतो. एखाद्या लोकांचे देव कसे आहेत, याची कल्पना बरोबर कळली, तर त्यावरून ते

लोक किती प्रतीचे आहेत, हें सहज ताडतां येण्यासारखें आहे. यावरून हें दिसून येईल कीं, लोकांच्या स्थितीचा देवाच्या स्वरूपावर नेहमीं पुष्कळ परिणाम होत असतो. परंतु याच्या उलट सिद्धांतही खरा आहे कीं, परमेश्वराच्या स्वरूपाची शुद्ध कल्पना लोकांच्या डोळ्यांपुढें मांडलेली असली, तर त्या कल्पनेचा, लोकाची स्थिति शुद्ध आणि उन्नत करण्याच्या कामीं, पुष्कळ उपयोग होतो, असा या दोन गोष्टींचा अन्योन्यपरिणाम होत असल्यामुळें राष्ट्राच्या राजकीय उन्नतीच्या दृष्टीनें ईश्वरस्वरूपाविषयीं विशुद्ध कल्पना असणें फार जरूर आहे.

परंतु पुष्कळ वेळां असेंच आढळून येतें कीं, लोक स्वतः जसे असतात, तसेच ते आपले देव बनवितात. काळे लोक आपल्या देवाला काळा रंग देतात. खुजा लोकांच्या देवांच्या मूर्ति फारशा उंच नसतात, आणि चापट नाकाचे लोक आपल्या देवाच्या मूर्तींनाही तरतरीत नाकें देत नाहींत. ह्या शरीरधर्मांप्रमाणें लोक आपले मनोधर्महि आपल्या देवावर संक्रामित करितात. सत्यवादी लोकांच्या देवांसंबंधींच्या गोष्टींतून देवांना असत्यपणा लावलेला आढळत नाहीं. आणि असत्यवादी लोक देवांच्या काल्पनिक गोष्टींतून त्यांच्या तोंडीं असत्य भाषणें घालण्याला मागेंपुढें पहात नाहींत. तापट लोकांचे देवहि उग्र असतात, आणि मंदट लोकांच्या देवांचीं स्वरूपें मंद आणि थंड अशीं असतात. स्वतंत्र लोकांचे देव स्वतंत्र असतात, आणि गुलाम लोक आपल्याबरोबर आपल्या देवांनाहि गुलाम बनवितात. हें लोकांच्या मनोविकारांचें देवतांमध्यें पडलेलें प्रतिबिंब निरनिराळ्या लोकांमध्यें तर निरनिराळ्या स्वरूपानें दृग्गोचर होतच असतें, परंतु एकाच लोकांमध्येंसुद्धां निरनिराळ्या काळीं निरनिराळीं प्रतिबिंबें त्या त्या वेळच्या विकारांच्या अनुरोधानें उमटलेलीं दिसतात. आपल्याच पुराणांतील गोष्टी घेतल्या, तर त्यांवरून असें दिसून येतें कीं, विष्णु ही देवता लोकांच्या मनांतील सत्त्वगुणाचा उत्कर्ष प्रदर्शित करिते, आणि शंकर ही देवता आपल्या उपासकांच्या तमोगुणाची साक्ष देते. श्रीरामचंद्राची मूर्ति हें लोकांच्या मनांतील वीररस आणि सत्यनिष्ठा यांचें द्योतक आहे. हे जसे मनुष्यांच्या मनोविकारांचे स्पष्ट छाप देवतांवर उमटलेले आहेत, तसेच कित्येक गोष्टींतून परतंत्रतेचे आणि गुलामगिरीचे छापही देवांवर स्पष्टपणें उमटलेले आहेत. पुराणकालच्या गोष्टी जेव्हां घडून

आल्या, किंवा रचल्या गेल्या, त्या वेळीं आपण स्वतंत्र होतों, म्हणून त्या वेळच्या देवतांवर गुलामागिरीचे छाप फारसे उठलेले नाहींत. तरी पण रावण वगैरे मंडळींच्या बंदीशाळेंत पडलेल्या देवतांच्या गोष्टी त्यांतही नाहींत असें नाहीं; पण ते अपवाद होत. सामान्यतः तो काळ स्वतंत्रतेचा होता. परंतु आपल्या गुलामगिरीचा स्पष्ट काळ म्हटला म्हणजे मुसलमानी बादशाहीचा होय. या काळांत प्राधान्य पावलेल्या देवतांचें किंवा त्यांच्या गुणांचें पर्यालोचन केलें असतां तेथें लोकांच्या गुलामगिरीची स्पष्ट चिन्हें कोणालाहि दृश्यमान् झाल्यावांचून रहाणार नाहींत. या गोष्टीच्या स्पष्टीकरणार्थ आपण त्या वेळच्या संत मंडळींनीं केलेल्या उत्कृष्ट आणि हृदयद्रावक अशा वाङ्मया-पैकीं दामाजीपंत आणि सेना न्हावी या दोघांच्या कथा घेऊं. या दोन्हीही गोष्टी फार उत्तम आहेत, आणि ह्यापैकीं दामाजीपंताची गोष्ट तर इतकी सुंदर, मनोवेधक आणि प्रेमळ आहे कीं, ती ऐकून ज्याच्या डोळ्यांतून अश्रु निघणार नाहींत, असा मनुष्यच सांपडणें कठीण. परंतु या गोष्टीमध्यें स्वतंत्रतेच्या अभिमानाच्या दृष्टीनें एक मोठें व्यंग आहे. नारसिंहावताराची गोष्ट ही खरोखर स्वतंत्रतेच्या काळांतच लिहिली गेलेली असली पाहिजे. तो लिहिणारा स्वतंत्रच मनुष्य असला पाहिजे. कोणताही गुलाम नारसिंहाची गोष्ट लिहूं शकणार नाहीं. परंतु तीच दृष्टि दामाजीपंत आणि सेना न्हावी यांच्या गोष्टीकडे वळवा म्हणजे आपल्या दृष्टीला काय दिसतें ! बादशाहाच्या हजामतीला उशीर होतो, म्हणून आमचा परमपूज्य देव विठोबा खाकेंत धोंकटी घालून आणि न्हाव्याचा वेप घेऊन बादशाहाची हजामत करण्या-करितां जातो ! आणि दुष्काळांत उपाशी मरणाऱ्या लोकांना अन्नदान करण्यांत खर्च झालेली सरकारी रसद पोहोंचविण्याकरितां ब्रह्मांडाचा धनी आणि त्रैलोक्याचा नायक जो सर्वसामर्थ्ययुक्त विठोबा तो ‘ विठ्या महार ’ बनून हिंदुस्थानावर जुलूम करणाऱ्या बादशहापुढें लवून मुजरा करितो ! ह्या गोष्टी ज्यांनीं रचिल्या, किंवा त्या खऱ्या घडल्या असल्या तर त्या ज्यांना मान्य झाल्या, त्यांच्या गुलामगिरीची छाया यांमध्यें स्पष्ट दिसत आहे. या गोष्टींप्रमाणें देवही जेथें बादशहांची इतकी मिजास संभाळतात, तेथें असल्या गोष्टींचा लोकांची गुलामगिरी वाढविण्याच्या कामीं किती वाईट परिणाम होत असला पाहिजे, याची कल्पनाही करणें कठीण आहे. बादशहाच्या

हजामतीला थोडा उशीर झाला असता म्हणून त्रैलोक्यनायकाचें काय बिघडत होतें ? सेना न्हाव्याची भक्ति कवीला व्यक्त करावयाची होती, ही गोष्ट खरी आहे, परंतु गुलामगिरीची वृद्धि ज्यानें होईल अशा रीतीनेंच भक्तीचें वर्णन एखाद्या कवीनें करणें जरूर आहे असें नाहीं. दामाजीपंतानेंहि सत्कार्यांतच धान्याचा विनियोग केलेला होता. ज्या लोकांचे त्यानें दुष्काळांत प्राण वांचविले, तीं देवानेंच निर्माण केलेलीं माणसें होतीं. त्या मरणोन्मुख लोकांना दामाजीपंतानें वांचविलें, ही गोष्ट त्यानें चांगली केली, असें जर देवाला वाटत होतें, तर मग त्या कामीं बेदरच्या बादशहाची एवढी मिनतवारी कशाला पाहिजे होती ? नृसिंह हा जर त्या ठिकाणीं देव असता, तर तो न्हाव्याची धोंकटी अगर महाराची घोंगडी शोधीत खात्रीनें कधींही बसला नसता. आपल्या भक्तांस छळणाऱ्या शत्रूवर त्यानें आपल्या नखांचाच प्रहार केला असता. पण ' जसे लोक तसे त्यांचे देव ! ' आणि गुलाम लोकांचे देवही गुलामच ! मुसलमानांच्या गुलामगिरींत राबत असलेल्या कवींच्या, ग्रंथकारांच्या आणि साधुसंतांच्या लेखणींतून असल्या गुलाम देवांशिवाय दुसरें चित्र निघणें शक्यच नव्हतें. गोष्टी, कथा, कथानकें, पुराणें वगैरे हीं सर्व राष्ट्राचीं शिक्षक आहेत. त्यांनीं आपल्या राष्ट्राला उच्च आणि उदात्त असेच विचार शिकविले पाहिजेत. देवांनीं गुलामगिरींत प्रावीण्य मिळविल्या-बद्दलच्या कथा राष्ट्राच्या प्रगतीला विघातक होतात. धार्मिक ग्रंथांतून आणि कथांतून तर असले हे गुलामगिरीचे पोषक विचार बिलकूलच असतां कामा नयेत. कारण या कथा लहानपणींच मुलांच्या कानांवर जातात, आणि त्यांतील तत्त्वें लहानपणापासून त्यांच्या मनांत मुरतात, आणि मोठेपणीं त्यांच्या प्रत्येक कृत्यांतून तीं तत्त्वें प्रादुर्भूत होतात. अशा स्थितींत आपण आपल्या मुलांना कोणतीं तत्त्वें शिकवितों, इकडे प्रत्येकानें लक्ष पोहोंचविलें पाहिजे.

' जसे लोक तसे त्यांचे देव, ' हें तत्त्व इतर ठिकाणच्या इतिहासांतूनही दिसून येतें. युरोपांतील धार्मिक चळवळींच्या इतिहासाकडे पाहिलें, तर तेथेंही हीच गोष्ट निदर्शनास येते. तिकडील लोक रोमन क्याथोलिक पंथाचे होते, तोंपर्यंत त्यांना लांकडाचे, दगडाचे, वगैरे सर्व प्रकारचे देव खपत असत. परंतु ल्यूथरनें सर्व यूरोपखंडामध्यें सत्यज्ञानाचा प्रकाश प्रसृत केल्यानंतर तेच लोक इकोनोक्लॅस्टस बनून देवांच्या मूर्ति फोडूं लागले.

प्रॉटेस्टंट लोकांच्या बुद्धीची सूक्ष्मता जशी वाढली, तसे त्यांना मातीचे आणि दगडाचे देव चालेनासे झाले. जॉन नॉक्स हा जो प्रसिद्ध स्कॉटिश धार्मिक सुधारक, तो आपल्या गुन्ह्याच्या शिक्षेबद्दल समुद्रांत वल्हीं मारीत असतां त्याला मेरीची एक लांकडी मूर्ति अभिवंदनासाठीं जेव्हां देण्यांत आली, तेव्हां त्यानें त्या लांकडाला वंदन न करितां तें समुद्रांत फेंकून दिलें. इतर लांकडांप्रमाणें तेंही लांकूड पाण्यावर तरंगत राहिलें आणि कांहीं वेळानें क्याथोलिक धर्मांतील ती मेरी कोठें वाहून गेली तिचा पत्ता नाहीं ! ह्यावरून विचारांच्या सूक्ष्मतेप्रमाणेंच प्रत्येक मनुष्याला देव लागत असतो हें दिसून येतें. फ्रान्समध्यें राज्यक्रांति होण्याचे पूर्वी क्याथोलिक धर्माचेंच प्राबल्य होतें. परंतु त्या राज्यक्रांतीच्या वेळीं समान हक्क, स्वतंत्रता वगैरे तत्त्वांचा सर्व फ्रेंच राष्ट्रामध्यें इतका कांहीं अनावर संचार झाला कीं, त्या संचाराच्या भरांत लोकांनीं पूर्वींच्या देवतांच्या सर्व मूर्ती पदच्युत करून Equality, Liberty ( समानता, स्वतंत्रता ) या भाववाचक कल्पनांच्या प्रत्यक्ष मूर्ती बनवून मुख्यमुख्य ठिकाणीं स्थापित केल्या. ' जसे लोक तसे त्यांचे देव,' हें तत्त्व या फ्रान्सच्या वरील उदाहरणावरून अतिशयच स्पष्ट रीतीनें व्यक्त होत आहे. परंतु या तत्त्वाच्या स्पष्टीकरणाच्या कामांत फ्रान्सचीच एवढी मोठी प्रतिष्ठा पाहिजे आहे असें नाहीं. ' जसे लोक तसे त्यांचे देव ' हें तत्त्व आपण हिंदुस्थानांतील लोकही कमी व्यक्त करीत आहों असें नाहीं. पण आपण जसे गुलाम तसे आपले देवहि आपण गुलाम बनविले आहेत, याचे अनुभव आपल्याला पदोपदीं आहेत. परंतु एका गृहस्थानें याविषयींची सांगितलेली एक हकीकत विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे. तो म्हणाला : " कांहीं वर्षांपूर्वी प्रिटोरियामध्यें इंग्लिशांना जय मिळाला तेव्हां हिंदुस्थानांत जिकडे तिकडे उत्सव झाला. त्या वेळीं आमच्याही गांवांत महोत्सव झाला. ध्वजा लागल्या, पताका उभारल्या गेल्या, आंब्याचे टाहाळे झाडांच्या खांदीवरून निघून कमानांच्या खालीं टांगून लोंबत राहिले; आणि शाळेंतील मुलें उत्तम उत्तम कपडे घालून मिरवूं लागलीं. हा प्रकार मला फारसा इष्ट न वाटल्यामुळें आमच्या येथें गांवाबाहेर एक उत्तम, रमणीय आणि आल्हादकारक देवस्थान आहे, तिकडे मी आपल्या मनाची करमणूक करून घेण्याकरितां गेलों. परंतु ज्या त्रासानें मी तेथें गेलों, त्या त्रासाचें कारण तर

तेथें जास्तच जोरांत आलेलें दिसलें. तें देऊळ सर्व बाजूंनीं शृंगारलेलें आणि देवाच्या अंगावर त्या दिवशीं सर्व उत्तम पोशाख आणि दागिने घातलेले मला आढळले. त्या देवावर माझी फार श्रद्धा होती; परंतु ' प्रिटोरिया डे ' च्या दिवशींचा देवाचा तो थाट पाहून मला देवाचा किळस आला, आणि माझ्या तोंडून पुढील उद्गार निघाले :— " देवा! तूंहि आमच्यासारखा गुलाम बनलास ! 'प्रिटोरिया डे'साठीं तुला पोशाख करून आणि दागिने घालून काय करावयाचें होतें ! मला वाटलें होतें कीं शाळेंतील लहान लहान अज्ञान मुलें फक्त आज नटलीं असतील. पण तूं तर त्या लहान मुलांपेक्षांहि जास्त ऐट केली आहेस ! गांवांतील त्या अज्ञान मुलांचा तो अज्ञानपणाचा देखावा माझ्यानें पाहवेना, म्हणून मी तुझ्याजवळ आपलें दुःख निवेदन करण्यासाठीं आलों, तों तूं त्या मुलांपेक्षांहि जास्त अज्ञान झालेला माझ्या दृष्टीस पडत आहेस ! अथवा देवा ! तुझा तरी काय उपाय ? तूं गुलाम लोकांच्या हातीं सांपडला आहेस ! तेव्हां ते लोक तुला गुलाम बनविल्यावांचून कधींही सोडावयाचे नाहींत. अशा लोकांना शहाणपण शिकविण्याचें टाकून तूंही त्या गुलामांबरोबर गुलाम बनतोस, हें आमच्या देशाचें दुर्भाग्य होय." ही गोष्ट आपले हल्लींचे देव कसे गुलाम झाले आहेत, हें चांगल्या रीतीनें व्यक्त करिते.

या सगळ्या विवेचनावरून ' जसे लोक तसे त्यांचे देव ' हें तत्त्व सिद्ध होतें खरें; परंतु हे परमेश्वरा ! आमची तुझ्यापाशीं अशी प्रार्थना आहे कीं, आमच्या अवगुणांनीं तूं कलुषित न होतां तूं आपल्या सद्गुणांनीं आम्हांला मंडित कर. हे विश्वचालका ! तुझीं जीं या पृथ्वीवर अल्प प्रतिमास्वरूपें आहेत, तीं जरी आमच्या दोषांनीं संसृष्ट होत असलीं, तरी तूं जसा आहेस, तसें आम्हांला करण्याचें तुझ्या अंगामध्यें सामर्थ्य नाहीं, असें नाहीं. आणि या वेळीं तर तुझ्या कृपेची आम्हांला आणि आमच्या देशाला फारच आवश्यकता आहे. आम्ही आणि आमचा देश इतक्या वाईट स्थितीला जाऊन पोहोंचलों आहों कीं, त्या स्थितींतून वर निघण्याला तुझ्या कृपेशिवाय दुसरें कांहींच साधन नाहीं, असें प्रत्येकाला वाटूं लागलें आहे. याकरितां तूं सर्वांना स्फूर्ति दे, सर्वांच्या अंतःकरणांत सद्बुद्धि उत्पन्न कर, आणि सर्वांचें लक्ष आपल्या देशाच्या आणि तुझ्या सेवेकडे लागेल असें कर.

---

## फक्त अर्धा उपास : : : २

काळ : अग्रलेख ता. २१-४-१९०५

● १९०५ सालचे एप्रिल महिन्यांत उत्तर हिंदुस्थानांत मोठा धरणीकंप झाला. सिमला येथील व्हाइसरीगल लॉज कोसळला, पण लेडी कर्झन बचावल्या. पलटणींतले गुरखे शिपाई मेले, त्यांच्यासाठीं सेनापति किचनेर यांनीं फंड सुरू केला व नागरी जनतेसाठीं कर्झननीं फंड सुरू केला. या सहानुभूतींतही राजकारण होतेंच !

धरणीकंप हा एक सृष्टींतील अद्‌भुत चमत्कार आहे, असें आपण हिंदुस्थानांतील लोक क्रमिक पुस्तकांतील शास्त्रीय धड्यांतून इतके दिवसपर्यंत वाचीत मात्र होतों. यूरोप खंडांतील स्पेन, इटली, वगैरे दूरच्या देशांतून मागें धरणीकंप झाले आणि त्यांच्या योगानें तेथें मोठमोठीं शहरें गडप होऊन अतिशय नुकसान झालें, अशा हकीकती आजपर्यंत केवळ आपल्या मनोरंजनाकरितां आपण ऐकत होतों. परंतु हल्लीं दुर्दैवानें धरणीकंप आपल्या अगदीं जवळ येत चालले आहेत. हिंदुस्थानांत पूर्वीं धरणीकंपाचे बारीक सारीक धक्के बसलेले नाहींत असें नाहीं. पण हल्लींच्या मानानें ते धक्के म्हणजे कांहींच नव्हते, व त्यांच्यापासून हल्लींच्या सारखें पूर्वीं कधीं इतकें नुकसानहि झालेलें नाहीं. हल्लीं ज्या हिमालयामध्यें धरणीकंपाचे धक्के बसल्याचें प्रसिद्ध झालें आहे तोच हिमालय पर्वत पूर्वीं एकदां पुराणकाळीं डळमळला असल्याचें रामायणामध्यें वर्णिलेलें आहे. तो हिमालयांतील धरणीकंप रावणाचें साम्राज्य लयाला जाण्याच्या पूर्वींचा होय. रावण अतिशय मदोन्मत्त झालेला होता, तेव्हां त्यानें कैलासाच्या कळसासकट हिमालय पर्वताला गदगदां हलविलें व तेथें राहणाऱ्या शंकरपार्वतीला आणि त्यांच्या गणांना भयभीत करून सोडिलें, अशी पुराणामध्यें

गोष्ट आहे. या पौराणिक गोष्टीच्या मुळाशीं सृष्टिक्रमांतील धरणीकंपाचा चमत्कार हेंच बीज असलें पाहिजे. परंतु त्या वेळीं हिमालयपर्वत धरणीकंपानें हलविलेला असो, किंवा रावणानें हलविलेला असो, रावणराज्याच्या परिसमाप्तीच्या आधीं कांहीं दिवस कोणत्या तरी कारणानें हिमालयपर्वत हलला होता, एवढी गोष्ट निर्विवाद आहे. त्यानंतरची धरणीकंपाची अनुक्रमवार हकीकत आपल्यामध्यें नसल्यामुळें पुढें आणखी केव्हां केव्हां हिंदुस्थानांत मोठाले धरणीकंप झाले, हें कळण्याला काहीं साधन नाहीं. ; अलीकडच्या धरणीकंपाच्या बारीकसारीक धक्क्यांची हकीकत आपण वर्तमानपत्रांच्या तारांतून मधून मधून वाचीत आलेले आहों परंतु हल्लींचा भूकंप हा त्या सगळयांमध्यें वरिष्ठ होय. या प्रसंगाची हकीकत आम्ही मागील अंकीं दिलेली आहे व त्यानंतर आलेली हकीकत आजच्या अंकांत दुसरीकडे नमूद करण्यांत आलेली आहे. असल्या धरणीकंपासारख्या प्रसंगाची बातमी एक दोन आठवड्यांत कधींही खलास होऊं शकणार नाहीं. कोठें किती नुकसान झालें, किती लोक मेले, आणि किती घरें पडलीं, वगैरेबद्दलची माहिती पुढें पुढेंच जास्त येत जाणार. धरणीकंपामुळें जे भाग मातीखालीं दडपून गेलेले असतात, ते जसजसे उकरून निघतील, तसतशी जास्त माहिती बाहेर येणार हें साहजिकच आहे. परंतु प्रस्तुत प्रसंगीं एकंदर प्राणांची आणि मालमत्तेची किती हानि झाली आहे, आणि ती भरून काढण्यासाठीं सरकारकडून काय प्रयत्न होत आहेत, हे प्रश्न विचार करण्यासारखे आहेत, सबब त्यांकडेच आपण वळूं.

प्राणांची हानि, मालमत्तेचें नुकसान आणि सरकारची मदत या तिहींबद्दलचे आंकडे आजपर्यंत अनिश्चित आहेत आणि ते तसे असणें हें साहजिकच आहे. परंतु आतांपर्यंत प्रसिद्ध झालेल्या आंकड्यावरून एवढें मात्र निश्चित आहे कीं, एकंदर प्राणहानि वीस-पंचवीस हजारांच्याहि वर जाईल. तरीपण वीसपंचवीस हजार मृत्यु म्हणजे हिंदुस्थानांत कांहीं फार आहेत असें नाहीं. असें असतां, या थोड्याशा मृत्यूंबद्दल जिकडे तिकडे एवढा गवगवा झाला आहे याचें कारण काय, याबद्दल कोणालाही आश्चर्य वाटल्यावांचून रहाणार नाहीं. मृत्यूची संख्या अगदीं नेमस्त असून पृथ्वीच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंत जिकडे तिकडे हाकाहाक उडाली आहे, याचें

कारण काय ? राजे, राणी, युवराज, लॉर्ड रॉबर्टस, वगैरे मंडळीकडून कांहीं थोडक्याशा प्राणसहस्रांच्या हानीबद्दल इतक्या धडाधड तारा आल्या त्या कां ? फ्रान्स, जपान, अमेरिका, इत्यादि असंबद्ध ठिकाणींही सहानुभूति उत्पन्न होत आहे, याचें कारण काय ? आजपर्यंत हिंदुस्थानात कधीं कोणी मेलेलेच नाहींत कीं काय, कीं ज्यासाठीं चोहोंकडे इतका हाहाकार उडून जावा ! अथवा इतर कारणांनीं मृत्यु येण्यापेक्षां धरणीकंपानें मृत्यु येण्यामध्यें कांहीं विशेष जादु आहे कीं काय ? हिंदुस्थानांत एक लहानसा धरणीकंप झाल्याबरोबर इंग्लिशांच्या मित्रांनीं व्यापिलेल्या अशा सर्व जगामध्यें जिकडे तिकडे दुःखाच्या धरणीकंपाचे धक्के बसूं लागावे, असें या मृत्यूमध्यें विशेष काय आहे ? हिंदुस्थानांतील एका डोंगरानें कोठें जरा आपलें अंग हलविलें नाहीं, तों जगांतील बहुतेक ठिकाणीं सहानुभूतीचे आणि करुणेचे झरे वाहूं लागावे, असा अपूर्व प्रकार या प्रस्तुतच्या मृत्यूंमध्यें काय आहे ? वास्तविक पाहिलें असतां हिंदुस्थानांतील वीस पंचवीस हजार लोकांचे जीव म्हणजे कांहींच किंमतीचे नाहींत. पंधरा-वीस हजारापेक्षां अधिक लोक जपानच्या एखाद्या भिकार लढाईमध्येंही मरण पावतात ! जेथें पांच सहा महिन्यांच्या सबंध एका दुष्काळांत पांच लाख माणसें मरतात, त्या हिंदुस्थानांत हल्लींच्या इतक्याच एका आठवड्याच्या मुदतींत वीस-पंचवीस हजार माणसें बिनप्रयासानें किती तरी वेळां मरून गेलीं असतील ! पण त्यांना कोणीं कुत्र्यानेंसुद्धां विचारलें नाहीं ! आणि मग याच मृत्यूंबद्दल इतका कळवळा काय म्हणून ? परंतु हिंदुस्थानांतील मृत्यूच्या मोठ्या संख्यांकरितां मागील दुष्काळांइतक्या लांबवरदेखील जाण्याचें काहीं .कारण नाहीं. नुकतेच जे आंकडे प्रसिद्ध झाले आहेत त्यांवरून असें दिसतें कीं, हल्लीं हिंदुस्थानांत चालू असलेल्या प्लेगमुळें फक्त एका गेल्या जानेवारी महिन्यांत १,२६,०४१ लोक मरण पावले. आणि जानेवारी व फेब्रुवारी या दोन महिन्यांत मिळून प्लेगनें एकंदर २,५२,५६७ हतभाग्य लोकांना इंग्रजी राज्याचें सुख सोडून जेथें आगगाड्या नाहींत, तारायंत्रें नाहींत, आणि इंग्रज लोक नाहींत अशा अज्ञेय प्रदेशामध्यें जाणें भाग पडलें ! या मृत्यूच्या चालू गतीवरून पाहिलें, तरी पंचवीस हजार माणसांना मरण्याला सहा तासांपेक्षां फारसे अधिक दिवस लागतील, असें नाहीं. सारांश, हिंदुस्थानांत दररोज प्लेगनें म्हणा, दुष्काळानें

म्हणा, किंवा उपासमारीनें म्हणा, चारपांच हजारांचें हवन सहजगत्या चाललें असतां एखाद्याच आठवड्यांतील मृत्यूबद्दल आपल्या राजेसाहेबांना दुःख वाटावें, राणीसाहेबांकडून पत्र यावें, युवराजांना झोंप येऊं नये, पॅरीसच्या म्युनिसिपालिटीला आधीं दुसरा ठराव सुचूं नये, कर्झन साहेबांनीं फंड सुरू करावा आणि लेडी कर्झनसाहेबांनीं निराश्रितांची शुश्रुषा करण्याचें आपण होऊन पत्करावें, असें या मृत्यूमध्यें अद्‌भुत काय आहे ? ' रोज मरे त्याला कोण रडे ', या न्यायानें जेथें रोज हजारों लोक मरत आहेत आणि जेथें त्यांच्याबद्दल कोणी रडतही नाहीं, तेथें एकाएकीं एका आठवड्यांतील मृत्यूबद्दलच चोहोंकडे इतकी दया पाघळूं लागावी, याचें कारण काय ? जी खरी दया असते, ती परदुःखासाठीं विव्हळते. तें दुःख नवीन युक्त्यांनीं झालेलें आहे, किंवा शिळ्याच साधनांनीं होत आहे, या गोष्टीवर दया अवलंबून नसते. यमधर्मानें मानवी प्राणहरणाची कांहीं नवीन युक्ति काढली म्हणजे मात्र दयेला पाझर फुटावा, आणि प्लेग, दुष्काळ वगैरे सारख्या शिळ्या साधनानीं प्रेतांचे डोंगर पडत असले तरी त्यांच्याकडे दयेनें ढुंकूनसुद्धा पाहूं नये, हा दयेच्या स्वभावांतील मोठा आश्चर्य करण्यासारखा चमत्कार आहे.

तेव्हां हिंदुस्थानांतील लोक रोज हजारों मरत असतां इंग्लिश लोक आजच कां जास्त रडत आहेत, हा एक विचार करण्यासारखा प्रश्न आहे खरा. 'परंतु याचें उत्तर फारसें लांब नाहीं. धरणीकंपाच्या एकंदर हकीकती-मध्येंच याचें उत्तर आहे. हिमालयाचे आणखी कांहीं कडे कोसळले असते, अथवा त्याजवरील झाडें, पांखरें, शेळ्या, गाई, बैल, किंवा नेटिव लोक त्या कड्यांखालीं कितीही गडप झाले असते, तरी इंग्लिश लोकांनीं आपल्या डोळ्यांतील पाण्याचा एक थेंबही वांया दवडला नसता ! पण इंग्लिश लोक मेले हो ! अजून इंग्लिश लोक किती मेले आणि नेटिव लोक किती मेले, हा नक्की आंकडा ठरला नाहीं; तरी पण या प्रसंगीं पुष्कळ इंग्लिश लोक मत्युमुखीं पडलेले आहेत, यांत शंका नाहीं. परंतु या ठिकाणीं कोणी सत्यपणें असें दाखवून देऊं शकेल कीं, आपले इंग्लिश राज्यकर्ते हे फक्त आपल्या इंग्लिश जातभाईकरितांच शोक करीत आहेत, असें नसून कित्येक नेटिव लोकांबद्दलही त्यांना परमावधीचें दुःख होत आहे, हें म्हणणेंही

असत्य आहे असें नाहीं. इंग्लिशांना कित्येक नेटिवांबद्दलही वाईट वाटत आहे, यांत शंका नाहीं. गुरखे लोकांच्या एक दोन पलटणी डोंगराच्या मातीखालीं गडप झाल्या असून त्या गुरखे शिपायांकरितां इंग्लिश लोक फार हळहळत आहेत. आणि गुरख्यांसारख्या अत्यंत उपयोगी नेटिवांकरितां कोणते धूर्त व चाणाक्ष इंग्लिश लोक हळहळ दाखविणार नाहींत ? या दुःखप्रसंगासंबंधानें ज्या अनेक तारा आलेल्या आहेत, त्यांचें वर्गीकरण करून पाहिलें असतां लार्ड रॉबर्ट्स हे हिंदुस्थानचे माजी सेनापति असल्यामुळें गुरखा पलटणींच्या नाशाला अनुसरून त्यांची तार आहे, हें कोणाच्याही लक्षांत येईल. युरोपियन लोक हे पोकळ आणि वरकांति उपचारांचे फार पोकी आहेत. आणि काहीं कमजास्त झालें म्हणजे लगेच आनंदाच्या आणि दुःखाच्या तारा पाठविण्याची सुरुवात करावी, हा त्यांच्यांतील एक बाह्यात्कारी आचारच आहे. ऐन प्रसंगीं राशियाला मोडून देऊन इंग्लिशांचें सख्य संपादणाऱ्या फ्रान्समधील पॅरिसच्या म्युनिसिपॅलिटीचें दुःखप्रदर्शन आणि राजेसाहेबांचें त्यांना ताबडतोब प्रत्युत्तर, ह्या गोष्टी पोकळ आणि वरकांति आचाराच्या सदराखालीं येतात. कारण, जेथें डोळयांत पाणी आल्यावांचून दुःखाचें प्रदर्शन करतां येतें, अशा गोष्टींना उपचाराच्या शिवाय दुसरें सदरच उघडें नाहीं. राजेसाहेब हिंदुस्थानांतील लोकांपासून करच वसूल करून घेतात, म्हणजे पर्यायानें हिंदुस्थानांतील लोकांच्या सुखाबद्दल आनंद आणि संकटाबद्दल दुःख व्यक्त करून दाखविण्याच्या कामागिरीबद्दल त्यांना पगारच मिळत असतो, असें म्हणण्यास हरकत नाहीं. तेव्हां त्यांच्या कडून आणि त्यांच्या राणीसाहेबांकडून आपल्याला तार येणें हें जरूरच होतें. ती आली नसती, तर मात्र ती त्यांच्या राजकीय कर्तव्यकर्मांतील एक अतिशय मोठी शुष्क चूक म्हणून शिष्टसंप्रदायी लोकां-कडून मानण्यांत आलें असतें. युवराजांना तर लवकरच हिंदुस्थानांत यावयाचें आहे. तेव्हां येथील जमीन स्थिर असण्याबद्दल त्यांना जितकी कळकळ वाटेल तितकी दुसऱ्या कोणालाही वाटणार नाहीं. आपल्या गाडीचा भार पडण्याच्या आधींच हिंदुस्थानची भूमि थरथर कांपूं लागली, तर हें चांगलें नव्हे, तेव्हां त्या भूमीचें आणि तिजवरील लोकांचें शांतवन करण्या-करितां युवराजांनीं विलायतेच्या सार्वजनिक पैशांतून कांहीं शिलिंग खर्च

केले, तर तें करणें अप्रासंगिक आहे असें कोण म्हणेल? कर्झन साहेब जे या दयेच्या पाण्यामध्यें डुंबूं लागले, त्यांची मात्र मनोवृत्ति बदलण्याला अगदीं सर्वांहून भिन्न आणि विलक्षण असें कारण झालें आहे. विलायतेंतून एका प्राणांतिक अवस्थेमधून नुकत्याच सुटून आलेल्या त्यांच्या पत्नी लेडी कर्झन ह्या हिंदुस्थानांत या प्रसंगीं तशाच प्रकारच्या दुसऱ्या प्राणांतिक संकटाखालीं सांपडल्या होत्या, त्या ज्या राजवाड्यामध्यें रहात होत्या, त्या राजवाड्याच्या भिंती आणि खांब धरणीकंपानें हालवून पाहिले! सिमल्यास व्हाइसरीगल लॉज बांधतांना एंजिनियर लोकांनीं कांहीं कसूर केलेली नव्हती! पाया अतिशय खोल खणलेला होता! व तो सर्व कांक्रीटनें भरून काढलेला होता! सर्व हिंदुस्थान कोसळेल, परंतु या राजमंदिराला भंग होणार नाहीं, असें सगळ्यांना वाटत होतें! परंतु ईश्वरी क्षोभाची एक लहानशी झुळूक हिमालयाच्या जमिनीखालून एक क्षणभर वहात गेली नाहीं, तोंच मानवी मजबुतीची सगळी घमेंड खालीं कोसळली! लेडी कर्झन ज्या खोलींत होत्या, तिच्या शेजारची खोली घडघडून खालीं आली, आणि त्या जर लवकर बाहेर निघाल्या नसत्या, तर खुद्द त्यांच्या खोलीनेंही त्यांची पुढें फार वेळ त्यांची पाहिली नसती. आपल्या दुःखावरून दुसऱ्याच्या दुःखाची कल्पना चांगली येते, हा नियम प्रस्तुत प्रसंगीं कर्झन साहेबांनीं आपल्या स्वतःच्या आचरणानें खरा करून दाखविला आहे. लेडी साहेबांवर गुदरलेल्या प्रसंगावरून दुसऱ्यांच्या दुःखाची अटकळ बांधून कर्झन साहेबांनीं दहा हजारांचा आंकडा टाकून चटकन् वर्गणीची यादी सुरू केली. अशा प्रकारची या एकंदर दयेच्या महासागराच्या उत्पत्तीची मीमांसा आहे!

हिंदुस्थानांत जो हा अश्रुतपूर्व नव्हे असा कहर गुदरला, त्यामुळें राजा, राणी, युवराज, पॅरिसची म्युनिसिपालिटी, आणि टोकिओ येथील जिंजिशिंपो वर्तमानपत्र यांनाहि जेव्हां दयेनें वेढून टाकलें, तेव्हां आतां विलायतेंतून हिंदुस्थानावर पैशाच्या पाण्याचे नळ एकसारखे किती तरी दिवस वहात रहातील, असें वाटलें होतें व कर्झन साहेबांनींहि मॅन्शन हाऊस फंड नामक विलायतें-तील औदार्याच्या राक्षसाला जागृत करण्याची तार पाठवून भर पार्लमेंटमध्यें धमकी घातली होती! परंतु हिंदुस्थानांतील धरणीकंपानें इतक्या विकोपाला गोष्ट जाऊं दिली नाहीं, म्हणून निभावलें! हल्लीं कर्झन साहेबांनीं स्टेट

सेक्रेटरीकडे असें कळविलें आहे कीं, विलायतची मदत मागण्याचा सरकारचा विचार होता, परंतु आतां त्याची जरूरी दिसत नाहीं. कांहीं साऱ्याची सूट द्यावी लागेल व जनावरें विकत घेण्याकरितां आणि घरें बांधण्याकरितां कांहीं रक्कम तगाईमध्यें खर्च करावी लागेल. परंतु या गोष्टी हिंदुस्थान सरकार हिंदुस्थानच्या करांच्या पैशांतूनच करूं शकेल. त्यांच्यासाठीं विलायतेंतील दानशूर लोकांच्या खाजगी औदार्यावर भार घालण्याचें कांहीं कारण नाहीं. सरकारला ज्या बाबतींत कांहीं खर्च करितां यावयाचा नाहीं, अशा कित्येक कामासाठीं अदमासें ५०,००० पौंड खर्च करावे लागतील. परंतु या क्षुल्लक रकमेसाठीं आपल्या इंग्लंडांतील लोकांना तसदी नको ! ही रक्कम हिंदुस्थानच्या हिंदुस्थानांत सहज रीतीनें उभारतां येईल. अशा अर्थाचा व्हाइसराय साहेबांचा विलायतेस निरोप गेलेला आहे. यावरून हें उघड होत आहे कीं, या हिंदुस्थानच्या धरणीकंपाचे धक्के अजून पुरे झालेले नसून कित्येक देशी खजिन्यात अद्यापि ते बसावयाचे आहेत !

कर्झन साहेबांनीं योजिल्याप्रमाणें या अपघाताच्या शमनाची हिंदुस्थानांतल्या हिंदुस्थानात तजवीज लागणें मोठेंसें अशक्य आहे असें नाहीं. हिंदुस्थानच्या अंगांत अजून पुष्कळ सांपत्तिक सामर्थ्य आहे. युरोपखंडांतील देशांतून पैशाच्या विपुलतेमुळें जें सामर्थ्य असतें तसलें सामर्थ्य हिंदुस्थानांत नाहीं, हें खरें. तरी पण हिंदुस्थान देशाच्या अंगांत पैसा वांचविण्याचें, म्हणजे अर्थात् पैसा मिळविण्याचें (कारण, Money saved is money got) विलक्षण सामर्थ्य आहे ! आणि पैसा मिळविण्याच्या या विलक्षण आणि अश्रुतपूर्व युक्तीवरच हिंदुस्थान देश स्वतः दरसालच्या बजेटांत श्रीमंत राहून दुसऱ्यांनाहि श्रीमंत करीत आहे ! ही पैसा उत्पन्न करण्याची युक्ति हिंदुस्थान-शिवाय दुसऱ्या कोणत्याही देशाला सांपडलेली नाहीं ! इतर कल्पक लोकांनीं पुष्कळ युक्त्या काढल्या असतील; परंतु ही युक्ति हिंदुस्थानशिवाय दुसऱ्या कोणत्याही देशाला सांपडलेली नाहीं ! असली अजब युक्ति फोडणें म्हणजे हिंदुस्थानचें अतिशय नुकसान करण्यासारखें आहे ! तरी पण ह्या युक्तीचा उपयोग कोणत्याही देशांतील लोक स्वार्थासाठीं करून घेतील, अशी बिलकूल भीति नसल्यामुळें ती आपल्या हिंदुस्थानची पैसे मिळविण्याची युक्ति षट्कर्णी करण्याचें आम्ही धाडस

करीत आहों, याबद्दल आमचे देशबांधव आम्हांला क्षमा करतील, अशी आशा आहे. त्या युक्तीच्या ह्या इतक्या लांबलचक प्रस्तावनेवरून ती युक्ति काय आहे, याबद्दल पुष्कळांना मोठी उत्सुकता उत्पन्न झाली असेल. परंतु ती युक्ति अगदीं साधी आहे. ती प्रत्येक मनुष्याच्या अगदीं हातांतली आहे. आणि हिंदुस्थानांतील ल्हान पोराबाळांना आणि अडाणी माणसांनासुद्धां ती अतिशय सफाईदार रीतीनें साधते. गरीब लोक म्हणजे कुचकामाचे, असें आपल्याला वाटतें; परंतु त्यांचा तर ह्या युक्तींत अगदीं हातखंडा! ती युक्ति म्हटली म्हणजे 'न जेवणें' ही होय! न जेवलें म्हणजे पैसे वांचतात, आणि जे पैसे वांचले ते नवीन मिळविल्यासारखेच होत! हिंदुस्थान दरसाल इंग्लंडला तीस कोटी रुपये देतें, ते तें कोठून देतें? हिंदुस्थानची लोकसंख्या जवळ जवळ तीस कोटी आहे; आणि हिंदुस्थानांतील प्रत्येक माणसाचें सरासरीनें उत्पन्न सहा किंवा सात पैसे आहे, त्या मानानें त्यांतून प्रत्येक मनुष्य रोज एक आणा पोटाला खात असला पाहिजे, अशी आपण सामान्य रीतीनें कल्पना करूं. अशा मानाचा हिंदुस्थानांतील एक मनुष्य एक दिवस जेवला नाहीं, म्हणजे एका उपासाबरोबर तो पट्कन् एक आणा कमावतो! या मानानें सर्व हिंदुस्थानानें एक दिवस उपास काढला, तर चट्कन् तीस कोटी आण्यांची रक्कम हां हां म्हणतां उभारली जाते! मोठमोठ्या रकमा उभारण्याची इतकी त्वरित गति दुसऱ्या कोठल्या देशांत उपलब्ध असेल किंवा नाहीं याची शंकाच आहे! हाच हिशोब पुढें चालू केला असतां तीस कोटी रुपयांसारखी अवाढव्य रक्कम हिंदुस्थान देश इंग्लंडला किती सहज रीतीनें देऊं शकतो, हें कोणाच्याही लक्षांत येईल. फक्त सोळा दिवस आणि सोळा उपास! सोळा दिवसांच्या मुदतीची तीस कोटी रकमेची हुंडी पत्करून त्या रकमेची सदर मुदतीमध्यें भरपाई करून देईल असा सावकार हिंदुस्थान देशाशिवाय दुसऱ्या कोठेंही मिळणार नाहीं. इंग्रजांच्या सुखकारक अमलाखालीं हिंदुस्थानची लोकसंख्या भराभर वाढत असल्यामुळें लवकरच तो आंकडा बत्तिस कोटीपर्यंत जाईल. त्या मानानें पाहिलें असतां रोज एका उपासासरशीं दोन कोट रुपये उभारण्याची हिंदुस्थानची ताकद आहे! असल्या ह्या प्रचंड सांपत्तिक सामर्थ्यामुळें हिंदुस्थानाला इंग्लंडचें धाटेल तें हित सहज लीलेनें साधून देतां येतें.

इतर देशांना ज्या मोठ्या भयंकर रकमा वाटतात व ज्या गोळा करणें बहुतेक देशांना अशक्यच वाटतें, त्या रकमा म्हणजे हिंदुस्थानच्या हाताचा मळ आहे ! इतर देशांना दहा दहा हजार रुपये पगार म्हणजे अतिशय मोठा वाटतो; परंतु त्यांत काय आहे ! हिंदुस्थानांतील एखाद्या सुमारें दीड-लाख वस्तीच्या शहरानें एक दिवस उपास केला कीं, लागलींच दहा हजार रुपये पगाराची मिसल ! अशा ह्या विलक्षण सामर्थ्यामुळें इतर देशांना अतिशय जड जाणाऱ्या अशा मोठमोठ्या लढायांचेंही हिंदुस्थानाला कांहीं वाटत नाहीं ! थोडे वर्षांपूर्वी वायव्येकडील सरहद्दीवर आफ्रिडी लोकांपाशीं हिंदुस्थाननें इंग्लिशाच्या हौसेसाठीं एक लढाई केली, हें सर्वांना माहितच आहे. या लढाईला सव्वीस लक्ष पौंड खर्च झाले. पण या एवढ्या मोठ्या रकमेबद्दल हिंदुस्थानला किती थोडा आयास पडला आहे पहा ! फक्त दोन एकादश्या ! हिंदुस्थानच्या तीस कोटी लोकांनीं दोन दिवस उपास करून आफ्रिडी लोकांना ठार मारण्याकरितां लागणारी रक्कम एकदम इंग्लिशांच्या हातांत दिली. सोमालीलँडमधील लढाईचीहि हिंदुस्थानच्या या अलौकिक सामर्थ्यापुढें फारशी प्रतिष्ठा नाहीं ! त्या लढाईला सुमारें एकंदर पंचवीस लक्ष पौंड खर्च आलेला आहे. त्यापैकीं हिंदुस्थानच्या वांट्यास फारच थोडा आलेला असेल. आणि त्याला काय ! एक पुरी सकष्टीसुद्धां लागणार नाहीं ! तिबेटी लोकांपाशीं झालेली लढाई आणि रशियन लोकापाशीं होणारी लढाई यांच्या खर्चाचे अदमास दुर्दैवानें अजून तयार नाहींत. नाहीं तर रशियन स्वारीचा प्रचंड बागुलबुवा म्हणजे आमच्या किती एकादश्यांचें काम आहे, हें बरोबर काढून हिंदुस्थानच्या फडनिसांची काळजी दूर करण्याला उशीर लागला नसता ! राज्याभिषेकाच्या वेळीं दिल्लीस फार खर्च झाला म्हणून एक ओरड आहे. पण हिंदुस्थानच्या तीस कोटी कुबेरांनीं त्या लहानग्या खर्चाच्या प्रीत्यर्थ एखाद दुसरी एकादशी केली म्हणजे झालें. तसेंच, आपले युवराज हिंदुस्थानांत येणार आहेत म्हणून पुष्कळांना खर्चाची भीति पडली आहे. परंतु त्यांच्या प्रवासाला तरी असें काय लागणार ! एक दोन एकादशांपेक्षां जास्त कांहीं बोजा एकंदरींत हिंदुस्थानच्या लोकांवर पडेल असें दिसत नाहीं. आणि आपल्या राजांच्या खातर कांहीं थोडेबहुत उपास काढण्याचा फार प्राचीन काळापासून आपल्यांत रिवाज चालत आलेला आहे. अयो-

ध्येच्या राजासाठीं आणि मथुरेच्या राजासाठीं हिंदुस्थानांतील लोक उपास करीत नाहींत ? सारांश, राजासाठीं उपास करण्याची आमच्यामध्यें चालच आहे. याकरितां इंग्लंडच्या प्रिन्स ऑफ वेल्ससाठींही येथील लोकांना कांहीं उपास काढावे लागले, म्हणून त्यांत कांहीं मोठेंसें बिघडतें असें नाहीं. आणि शिवाय या अर्वाचीन उपोषणांपासून परमार्थ साधून आणखी चाकरी, बढती, पदवी वगैरे ऐहिक स्वार्थहि साधतो !

अशा प्रकारची हिंदुस्थानच्या अंगामध्यें विलक्षण द्रव्यशक्ति आहे ! एका उपासानें हिंदुस्थान देश दोन कोटी रुपये शिल्लक पाडूं शकतो, या हिशोबाप्रमाणें हिंदुस्थान देशानें लागोपाठ तीनशें पासष्ट दिवस उपास केले, तर तो संपत्तिमान् देश सात अब्ज तीस कोटी रुपयांची रास इंग्लिशांच्या समोर घालूं शकेल ! केवढी ही संपत्ति ! हिंदुस्थानच्या जमिनींतील संपत्ति बरीच नाहींशी झाली आहे खरी; परंतु संपत्तीच्या ह्या नवीन खाणी अलीकडे सांपडल्या आहेत ! हिंदुस्थानांतील तीस कोटी उपाशी पोटांच्या लहानशा टीचभर खळग्यामध्यें परमेश्वरानें इतकी संपत्ति सांठवून ठेवलेली असेल, ही गोष्ट कोणत्याही भूगर्भशास्त्रवेत्त्याच्या आजपर्यंत लक्षांत आलेली नव्हती ! हिंदुस्तानांतील लुच्चे लोक आपली संपत्ति कोठें दडवून ठेवतील याचा कांहीं एक अदमास नाहीं. 'पोट' ह्या खोट्या आणि बाह्यात्कारी नांवाखालीं बनविलेल्या कातड्याच्या पिशवीच्या कप्यांतून आणि कानाकोपऱ्यांतून आणि चोरखणांतून इंडियन लोकांनीं दडवून ठेवलेले पैसे बाहेर काढण्याला इंग्लिशांसारखेच कुशल लोक भेटले म्हणून चांगलें झालें ! एरव्हीं ही गुप्त संपत्ति कधींहि बाहेर निघाली नसती ! आणि ब्रिटिश जग ह्या अवाढव्य निधीला फुकट आंचवलें असतें ! काय ही द्रव्य दडवण्याची खुबी ! वाळलेले हातपाय, बुबुळें नसलेले डोळे, खळग्यांत गेलेले गाल, सुकलेलीं तोंडें, भकाळ्या पडलेलीं पोटें, सूर्य, वायु व वरुण या देवतांचें सदोदित आगत स्वागत करणाऱ्या अशा झोंपड्या, फुटकीं भांडीं, रिकाम्या कणग्या, चिंध्यांना ठिगळें लावलेलीं वस्त्रें, भिक्षेच्या झोळ्या, रोगांची दुर्गंधी आणि मृत्यूचा शेजार, यांच्याखालीं इतकी अलोट संपत्ति हिंदुस्थानांत दडविलेली असावी आणि एका उपासाबरोबर त्यांखालून दररोज दोन कोट रुपये उभारले जावे हें खरोखर जगांतील एक अदृष्टपूर्व आश्चर्य आहे !

असो. हिंदुस्थानचें सांपात्तिक सामर्थ्य अशा प्रकारचें असल्यामुळें कांग्रा, पालनपूर, धरमशाला वगैरे ठिकाणच्या अनाथ यूरोपियन, गुरखे वगैरे लोकांना मदत करण्याला हिंदुस्थानाला फारसे मोठे प्रयास पडणार आहेत असें नाहीं. व्हाइसरॉय साहेबांचा अदमास या कामीं पन्नास हजार पौंड लागतील असा आहे. आणि पन्नास हजार पौंड म्हणजे तर हिंदुस्थानाला कांहींच नाहीं ! नुसत्या एका पंजाबांतील लोकांनीं जरी एखादा सोमवार किंवा प्रदोष केला, तरी भागणार आहे ! कारण पंजाबांतील लोकवस्ती दोन सव्वा दोन कोटींच्या जवळ जवळ आहे. इतक्या लोकांना पन्नास हजार पौंड म्हणचे फक्त अर्ध्या उपासाचें काम आहे !

---

## स्वदेशभक्तीची व्याख्या : : : ३

काळ : अग्रलेख ता. २८-४-१९०५

●आज खरेंही वाटणार नाहीं, पण गोडीगुलाबीचें सरकारचें मन वळवून सल्लागार मंडळांत प्रविष्ट व्हावें हीच त्या वेळच्या सन्मान्य राजकारणाची कृतकृत्यता होती.

हिंदुस्थानांतील जे लोक विलायतेस जाऊन राहिले आहेत ते हिंदुस्थानच्या सांप्रतच्या स्थितीसंबंधानें विचार करण्याकरितां तेथें कधीं कधीं एकत्र जमत असतात. अशा एका प्रसंगीं बरेच इंडियन लोक व मि. वेडरबर्न, मि. दादाभाई नौरोजी, मि. ओडोनेल, मि. हिंडमन वगैरे मंडळी गोळा झाली असतां तेथें हिंदुस्थानच्या अनेक विषयांची चर्चा निघाली. त्या प्रसंगीं बोलतांना मि. हिंडमन यांनीं असें सांगितलें कीं, हिंदुस्थान हा देश पूर्व काळीं फार मोठा

होता व पुढें येणाऱ्या कालींही तो देश अतिशय मोठा होण्याचा संभव आहे. परंतु हल्लीं हिंदुस्थानावर इंग्लिश लोकांचें जें राज्य आहे, तें असेपर्यंत हिंदुस्थानाला मोठें होतां यावयाचें नाहीं. बाकीच्या ज्या इंडियन लोकांचीं त्या वेळीं भाषणें झालीं, त्यांच्याही बोलण्याचा हाच ओघ होता. मि. ओडोनेल यांच्याही सांगण्यांतील भावार्थ असाच होता कीं, इंग्लिशांचें वर्चस्व आणि हिंदुस्थानचा मोठेपणा या दोन गोष्टी हिंदुस्थानांत एकाच वेळीं कधींही असूं शकणार नाहींत. परंतु या विलायती मतांत काय विशेष अर्थ आहे, हें कळणें मात्र कठीण आहे. कारण, हिंदुस्थानातील तीस कोटी लोकांपैकीं प्रत्येक मनुष्याला हिंदुस्थानांत इंग्लिशांचें वर्चस्वच असणें जरूर आहे, असें मनापासून वाटत आहे. अशा स्थितींत इंग्लिशांचें वर्चस्व आणि हिंदुस्थानचा मोठेपणा हीं दोन्ही समकालीन असूं शकणार नाहींत, असें सांगण्यांत काय मतलब आहे? मि. दादाभाई नौरोजी हेही सदर प्रसंगीं हजर होते, व त्यांनीं असें सांगितलें कीं, हिंदुस्थानांतून दरवर्षी जे कोट्यवधि रुपये विलायतेस जातात, त्यांच्या योगानें हिंदुस्थान उत्तरोत्तर अधिकाधिक भिकारी होत चाललें आहे, या गोष्टीकडे हिंदुस्थानांतील तरुण प्रजाजनांनीं नेहमीं आपलें लक्ष लाविलें पाहिजे. हा मि. दादाभाई यांचा उपदेश सर्वांनीं खरोखर लक्षांत ठेवण्यासारखा आहे. याच प्रसंगीं मि. दादाभाई यांनीं स्वदेशभक्तीसंबंधानें आणखी एक विधान केलें असल्याचें प्रसिद्ध झालें आहे. मि. दादाभाई म्हणतात कीं, Patriotism means making an end of foreign rule. हें जें तत्त्व मि. दादाभाई यांनीं इंग्लंडमध्यें प्रतिपादन केलें आहे, त्यांतील अर्थ असा आहे कीं, परकीय राजसत्तेची परिसमाप्ति म्हणजे स्वदेशभक्ति होय. हिंदुस्थानांत मि. दादाभाई हे सर्वांना पूज्य आहेत. त्यांचीं मतें तीं सर्व हिंदुस्थानचीं मतें आणि त्याचे उद्‌गार ते सर्व हिंदुस्थानचे उद्‌गार, अशी आजकालची स्थिति आहे. विलायतेंतील मि. दादाभाई यांच्या विचारांवरून हिंदुस्थानांतील लोक आपल्या विचारांना वळण लावीत असतात. कांग्रेसचे ठराव आणि कॉन्फरन्सेसमधील भाषणें यांच्यामध्यें मि. दादाभाईंच्या विचारांचीं जागोजागीं प्रतिबिंबें उमटलेलीं असतात. आपल्या नेभळेपणाच्या हलकट मताला दुसऱ्याच्या वजनानें जडपणा आणण्याचा नेमस्त लोकांवर जो पावलोपावलीं

प्रसंग येतो, त्या प्रसंगीं ते लोक नेहमीं आपल्या समर्थनासाठीं दादाभाईच्या नेमस्त मतांकडे बोट दाखवीत असतात. आपल्या नेभळटपणावर अशा रीतीनें दादाभाईच्या नेमस्तपणाचें पांघरूण घालणाऱ्या मंडळींना आमची एवढीच विनंति आहे कीं, मि. दादाभाई यांनीं देशाभिमानाची जी वर दिलेली व्याख्या केली आहे, तिचा अर्थ मेहरबानीनें त्यांनीं हिंदुस्थानांतील आम्हां लोकांना त्यांच्या मतानें काय होतो तो सांगावा. परकीय अम्मलाची परिसमाप्ति करणें म्हणजे स्वदेशभक्ति होय, हें जें तत्त्व मि. दादाभाई यांनीं विलायतेंत प्रतिपादन केलें आहे, त्याचा आपल्या नेमस्तपणाशीं इकडील नेमस्त मंडळी कसा काय मेळ बसवितात, ही एक पाहण्यासारखी गोष्ट आहे. आमच्या मतानें मात्र ह्या वरील लक्षणांत फारसा दोष आहे असें नाहीं. हें स्वदेशभक्तीचें लक्षण अगदीं यथायोग्य आहे. परंतु त्याचा अर्थ मात्र आम्हीं थोड्याशा निराळ्या रीतीनें करणार आहों. हिंदुस्थानांत जें इंग्लिश लोकांचें परकीय राज्य आहे, त्याचा नाश करणें, म्हणजे खरी स्वदेशभक्ति होय, असा या वाक्याचा जो उघडा अर्थ दिसत आहे, तो अर्थ जर कोणी घेईल, तर त्याच्यापासून मात्र आमचें मत अगदीं भिन्न आहे. हिंदुस्थानच्या इंग्लिशांच्या राजकीय सत्तेवर घाला घालणें म्हणजे स्वदेशभक्ति होय, असा जो सरळ अर्थ वरील वाक्यापासून निघत आहे, तोच अर्थ जो कोणी घेऊन बसेल, तो या कामीं फसेल यांत शंका नाहीं. हिंदुस्थानांत तो अर्थ मि. दादाभाई यांनासुद्धां अभिप्रेत नसला पाहिजे. तेव्हां इंग्लिशांच्या राज्यासंबंधानें कांहीं भलत्याच गोष्टी मि. दादाभाई हे प्रतिपादन करीत आहेत, असा कोणीही अर्थ समजूं नये व आपल्या मनाचा विनाकारण गैरसमज करून घेऊं नये. स्वदेशभक्ति करा, असें प्रत्येकजण सांगेल. परंतु ती स्वदेशभक्ति करून इंग्रजी सत्तेला अपाय करा, असें कोणीही सांगणार नाहीं, इतकी इंग्रजी सत्ता अद्यापि कोणालाही नकोशी झाली नाहीं. स्वदेशाची भक्ति करण्याचा हिंदुस्थानांतील प्रत्येक मनुष्याला अधिकार आहे. परंतु त्या अधिकाराचा दुरुपयोग करण्याचा अधिकार कोणालाही नाहीं. इंग्लिशांच्या चालू अमलाखालीं हिंदुस्थानांतील लोकांना जसें लागावें तसें सुख लागत नाहीं, तक्रारी पुष्कळ आहेत, परदेशीं पैसा फार जातो, मोठ्या चाकऱ्या नेटिवांना मिळत नाहींत, वगैरे सर्व गोष्टी जरी खऱ्या असल्या,

तरी इंग्लिशांचें राज्य हिंदुस्थानांतील प्रत्येक मनुष्याला अजून कांहीं दिवसपर्यंत तरी पाहिजे आहे. बारीकसारीक बाबतींत कोणाचें कसेंहि मत असले, तरी या प्रश्नासंबंधानें सर्वांचें एकच मत आहे. व मि. दादाभाई ह्यांनींही हिंदुस्थानांत इंग्लिशांचें राज्य अजून कांहीं वेळपर्यंत पाहिजे असल्याचें अनेक वेळां बोलून दाखविलेलें प्रसिद्ध आहे. अशा वस्तुस्थितीमध्यें देशभक्तीच्या वरील व्याख्येचा जो उत्तानार्थ दिसतो तोच मि. दादाभाई यांना अभिप्रेत असला पाहिजे, असें कसें म्हणतां येईल? परिस्थितीनें मुख्यार्थ बाधित होत आहे. म्हणून अर्थातच देशभक्तीच्या वरील लक्षणाचा दुसरा लाक्षणिक अर्थच आपण घेतला पाहिजे. आणि तो अर्थ खालींलप्रमाणें होय : परकीय सत्तेची परिसमाप्ति करणें एवढे शब्द ऐकले, म्हणजे उल्लू लोकांच्या मनांत भलतीच कल्पना आणि इंग्लिश लोकांच्या मनांत भलतीच भीति उत्पन्न होते. परंतु परकीय सत्तेची परिसमाप्ति करण्याला शस्त्राची धार हाच एक मार्ग आहे असें नाहीं. आणि म्हणून असल्या व्याख्या ऐकल्याबरोबर हिंदुस्थान देशांतील परकीय राज्यकर्ते जे इंग्लिश लोक त्यांनीं विनाकारण गडबडून जाण्याचें कांहींएक प्रयोजन नाहीं. कारण, परकीय सत्तेची परिसमाप्ति करण्याचा एकच मार्ग आहे असें नाहीं. दुसरेहि अनेक मार्ग आहेत. आणि ते इंग्लिशांनींच आम्हांला शिकविलेले आहेत. त्यांपैकीं एका मार्गाचें अवलंबन करण्याविषयीं मि. दादाभाई यांनीं सदर व्याख्येच्या रूपानें इंडियन लोकांना उपदेश केलेला आहे. परकीय सत्ता, परकीय सत्ता, म्हणजे काय आहे? हल्लीं हिंदुस्थानावर परकीय राज्य आहे म्हणजे काय आहे? तर सिमल्यास किंवा कलकत्त्यास कांहीं दहा पांच इंग्लिश लोक जिला कौन्सिल असें म्हणतात, अशा एखाद्या खोलीमध्यें बसतात, आणि हिंदुस्थानचा शेतसारा अशा अशा रीतीनें वसूल करावा, हिंदुस्थानचा दुष्काळ अशा अशा रीतीनें टाळावा आणि हिंदुस्थानचें संरक्षण अशा अशा रीतीनें करावें, वगैरे गोष्टी आपल्या मताप्रमाणें ठरवितात; यालाच आपण हिंदुस्थानावरील परकीय लोकांची सत्ता असें म्हणतो. आणि परकीय सत्ता याचा जर एवढाच अर्थ आहे, तर त्या परकीय सत्तेची परिसमाप्ति म्हणजेहि कांहीं मोठी भयंकर गोष्ट आहे असें नाहीं. सिमल्यास ज्या खोलीमध्यें वरील गोष्टींचा विचार करण्यासाठीं दहा इंग्लिश लोक बसतात, त्या खोलींत दहाच्या दहा

इंग्लिश लोक न बसतां सहा नेटिव लोक आणि चार इंग्लिश लोक बसले, म्हणजे झाली परकीय सत्तेची परिसमाप्ति ! त्यांत कांहीं मोठा बाऊ नाहीं ! या गोष्टींत शस्त्र नाहीं, युद्ध नाहीं, खून नाहीं, रक्तपात नाहीं, अंगावर शहारे उठण्यासारखें कांहींएक नाहीं; गोडीगुलाबी, हांसतमुख, प्रेम, अन्योन्य-विश्वास, आणि शांतता यांच्याशिवाय यांत दुसरें काय आहे ? इतक्या सुलभ उपायांनीं परकीय सत्तेची परिसमाप्ति होणें शक्य आहे, इतकेंच नव्हे, तर ती हिंदुस्थानांत याच मार्गानें हळूहळू घडून येत आहे. कॉंग्रेसचे प्रयत्न याच दिशेनें आहेत आणि लोकांचे विचार याच महत्त्वाकांक्षेवर आसक्त झालेले आहेत. या सगळ्या परिस्थितीवरून परकीय सत्तेची परिसमाप्ति याचा अर्थ आम्ही वर दिल्याप्रमाणें समजतों; व लोकांनींहि तो अशाच रीतीनें समजावा, हें श्रेयस्कर आहे. स्वदेशभक्तीची मि. दादाभाईप्रमाणें व्याख्या करितां येईल किंवा नाहीं, हा प्रश्न निराळा आहे. परंतु ती त्यांनीं तशा रीतीनें केल्यानंतर त्या व्याख्येचा जर हिंदुस्थानांत अर्थ करावयाचा असेल, तर तो अशाच रीतीनें केला पाहिजे.

---

## हॉर्सपॉवरच्या पराभवाचा निष्फळ झालेला प्रयत्न ४

काळ : अग्रलेख ता. १९-५-१९०५

● जनशक्ति जागृत व कार्यक्षम झाल्याशिवाय शासनसंस्थांचा कांहीं उपयोग नाहीं.

एखादें मूल बाल्यावस्थेमध्यें असतें तेव्हां त्याला कोणतीहि गोष्ट थोडी पुरते. परंतु तें मूल जसजसें मोठें होत जातें, तसतशा सर्व गोष्टी त्याला मोठ्या प्रमाणावर लागूं लागतात; आणि जगाचीही तशीच स्थिति आहे. अज्ञानाच्या

किंवा रानटीपणाच्या स्थितींतील जग म्हणजे बाल्यावस्थेंतील जग होय. आणि त्याच जगांत सर्व गोष्टींत सुधारणा होऊं लागली म्हणजे त्या जगाला प्रौढावस्था प्राप्त झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. अशा प्रौढ स्थितींतील जगाला थोड्या प्रमाणावर कोणतीही गोष्ट चालत नाहीं. हल्लींच्या सुधारणेच्या काळांतील कित्येक गोष्टींकडे नजर फेंकली असतां जिकडे तिकडे मोठें प्रमाण आपल्या दृष्टोत्पत्तीस येईल. अर्वाचीन काळांतील विजेचा दिवा, वाफेचें यंत्र, किंवा मशीनगन इत्यादि वस्तु घेतल्या तर त्या काय आहेत? अनेक लहान लहान वस्तु मिळून ह्या मोठ्या वस्तु तयार झालेल्या आहेत. पूर्वी एका लहानशा मेणबत्तीचा प्रकाश लोकांना पुरत होता; परंतु आतां लोकांच्या वाढत्या गरजेला अनुसरून दिव्याचा प्रकाशही वाढला आहे. हल्लींच्या दिव्याचे प्रकाश हे कँडल पॉवरवर मोजले जातात आणि त्याप्रमाणें कित्येक दिवे शंभर दोनशेंहूनही अधिक कँडलपॉवरचे असतात. सारांश, हल्लींचा एक मोठा दिवा म्हणजे शंभर, दोनशें, चारशें, वगैरे अनेक मेणबत्त्या मिळून झालेला एक दिवा होय. त्याचप्रमाणें परिणामाच्या दृष्टीनें पाहिलें असतां एक मशीनगन म्हणजे तीन चारशें बंदुकांचा एक समुदाय आणि अशाच दृष्टीनें अलीकडील सर्व यांत्रिक कल्पनांकडे पाहतां येण्यासारखें आहे. एक कापसाची गिरणी म्हणजे लाखों कोष्टयांचा जमाव होय. आणि एक लोखंडाचा कारखाना म्हणजे लाखों घिसाड्यांचीं दुकानें होत. हीं सगळीं यंत्रें बहुधा वाफेच्या जोरावर चालतात आणि वाफेची शक्ति मोजण्यालाही अलीकडच्या शास्त्रज्ञांनीं असेंच एक कोष्टक शोधून काढलें आहे. ते वाफेची शक्ति हॉर्सपॉवरनें मोजतात. सरासरी तीन माणसें जितकें काम करतील तितकें काम करण्याला एक घोड्याची शक्ति पुरेशी होईल, असा अदमास धरून तेवढ्या शक्तीला एक हॉर्सपॉवर असें त्यांनीं नांव दिलेलें आहे व ह्या प्रमाणावर त्यांनीं वाफेच्या यंत्रांच्या शक्ति अजमावून ठेविल्या आहेत. एखादें वाफेचें एंजिन दहा हॉर्सपॉवरचें असतें, एखादें शंभरचें असतें, आणि एखादें पांचशेंहूनही अधिक हॉर्सपॉवरचें असतें. जगाच्या बिनसुधारलेल्या स्थितीमध्यें इतक्या पुष्कळ हॉर्सपॉवरची शक्ति एके ठिकाणीं आणून तिजपासून अवाढव्य काम करून घेण्याची आवश्यकता नव्हती. परंतु अनेक लोक एकत्र होऊन जेव्हां अद्भुत आणि प्रचंड कामें करण्याला

प्रवृत्त झाले, तेव्हां त्यांना असल्या अद्भुत आणि प्रचंड शक्तीचीही आवश्यकता उत्पन्न झाली, एकेकट्यानें काम करण्याची पद्धत मागें पडली आणि पुष्कळ लोक एकत्र जमून एकच काम करण्याला प्रवृत्त झाले. आणि तेव्हांपासून या अनेक हॉर्सपॉवरच्या एंजिनांचें अस्तित्व सुरू झालें. परंतु सुधारणेच्या काळांत सुधारलेले लोक जड वस्तूंचीं कामें ज्याप्रमाणें एकत्र जमून करतात, त्याचप्रमाणें बुद्धीचीं कामेंही अनेक लोक एकत्र जमून करीत असतात. आणि म्हणूनच त्यांच्यामध्यें बुद्धीचेंही सामर्थ्य विशेष असलेलें आढळून येतें. ज्याप्रमाणें शेंकडों हॉर्सपॉवरची आगगाडी एका घोड्याच्या गाडीपेक्षां अधिक माल थोड्या वेळामध्यें ओढून नेईल, त्याचप्रमाणें एका डोक्यातील बुद्धीपेक्षां शेंकडों डोक्यांतील बुद्धि एकत्र झाली तर ती तितक्या पटीनें अधिक सामर्थ्यवान् होईल, हें उघडच आहे. ही बुद्धीची शक्ति कशी मोजावी, याच्याबद्दलचें एखादें कोष्टक सुधारलेल्या लोकांनीं अद्यापि शोधून काढिलेलें नाहीं. परंतु मनुष्याच्या बुद्धीच्या मोजमापासाठीं अशी कांहीं स्वतंत्र योजना झाली नाहीं तोंपर्यंत, जडशक्ति मोजण्याला त्यांनीं जें हॉर्सपॉवरचें कोष्टक लाविलें आहे, तेंच आपण इकडे बुद्धीच्या मोजमापासाठीं उपयोगात आणिलें, म्हणून फारशी हरकत आहे असें नाहीं. शिवाय सुधारलेला मनुष्य आणि घोडा यांच्यामध्यें साम्यही असतें. कारण दोहोंमध्यें पशुवृत्ति बहुतेक सारखीच आढळते ! या कारणास्तव अशा प्रकारच्या सुधारलेल्या एका मनुष्याची एक बुद्धि एक हॉर्सपॉवरबरोबर आहे, असें कोष्टक कल्पून चालल्यास कोणत्याही बाजूनें मोठीशी हरकत आहे असें नाहीं. अशा या बुद्धीच्या हॉर्सपॉवरचीं कित्येक एंजिनें सुधारलेल्या लोकांनीं उपयोगामध्यें आणलेलीं आहेत, हें सर्वांना माहीत असेलच. सुधारणाशिरोमणी आपले इंग्लिश लोक यांनीं बुद्धीचीं अनेक कामें करण्यासाठीं विलायतेस असें एक बऱ्याचशा हॉर्सपॉवरचें एंजिन बनविलेलें आहे. याला ते पार्लमेंट असें म्हणतात. हें एंजिन फक्त सात वर्षेंच टिकावें आणि त्यानंतर तें मोडून टाकावें, असा इंग्लडांतील नियम आहे. हें सुमारें ६७० हॉर्सपॉवरचें एंजिन आहे. हें सात वर्षांनीं मोडून टाकावें, असा जरी नियम आहे, तरी तें एखादे वेळीं तितक्या मुदतीपर्यंत मुळींच टिकत नाहीं. परंतु बाल्फर साहेबांसारखा एखादा लोचट एंजिनियर भेटला तर

तें एंजिन आंतून सगळें मोडकळीस आलेलें असलें, तरी तो आपल्या नोकरीच्या लोभासाठीं त्यावरच काम ढकलीत राहिलेला असतो. फ्रान्स-मधील एंजिन ५८४ हॉर्सपॉवरचें असून त्याची टिकण्याची मुदत फक्त चार वर्षांचीच आहे. जर्मनीची महत्त्वाकांक्षा जरी हल्लीं वाढत चालली आहे तरी तेथील बुद्धीचें काम करण्याचें एंजिन फक्त ४५५ हॉर्सपॉवरचेंच आहे. युरोपांतील प्रमुख राष्ट्रांपैकीं बाकी उरलेला जो रशिया देश त्या देशामध्यें आजपर्यंत असलें एंजिन तयार झालेलें नव्हतें; परंतु आतां तेथें त्याची आवश्यकता भासूं लागली आहे, व तें तेथें लवकरच तयार होईल असा संभव दिसत आहे. युनायटेड स्टेट्समध्यें ४५० हॉर्सपॉवरचें एंजिन आहे. परंतु तें टिकाऊपणाला अगदींच कमी आहे. त्याच्यावर जेमतेम दोन वर्षें जातात. पूर्वेकडील पॅसिफिक समुद्राच्या पाण्यामध्यें पश्चिमेकडील वरच्या बाजूच्या इंग्लंडचें जणूं काय प्रतिबिंबच पडलें आहे, असा ज्याच्याविषयीं साश्चर्य भास होतो, असा जो जपान देश, त्याच्यामध्येंही बुद्धीचें काम करणाऱ्या या पाश्चिमात्य यंत्राचें प्रतिबिंब उठलेलें आहे. जपानांतील बुद्धीचें काम करणारें एंजिन ६०० हॉर्सपॉवरचें असून त्याला चार वर्षेंपर्यंत भीति नसते.

वरील वाक्यांतून बुद्धीचें काम करण्याचें एंजिन वगैरे स्थळीं बुद्धि हा एकच शब्द वापरण्यांत आलेला आहे. परंतु या शब्दामध्यें अनेक गोष्टींचा समावेश होतो, हें कोणीही विसरतां कामा नये. हीं पाचपांचशें सहासहाशें हॉर्सपॉवरचीं एंजिनें युरोपखंडामध्यें बसून बुद्धीचीं काय काय कामें करितात, ह्याचें निरीक्षण केलें असतां वरील वाक्यांतून बुद्धि हा शब्द किती व्यापक आहे, हें कोणाच्याही लक्षांत येईल. वरील स्थळीं सामान्यतः बुद्धीचें काम म्हटलें म्हणजे खोटें बोलून तें खऱ्यासारखें दाखविणें, लबाडी, लुच्चेगिरी, कपट, विश्वासघात, बेइमानपणा, वचनभंग, इत्यादि गोष्टी आचरणें, परकीय राज्यें आणि द्रव्यें लुबाडून घेणे, लाखों लोकांना केवळ आपले गुलाम करून ठेवणें, लोकांना अन्न अन्न करून उपाशी मरण्याची पाळी आणणें, निरुपद्रवी लोकांशीं लढाया करून त्यांचे खून करणें, वगैरे होय. अशा रीतीनें बुद्धि या शब्दामध्यें अनेक गोष्टी अंतर्भूत झालेल्या आहेत.

आतां बुद्धि या शब्दाचें हें व्यापक स्वरूप पाहून व बुद्धीच्या कामाचा

हा अर्थ पाहून कोणी अशी शंका काढतात कीं, हीं जर बुद्धीचीं कामें असतील, तर असली बुद्धि मोजण्याला हॉर्सपॉवरचें कोष्टक हें अगदीं प्रयोजक होय. अलिकडचे कित्येक सुधारलेले पाश्चिमात्य लोक कित्येक कामांत केवळ पशूप्रमाणें वागतात आणि घोडे हेही पशूच आहेत. या साहश्यावरून युरोपिअन लोकांच्या बुद्धीचें काम मोजण्याला हॉर्सपॉवरचें कोष्टक लावणें योग्य होतें; इतकेंच नव्हे, तर हॉर्सपॉवरच्या ऐवजीं बीस्टपॉवर ( Beast Power, पशुशक्ति ) या नांवानेंही त्यांच्या बुद्धीचें मोजमाप केलें गेलें असतें, तरी कांहीं त्यांत फारसा विसंगतपणा आला नसता. परंतु अमुक हॉर्सपॉवरची बुद्धि असें तोंडानें म्हणावयाचें आणि ती बुद्धि काम करणार असत्य भाषण, लबाडी, लुच्चेगिरी, कपट, विश्वासघात, राज्यापहार, द्रव्यापहार, जुलूम, रक्तपात, खून वगैरेंचें; हें मात्र अगदीं विसंगत आहे. कारण, घोडा जरी पशु आहे तरी तो कधीं खोटें बोलत नाहीं. एकदां दिलेलें वचन बदलण्याला प्रवृत्त होण्यापेक्षां त्याला देवानें वाचा दिली नाहीं हें फार उत्तम होय ! सर्गकाळीं बहुधा पश्चिमेकडे देवानें मनुष्य प्रथमतः निर्माण केला असावा. परंतु तो खोटें बोलतो असें आढळून आल्यामुळें वाचाशक्ति बंद करण्याची सुधारणा करून त्यानें बहुधा पशु मागून निर्माण केले असावे. त्यांपैकीं घोडा हा सुधारून तयार केलेला एक पशु होय. तो कधीं खोटें बोलत नाहीं, कोणाला फसवीत नाहीं, कोणाशीं कपट करीत नाहीं, त्याच्या मनांत एक असून तो बाहेर दुसरेंच कधीं दाखवीत नाहीं, तो कोणाचीं राज्यें लुबाडून घेत नाहीं; डोळ्यांत धूळ टाकून कोणाचें द्रव्य हरण करीत नाहीं, कधीं व्यापार करीत नाहीं. त्याच्या जुलुमानें कोणीही संतप्त झालेले नाहींत; किंवा त्याच्या हातून ,कधीं कोणाचे रक्तपात आणि खून झालेले नाहींत. कारण, त्याचें साम्राज्यच नाहीं, किंवा त्याचा व्यापार नाहीं. किंवा त्याला त्याच्या निशाणाची इभ्रत जाईल अशी भीतिही नाहीं; युरोपियन लोकांच्या तुलनेनें पाहिलें असतां घोडा हा पशु म्हणजे शुद्ध साधुपुरुष होय; किंबहुना, घोडा हा त्यांच्या मानानें त्यांच्यांतील प्रत्यक्ष येशु ख्रिस्तच होय, असें म्हटलें असतांही अतिशयोक्ति होणार नाहीं, इतका तो निरुपद्रवी पशु आहे. अशा निरुपद्रवी, प्रामाणिक, पवित्र, कधींही असत्य न बोलणाऱ्या आणि सज्जन पशूचें युरोपियन लोकांच्या

बुद्धीशीं अप्रत्यक्ष रीतीनें सादृश्य वर्णन करावयाचें म्हणजे त्या सज्जन पशूची योग्यता कमी करण्यासारखें आहे! अशा स्थितीमध्यें युरोपियन लोकांच्या बुद्धीचीं कामें हॉर्सपॉवरच्या कोष्टकानें मोजणें अगदीं अप्रशस्त आहे. त्याच्यापेक्षां त्यांच्या बुद्धीचें काम 'फॉक्स पॉवर' नें (कोल्ह्याची शक्ति) मोजलें असतां तें जास्त सयुक्तिक होईल! त्या इतिहास-प्रसिद्ध पाश्चिमात्य लबाडीच्या बुद्धिकौशल्याची बरोबरी तर कोणीच करूं शकणार नाहीं, हा आपला कमीपणा सर्वांनीं कबूल केला पाहिजे. परंतु देवाच्या घरीं झालेल्या लबाडीच्या वांटणीच्या वेळीं जर त्या सद्‌गुणसमुद्राचे कांहीं थेंब दुसऱ्या कोणाच्या वांटणीस आले असतील, तर ते फक्त कोल्ह्याच्या आलेले आहेत. पण याच्याबद्दलदेखील कोणाजवळ कांहीं प्रत्यक्ष पुरावा आहे असें नाहीं. फक्त इसापच्या शब्दावर भरंवसा ठेवून आजपर्यंत लोक कोल्ह्याच्या अंगांत कांहीं थोडीबहुत लबाडी असते असें म्हणत आलेले आहेत. परंतु इसापनें प्राणिशास्त्रवेत्त्यांच्या दीर्घकालीन शोधावरून आपलें मत बनविलें असलें पाहिजे असें जरी धरलें, तरीसुद्धां कोल्ह्याच्या अंगांत लबाडीची बुद्धि फारशी असेल असें नाहीं. सरासरीनें एक हजार कोल्ह्यांची लबाडी एकत्र करावी तेव्हां तरी ती जेमतेम एका पाश्चिमात्य बुद्धीच्या बरोबरीला येईल किंवा नाहीं, याच्याबद्दलही वादविवाद आणि भांडणें उपस्थित झाल्यावांचून राहणार नाहींत! तरी पण सामान्य गरजेसाठीं एक हजार कोल्ह्यांची लबाडी म्हणजे एक पाश्चिमात्यबुद्धि, असें कोष्टक बनविण्याला कोणी शास्त्रज्ञ फारसे विरुद्ध जातील असें नाहीं. या मानानें हॉर्सपॉवरच्या जागीं फॉक्सपॉवरचें कोष्टक उपयोगांत आणावयाचें असेल, तर जेथें ६०० हॉर्सपॉवरचें बुद्धीचें काम करणारें एंजिन असेल, तेथें तें एंजिन ६,००,००० फॉक्सपॉवरचें आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. वरील आक्षेपामध्यें आक्षेपकांची ही जी फॉक्सपॉवरबद्दलची कल्पना आहे, ती फारशी सभ्यपणाची, नेमस्तपणाची आणि भारदस्तपणाची आहे असें नाहीं. आणि म्हणून आम्हांला ती कल्पना मुळींच मान्य नाहीं. आतां बोलणाराच्या तोंडाला हात लावतां येत नाहीं, म्हणून कोणाला वाटल्यास त्यांनीं फॉक्सपॉवरच्या कोष्टकाचा उपयोग करावा. परंतु आज जगांतील सर्व यंत्रांच्या शक्तीची ज्या हॉर्सपॉवरनें मोजदाद चाललेली आहे, त्याच

हॉर्सपॉवरचें कोष्टक बुद्धीच्या यंत्राच्या शक्तीचें परिगणन करण्याला स्वीकारावें, हें आम्हांला योग्य वाटतें.

आपले परम लोकप्रिय राज्यकर्ते इंग्लिश लोक विलायतेस जेथें सर्व ब्रिटिश साम्राज्याचा राज्यकारभार पहात आहेत, तेथील त्यांचें बुद्धीचें काम करणारें एंजिन ६७० हॉर्सपॉवरचें आहे, हें पूर्वी सांगितलेंच आहे. या एंजिनमधून तयार करून ब्रिटिश साम्राज्यांतील निरनिराळ्या ठिकाणांना त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें निरनिराळ्या जातींचीं बुद्धीचीं एंजिनें देण्यांत येत असतात. युनायटेड स्टेट्स हा पूर्वी ब्रिटिश साम्राज्याचा एक भाग होता. ते लोक आपल्याकरितां असें एक स्वतंत्र बुद्धीचें काम करणारें यंत्र मागत होते. परंतु त्यांना तें देण्याला इंग्लिश लोक खुषी नव्हते. त्यामुळें दोघांचीं भांडणें झालीं. त्या भांडणात सर्व कांहीं जाऊन धुपाटणें हातीं आल्यामुळें, आपल्या साम्राज्यांतील लोकांच्या पात्रतेप्रमाणें त्याना हीं बुद्धीचीं यंत्रें देण्याचें इंग्लिश लोकांनीं अलीकडे एक मत प्रदर्शनार्थ प्रचलित करून टविलेलें आहे. ऑस्ट्रियातील लोक है गोरे असल्यामुळें थोडे वर्षांपूर्वी त्यांना इंग्लिशांनीं असलें एक बुद्धीचें यंत्र करून दिलेलें आहे, परंतु तें चालविण्या-करितां एक इंजिनिअर मात्र इंग्लिश लोक विलायतेहून मुद्दाम पाठवीत असतात. ट्रान्सवालच्या रक्तानें ओल्या झालेल्या पडद्यावरही इंग्रजी जादूच्या कंदिलाच्या ( मॅजिक लँटर्नच्या ) साधनानें ह्या यंत्राचें प्रतिबिंब पाडून दाखविण्याचा इंग्लिश लोकांचा हल्लीं प्रयत्न चालू आहे. व हिंदुस्थानांतील लोक जर अशीं पडद्यावरील चित्रें पाहण्याला पात्र आणि योग्य होतील, तर कधीं काळीं हिंदुस्थानच्या पडद्यावरही खऱ्या चित्रांचीं अशीं प्रतिबिंबें आम्ही पाडून दाखवूं, अशी मोठमोठ्या इंग्रजी मुत्सद्यांचीं हिंदुस्थान देशालाही अभिवचनें मिळालेलीं आहेत ! परंतु अलीकडे हिंदुस्थानांत केर आणि अंधेर हेच आधीं फार झालेले आहेत ! वास्तविक इंग्रजी राज्यामध्यें निदान अंधेर तरी नसला पाहिजे, अशी सर्वांची खात्री आहे. परंतु केर आणि अंधेर यांचें तूर्त इकडे प्राबल्य माजलें आहे, असें दिसतें खरें. कारण, सगळ्या महत्त्वाच्या बाबी एकीकडे ठेवून आधीं हिंदुस्थानांत केर काढण्याचीं आणि दिवे लावण्याचींच यंत्रें पाठविण्याची आपल्या धूर्त आणि विचारी राज्यकर्त्यांना आवश्यकता वाटली आहे ! हीं

यंत्रें त्यांनीं हिंदुस्थानांतील सर्व मोठमोठ्या शहरांकरितां पाठविलीं आहेत. कारण, निदान सर्व हिंदुस्थानांतील केर आणि अंधेर नाहींसा झाला नाहीं, तरी मोठमोठ्या शहरांत तरी निदान घाण आणि अंधेर असणें इष्ट नाहीं, असें त्यांना वाटलें असलें पाहिजे. हीं केर काढण्याचीं यंत्रें म्हणजे केरसुण्या असतील आणि दिवे लावण्याचीं यंत्रें म्हणजे गंधकाच्या काड्या असतील, असें कदाचित् कोणा बिनसुधारलेल्या गांवढळाला वाटण्याचा संभव आहे; परंतु तसें मुळींच नाहीं. हीं सुधारलेल्या विलायतेंतून सुधारलेलीं केर काढण्याचीं आणि दिवे लावण्याचीं यंत्रें आलेलीं आहेत! या यंत्रांना म्युनिसिपॉलिटी हा पारिभाषिक शब्द लावण्यांत येतो. निरनिराळ्या शहरांच्या लोकसंख्येच्या मानानें ह्या यंत्राची हॉर्सपॉवर ठरविण्यांत आलेली असते. कारण जितकी लोकसंख्या कमी किंवा जास्त तितका त्यांचा मैला, केरकचरा वगैरेही कमी किंवा जास्त. सबब तो सगळा वाहून नेण्याला तेथील इंजिनची हॉर्सपॉवरही त्या मानानें कमी किंवा जास्त असणें, हें यंत्रशास्त्रातील नियमाला अनुसरूनच आहे.

परंतु या ठिकाणींही वरच्याप्रमाणेंच कोणी आक्षेपक असा आक्षेप आणतात कीं, या प्रस्तुत स्थळींसुद्धां हॉर्सपॉवर या शब्दाची योजना बरोबर नाहीं व आपल्या म्हणण्याच्या समर्थनार्थ ते असें सांगतात कीं, मैला आणि केरकचरा वाहून नेण्याचें काम घोड्याचें नाहीं. गाढव, बैल, वगैरे जातीचीं जनावरें या कामाकरितां बहुतकरून उपयोगांत आणिलीं जातात. तेव्हां अशा प्रकारच्या यंत्राचें काम मोजावयाचें असेल, तर तें हॉर्सपॉवरनें न मोजतां ॲसपॉवर (Ass Power गाढवाची शक्ति) किंवा ऑक्सपॉवर (Ox Power बैलाची शक्ति) यांनीं मोजावें. पूर्वीच्या प्रसंगीं फॉक्सपॉवर हें जें साधन सुचविलेलें आहे, त्याच्याशीं ऑक्सपॉवर या शब्दाचें अनुप्राससादृश्य विशेष जुळत असल्यामुळें पश्चिमेची बुद्धि फॉक्सपॉवरनें आणि पूर्वेचे काबाडकष्ट ऑक्सपॉवरनें मोजले गेले असतां, ही ऑक्सपॉवरची आणि फॉक्सपॉवरची कोष्टकांची जोडी फारच उत्तम शोभेल. मात्र आपल्या पूर्वेकडील एक मनुष्याचें केरकचरा साफ करण्याचें काम फक्त एकाच ऑक्सपॉवरबरोबर होईल, असें कोणीं समजतां कामा नये. कारण, या कामावर जे लोक नेमले जातात, ते उत्तम उत्तम असतील असेच पाहून

निवडले जातात व ते एकदां या कामावर नेमले गेले म्हणजे कधींही टंगळ-मंगळ करावयाचे नाहींत. बैलांची गोष्ट तशी नाहीं. कचरा साफ करण्यासाठीं बैलांना बोलाविलें तर ते कधीं बोलावलेल्या वेळीं यावयाचे नाहींत, आणि गाडीला जुंपलें तर मध्येंच थांबतील, इकडेच पहातील, तिकडेच पहातील आणि फुकट वेळ गमावतील. परंतु या कामावर नेमलेलीं माणसें कधींही हयगय करावयाचीं नाहींत. लागेल तितका वेळ खपतील, तहान म्हणणार नाहींत, भूक म्हणणार नाहींत, आणि शहरांत एखादा मोठा साहेब यावयाचा असला, तर रस्ते साफ करतांना आपल्या जिवाकडेही पहावयाचे नाहींत ! हीं कामें इमानें इतबारें केल्याबद्दल कित्येकांना सर्टिफिकिटें मिळालेलीं आहेत. आणि तीं कामें त्यांना उत्तम रीतीनें करतां येतात, म्हणून फिरून त्यांना त्याच कामावर नेमलें जातें. अशा उत्तम आणि नांवाजलेल्या प्रतीचे जे लोक त्यांपैकीं एका माणसाचें काम फक्त एका बैलाच्या कामाबरोबर होय, असें कसें म्हणता येईल ! असें म्हणणें म्हणजे त्याच्या सर्व काबाडकष्टांचें मातेरें करण्यासारखें आहे ! असला एक मनुष्य म्हणजे निदान भीतभीत दहा बैलांच्या तरी बरोबर समजला गेला पाहिजे ! आणि अशा हिशोबाप्रमाणें जर एखादे ठिकाणीं केरकचरा साफ करण्याचें ५०० ऑक्सपॉवरचें एंजिन असलें, तर तेथें असलीं इमानें इतबारें काम करणारीं फक्त पन्नास माणसें कामाला लावलीं म्हणजे काम भागण्यासारखें आहे. आक्षेपकाच्या ह्या सूचनेमध्यें एक अनुप्रासालंकाराची मजा आहे, व कदाचित् वस्तुस्थितीशींही त्यांनीं सुचविलेल्या नांवांचा थोडासा मेळ असेल. परंतु त्या बिचाऱ्याला हें ठाऊक नाहीं कीं, विलायतेकडे मैल्याच्या आणि केरकचऱ्याच्यासुद्धां गाड्या ओढण्याला घोडेच लावीत असतात ! आणि हॉर्सपॉवर वगैरेची कल्पना ही तिकडीलच असल्यामुळें तिकडील परिस्थितीला अनुलक्षून खरा असलेला हॉर्सपॉवर शब्दाचा प्रयोग आपल्या इकडेहि तसाच चालू ठेवणें हेंच आम्हांला जास्त इष्ट वाटतें. सबब हॉर्सपॉवरचीच परिभाषा कायम ठेवणें हें युक्त होय.

ह्या परिभाषेप्रमाणें पाहिलें असतां मुंबई शहरांतील केर आणि अंधेर दूर करण्याकरितां देण्यांत आलेलें एंजिन सुमारें ७५ हॉर्सपॉवरचें आहे. आणि अशाच मानाचीं एंजिन्स इतर ठिकाणींहि आहेत. पुण्याच्या लोकवस्तीच्या

मानानें येथील ३८ हॉर्सपॉवरचें एंजिन येथें उत्पन्न होणारीं कामें करण्याला कांहीं कमी प्रतीचें आहे, असें नाहीं. ही इंडियांतील केरकचरा काढण्याचीं यंत्रें सुमारें तीन वर्षें टिकतात. आणि त्या मुदतीनंतर तीं फिरून नवीन तयार करावीं लागतात. हीं केराचे खटारें ओढण्याचीं नवीन यंत्रें तयार करतेवेळीं ह्या अवाढव्य जोखमाचा आणि वजनाचा गाडा चालविण्याकरितां त्याला कित्येक लोक लावावे लागतात. ज्या माणसांना येथें कामाला लावावयाचें त्यांना त्यांच्या जागीं जाण्याकरितां दोन तीन निरनिराळ्या वाटा मुद्दाम राखून ठेवलेल्या असतात. ह्या गाडा ओढण्याची नवीन तयारी होऊं लागली, म्हणजे प्रथमतः प्रत्येक जण त्या कामाबद्दल आपली नाखुषी व्यक्त करीत असतो. त्या कामाविषयीं नाकें मुरडीत असतो, ' आपली हौस झाली, आतां आपल्याला तें नको, ' असें म्हणत असतो, व ' तें केर काढण्याचें आणि दिवे लावण्याचें भिकार काम कोण करतो ? ' अशी तिरस्कारबुद्धिहि व्यक्त करीत असतो ! या त्यांच्या भाषणावरून हे लोक फिरून त्या केरकचऱ्याच्या गाड्याला जुंपले जाणार नाहींत, असें एखाद्या भोळसर आणि बिनअनुभवी मनुष्याला वाटतें. परंतु ऐन वेळ येऊन ठेपली कीं, ही सगळी मंडळी कोठल्या तरी दरवाजानें आंत घुसून जोखडाजवळ जमा होतात सगळ्याना एकदम आंत घुसतांना गर्दी होऊं नये आणि कांहीं तरी व्यवस्था रहावी, यासाठीं मुद्दाम दोन तीन निरनिराळे दरवाजे राखून ठेविलेले असतात. ह्यांपैकीं एक दरवाजा सरकारनें आपल्या मर्जीतील आणि आपल्या उपयोगी पडणाऱ्या हुषार लोकांकरितां राखून ठेवलेला असतो, व दुसरी वाट लोकांच्या खिल्लाराकरितां मोकळी सोडलेली असते. आतां वास्तविक जे लोकांच्या दरवाजानें जाऊं इच्छितात किंवा जातात, त्यांनीं सरकारच्या दरवाजानें न जाण्याचा अभिमान ठेविला पाहिजे; व ज्यांना सरकार आपल्या दरवाजानें आंत घेतें, ते लोकांच्या दरवाजासमोर आले तर त्या दरवाजाला कडी पडली पाहिजे. परंतु सामान्य लोकांना विशेष ज्ञान नसल्यामुळें इतका निग्रह रहात नाहीं. आणि शिवाय असें होतें कीं, प्रथमतः लोकांचा दरवाजा उघडला जातो. त्यांतून सरकारचे पोसणे जितके आंत जाऊं शकतील तितके जातात. आणि मग बाकीचीं लोकांच्या वतीचीं माणसें

जातात. कारण, लोकांच्या दरवाजांतून लोकांचीं आणि सरकारचीं दोघांचींहि माणसें गेलीं तरी चालतात. सरकारच्या दरवाजांतून मात्र सरकारच्या माणसांशिवाय दुसऱ्या कोणीहि जातां कामा नये ! अशी स्थिति असल्यामुळें, बहुतेक सरकारचीं माणसें प्रथमतः लोकांच्या दरवाजांवर गर्दी करतात. परंतु तेथून आंत घुसतां आलें नाहीं, तर पट्कन दुसऱ्या कोठल्या तरी दरवाजांतून, खिडक्यांतून, जाळींतून, फटींतून, कोंठून तरी पण ते आंत उडी टाकून येतात. आपल्या कळपांतील एखादा म्होरक्या आतां येत नाहीं, असें वाटून त्याचे साथीदार अगदीं निराश झालेले असतात. परंतु तो अशा कांहीं विलक्षण युक्त्या करतो कीं, तेथें कोणाची कांहीं अक्कल चालत नाहीं, आणि कर्ण जसा कुंतीच्या कानांतूनच बाहेर आला, त्याप्रमाणें तो कोणाच्या तरी कानाला लागून त्यांतून पट्कन् आपल्या कळपांत येऊन पडतो ! अशानें कोठून कांहीं जमलें नाहींच, तर पगार न घेतां फुकट चाकरी करण्याला तयार होऊन तरी निदान कोणी त्या गाड्याच्या जोखडाखालीं आपली मान घालण्याला हजर होतो. सारांश, नवीन गाडा चालू होण्याचे वेळीं कोठून तरी सर्व निढावलेली मंडळी एकत्र जमा होतात. लोकांमध्यें हा गाडा ओढण्याची जोंपर्यंत इतकी अहमहमिका आहे, तोंपर्यंत हीं स्थानिक स्वराज्याचीं सरकारनें लोकांना दिलेलीं यंत्रें अव्याहतपणें चालण्याला कोणतीहि हरकत पडणार नाहीं. या कामांत इकडील लोक उत्तरोत्तर प्रवीण होत चालले आहेत. व त्यांनीं असेंच प्रावीण्य संपादन केल्यास सरकार इकडील लोकांना हळूहळू अधिक हक्क दिल्यावांचून कधींहि सोडणार नाहीं ! आणि असें होईल, तर त्यामध्यें आपल्या लोकांचें एकंदरींत कल्याणच आहे.

असो, तूर्त जगामध्यें ज्या अनेक घडामोडी चालल्या आहेत, त्यांत पाश्चिमेकडील लोक ( वरील आक्षेपकांच्या अनुप्रासयुक्त परिभाषेप्रमाणें ) फॉक्सपॉवरनें आणि पूर्वेकडील लोक ऑक्सपॉवरनें आपआपल्या वांट्याला आलेलीं कामें इमानेंइतबारें करून जगाची समता, सृष्टीचें सुख आणि ईश्वराचा संकेत हीं परिपूर्ण करीत आहेत; अशी ही शांततेची, समाधानाची आणि सलोख्याची स्थिति पूर्वपश्चिम सर्वत्र पसरलेली पाहून कोणालाहि आनंद वाटल्यावांचून राहणार नाहीं !

---

## पहिला देशद्रोही : : : ५

काळ : स्वतंत्र-लेख, ता. २६-५-१९०५

● मुसलमान तेवढे राजनिष्ठ—असें ठरवून त्यांना असंतुष्ट हिंदूंपासून अलग करण्याचा पायंडा याच सुमारास सुरू झाला. देशद्रोहाची रक्तपिती दोघांच्याहि रक्तांत आहे.

एक हिंदु आणि एक मुसलमान अशा दोन स्नेह्यांचे हिंदुस्थानच्या मागील आणि प्रस्तुतच्या कित्येक गोष्टीसंबंधानें नेहमीं वादविवाद होत असत. कधीं कधीं त्यांच्या रात्रीच्या रात्री असल्या विषयांच्या भांडणामध्यें निद्रेवाचून जात असत. दोघेहि हिंदुस्थानच्या संबंधानें पूर्ण स्वदेशभक्त होते; व त्यामुळें मागें आपल्या हातून काय चुका झाल्या आणि आतां यापुढें आपण आपल्या देशाच्या उन्नतीसाठीं काय केलें पाहिजे, या धोरणावर त्यांची सर्व चर्चा चाललेली असे. इंग्लिश लोकांनीं हिंदुस्थान जिंकण्यासाठीं आपल्या पदरीं जीं सैन्यें ठेविलीं होतीं त्यांत विश्वासघाताचीं सैन्यें फार अवाढव्य होतीं, व तीं सैन्यें अजूनहि कायम आहेत. या त्यांच्या विश्वासघाताच्या सैन्यानें हिंदुस्थानचें फार नुकसान केलें आहे. आणि याकरितां जर पुढें हिंदुस्थानचें कांहीं हित व्हावें असें कोणाला वाटत असेल, तर हीं विश्वासघाताचीं पलटणें आधीं बंद झालीं पाहिजेत. कारण, आपणच लोक आपल्या एकमेकांच्या चाहड्या सांगतों, एकमेकांचे विश्वासघात करतों, आणि हें करणें वाईट आहे. अशा प्रकारचा एकदां त्या दोघां मित्रांमध्यें वादाचा विषय निघाला असतां, त्या दोघांपैकीं तो मुसलमान गृहस्थ म्हणाला : ‘ या विश्वासघाताच्या कामांत तुम्ही हिंदु लोकच फार पुढें सरसावलेले आहां. आणि आम्ही मुसलमान जसे

शिक्षणामध्यें मागासलेले, तसे विश्वासघातामध्येंहि मागासलेले आहों. तुमच्यामध्यें विश्वासघाताच्या उदाहरणांनीं तर अगदीं कहर करून सोडला आहे. अलीकडे तुमच्यामध्यें नेटिव राज्येंच न उरल्यामुळें व १८५७ सालीं खाल्लेल्या नेटिव राज्यांच्या लाडवांपासून इंग्लिश सरकारला झालेलें अजीर्ण अजून मोडलें नसल्याकारणानें तुमच्यांतील विश्वासघातकी सभ्य गृहस्थ बारीक सारीक प्राण्यांचा विश्वासघात करून तूर्त आपला चरितार्थ चालवीत आहेत. परंतु या तुमच्या लोकांनीं पूर्वीं फार मोठमोठीं अवदानें मारलेलीं आहेत. कोणतेंहि राज्य जावयाचें असलें, म्हणजे तें बुडविण्याला दहा पांच हिंदु सभ्य गृहस्थ मदतीला असावयाचेच ! बाजीरावाचें राज्य कोणीं दवडलें ! त्याचें राज्य दवडण्याला त्याच्याच सारखें जानवें घालणारे किती थोर थोर हिंदु सरदार रात्रंदिवस झटत होते ! रणजितसिंगाच्या मरणानंतर खालसा मुलखाचें आणि सैन्याचें जें लवकरच वाटोळें झालें, तें शीख लोकांपैकींच कित्येक पुढाऱ्यांनीं केलेलें नाहीं काय ? तेजसिंग यानें इंग्लिशांची मर्जी संपादण्याकरितां आपलें उत्तम प्रतीचें शीख सैन्य लढाईमध्यें मुद्दाम मारवून टाकिलें, असल्या गोष्टी अंगावर शहारे आणीत नाहींत काय ? शीख लोक हे हिंदु आहेत काय, असा एक प्रश्न अलीकडे उपस्थित झाला आहे; ते कोणीहि असोत. ते मुसलमान न ठरोत म्हणजे झालें. कारण, ज्या लोकांत तेजसिंगासारखीं स्वराज्याशीं विश्वासघात करणारीं माणसें निर्माण झालेलीं आहेत, त्या लोकांचा आमच्या मुसलमानी धर्माला विटाळ न व्हावा अशी माझी इच्छा आहे.'

हिंदु:—कोणत्याच धर्माला अशा लोकांचा विटाळ होऊं नये, हें फार जरूर आहे. परंतु तुमचा धर्म असल्या लोकांच्या विटाळापासून अलिप्त राहिलेला नाहीं. मुसलमानांमध्येंहि विश्वासघाताचीं ठळक उदाहरणें आहेत. परंतु त्या सर्वांतील श्रेष्ठ आणि पहिलें उदाहरण अतिशयच घाणेरडें असें आहे. तुम्हांला माहिती नसेल तर सांगतों ऐका ! सुराजउद्दवला याचें बंगाल, बहार आणि ओरिसा या तिन्ही प्रांतांवर राज्य होतें. तें राज्य आज कोठें आहे ? आणि तें कोणीं बुडविलें ? प्लॅसीच्या लढाईचें श्रेय क्लाईव्ह साहेबांना दिलें जात आहे तें व्यर्थ आहे. प्लॅसीची लढाई मीरजाफरनें जिंकली. इंग्लिशांना पहिल्यानें मीरजाफरनें आपल्या घरामध्यें घेतलें. त्या

तुमच्या मीरजाफरसारखा विश्वासघातकी प्राणी दुसरा कोणीहि नसेल. बाजीरावाचें किंवा रणजितसिंगाचें राज्य बुडविणारे आमच्यांतील विश्वासघातकी योद्धे तुमच्या त्या मीरजाफराच्या पासंगालाहि पुरावयाचे नाहींत. मीरजाफर हा निमकहरामपणाच्या पंथांतील आदिगुरु होय. त्यानें फक्त बंगालप्रांतच क्लाईव्हच्या हातीं दिला असें नव्हे, तर आपला सर्व हिंदुस्थान देश त्यानें परकीय लोकांच्या हवालीं केला. कोणाचे कोण आणि कोठून आलेले इंग्लिश लोक, आणि त्यांच्यासाठीं या नराधमानें आपल्या नबाबाचा बळी त्यांच्यापुढें दिला! क्लाईव्ह साहेबांनीं सुराजउद्दवल्याला प्लॅसीच्या रणभूमीवर जिंकण्याच्या पूर्वी त्याला त्याच्या दरबारामध्यें त्यांनीं जिंकून ठेविलें होतें. नबाबाच्या दरबारांतील मिरजाफर, यार लतीफखान आणि राजा दुल्लभराम हे लोक क्लाईव्ह साहेबांनीं आपल्या एजंटमार्फत आधींच फितूर करून ठेविले होते. व नबाबाची छावणी कोठें आहे, त्याच्यापाशीं सैन्य किती आहे, आणि क्लाईव्ह साहेबांनीं त्याला कोठें गांठून त्यांजवर हल्ला करावा, याबद्दलची गुप्त माहिती मीरजाफर दररोज इंग्लिशांकडे पाठवीत होता. तरी पण इतकें कपट करूनसुद्धां त्या शूर क्लाईव्ह साहेबांची नबाबाशीं लढाई करण्याची छाती होईना. जेव्हां खुद्द प्लॅसीच्या रणांगणावर दोघा सैन्यांची गांठ पडली, तेव्हांदेखील क्लाईव्ह साहेबांना जयाची आशा नव्हती. व रात्र पडेपर्यंत कसा तरी वेळ काढून रात्रीं एकदां चोरून हल्ला करून पहावा, नाहीं तर प्लॅसीच्या मैदानावरून निघून जावें, येथपर्यंत शौर्याची मजल येऊन ठेपलेली होती! नबाबाचें सैन्य सुमारें पन्नास हजार होतें. इतक्या सैन्याचा थोड्याशा सैन्याकडून विश्वासघाताच्या शिवाय दुसऱ्या शौर्यानें पराभव होणें शक्य नव्हतें. नबाबाचा मुख्य सेनापति मीरमुद्दीनखान आणि त्याचा मित्र मोहनलाल हे अतिशय शौर्यानें आणि प्रामाणिकपणानें लढत होते. व मीरमुद्दीनखानानें तर बरीच शिकस्त केली होती. परंतु त्याला एक तोफेचा गोळा लागून तो मरण पावला. इतक्यांत हिंदुस्थानच्या दुर्दैवानें तेथें सुमारें एक तासपर्यंत जोराचा पाऊस पडला, अथवा पाऊस पडला असें म्हणण्यापेक्षां, आतां आपली आर्यभूमि कांहीं दिवसपर्यंत परकीयांच्या ताब्यांत जाणार, हें पुढील भविष्य अंतर्ज्ञानानें जाणून, आकाशांतील देवता ढळढळां रडल्या, असें

म्हटलें असतां वावगें होणार नाहीं ! त्या पावसामुळें नबाबाच्या त्या भिजलेल्या दारुगोळ्यानें ऐन वेळीं फारच मोठा दगा केला. परंतु मीरजाफरप्रमाणें निदान लांच खाऊन तरी त्यानें आपल्या धन्याशीं दगा केला नव्हता, एवढें त्या दारूगोळ्याविषयीं प्रांजलपणें कबूल केलें पाहिजे ! अशीं चोहोंकडून संकटें आलेलीं पाहून नबाबानें मीरजाफरला बोलावून आणिलें व आपल्या डोकीचें पागोटें काढून तें त्याच्या पुढें ठेवून नबाबानें सांगितलें कीं, " जाफर, ही पगडी तूं सलामत ठेविली पाहिजेस. " याच्यापेक्षां राजानें आपल्या हाताखालील मनुष्याची आणखी विनवणी ती काय करावयाची ! परंतु त्या निमकहराम मागाला आपल्या नबाबाच्या पगडीची, आणि महंमदी धर्माची, किंवा आपल्या हिंदुस्थान देशाची यत्किंचित्‌हि दया आली नाहीं ! माझ्यानें होईल तेवढें करून मी तुमचें राज्य राखतों, असें अभिवचन देऊन, जाफरनें नबाबाची पगडी त्याच्या डोक्यावर ठेविली, व इकडे माघारा येऊन अशा संधींत हल्ला करण्याविषयीं क्लाइव्ह साहेबांकडे त्या विश्वासघातक्यानें निरोप पाठविला ! आपल्या मतानें मीरजाफरला आपल्या बाजूला वळविल्यानंतर नबाब सुराजउद्दवला राजा दुल्लभराम याच्याकडे गेला. हा दुर्लभराम खराच ! याच्यासारखा विश्वासघातकी राम दुसरीकडे कोठें मिळावयाचाच नाहीं ! आपलें स्वराज्य जातें, अशा दुर्धर प्रसंगीं आपल्या नबाबाला दोन धैर्याच्या आणि शहाणपणाच्या गोष्टी सांगावयाच्या, परंतु तसें कांहीं एक न करतां यानें नबाबाला असा सल्ला दिला कीं, या वेळीं तुम्ही आपल्या सैन्याला थोडेंसें मागें हटण्याविषयीं हुकूम देऊन तुम्ही येथून निघून जा, म्हणजे आम्ही सरदार आणि सेनापति मंडळी रणांतून जय घेतल्यावांचून माघारें फिरतच नाहीं ! नबाब वयानें लहान व समजुतीनें अजाण असल्यामुळें वरीलप्रमाणें हुकूम देऊन आपण स्वतः एका उंटावर बसून व आपल्याबरोबर दोन हजार सैन्य घेऊन मुर्शिदाबादेकडे निघून गेला. इकडे नबाबाचीं सैन्यें त्याच्या हुकुमावर मागें हटलीं आणि मीरजाफर आपलें सैन्य घेऊन क्लाईव्ह साहेबांच्या बाजूला मिळाला. परंतु ह्या गोष्टी होत असतां प्लॅसीच्या मैदानावर दुसरा एक चमत्कार घडून येत होता. हे हिंदुस्थानच्या पोटीं जन्मास आलेले हिंदुस्थानचे पुत्र व नबाबाचें अन्न खाल्लेले त्याचे पिढीजाद

इमानी नोकर अशा रीतीनें खाल्ल्या घरचे वासे मोजीत असतां फ्रान्स देशामध्यें जन्मास आलेला सेंट फ्रेज या नांवाचा कोणी एक नबाबाचा इमानी स्नेही एका बुरजामध्यें बसून नबाबाचें राज्य आणि हिंदुस्थान देश बचावण्याचा प्रयत्न करीत होता! परंतु हिंदुस्थानांतील विश्वासघातकी लोकांनीं त्याचा निरुपाय करून सोडला. आणि अखेरीस प्लॅसीच्या रंगभूमीवर छिनाल विजयश्रीनें निमकहरामपणाच्या गळ्यामध्यें माळ घातली! पण मिरजाफरचा कृतघ्नपणा येथेंच थांबला नाहीं. सुराजउद्दवल्याचें राज्य आपल्याला मिळण्यासाठीं त्यानें आपल्या धन्याला एके रात्रीं मारेकऱ्यांकडून गुप्त रीतीनें ठार मारून टाकलें! असलीं भयंकर कृतघ्नपणाचीं कृत्यें करणारे लोक मुसलमानांमध्यें होऊन गेलेले आहेत. परंतु इतका कृतघ्नपणा आकाशांतील देवतांना खपला नाहीं. कारण, पुढें लवकरच त्या मिरजाफरचा मुलगा मिरान याच्या डोक्यावर विद्युत्पाताचा प्रहार करून मोठ्या गडगडाटानें आकाशातील क्षुब्ध झालेल्या देवतांनीं सर्वांना असें जाहीर केलें कीं, इतःपर असला देशद्रोह, स्वामिद्रोह, आणि निमकहरामपणा कोणींहि करतां कामा नये! तरी पण, मित्रा, अलीकडे आपल्या देशांतील लोक पापकर्मामध्यें इतके धीट झाले आहेत कीं, देवाच्या विद्युद्-गर्जनेच्या शब्दांनीं दिलेली इशारतसुद्धां कोणी जुमानीत नाहींसे झाले आहेत. देशद्रोहाच्या कामांत इतके निढावलेले हे लोक जागे व्हावेत म्हणून पाताळांतील देव येथील मोठमोठ्या पर्वतांचीं शिखरें हालवून पहात आहेत! तरीहि कोणाचे डोळे उघडत नाहींत. असल्या या आपल्या देशाचे याहून आणखी अधःपात काय काय व्हावयाचे आहेत कोण जाणें! असले आपले लोक आहेत! आणि त्यांमध्यें मुसलमानांचा अपवाद आहे असें नाहीं.

मुसलमान:—बस्स! बस्स! मित्रा, पुरे कर. तूं मला ही हकीकत सांगितली नसतीस तर फार चांगलें झालें असतें. तूं मला हें काय सांगितलेंस! मी आतांपर्यंत फार सुखांत होतों! मी समजत होतों कीं, हिंदुस्थानच्या पोटीं जन्म घेतलेल्या लोकांपैकीं निदान माझे जातिबांधव तरी या देशद्रोहाच्या पातकानें कलंकित झालेले नसतील. या वेळेपर्यंत मला माझे मुसलमान या देशकृत्याच्या बाबतींत मोठे देशभक्त वाटत होते. व अशा देशभक्त लोकांबद्दल मला मोठा अभिमान वाटत होता. पण तूं त्या

सगळयांत माती कालविलीस! तूं मला ही देशद्रोहाची गोष्ट कशाल सांगितलीस ! याच्यापेक्षां माझा पणजा—नव्हे, माझा आजा—नव्हे, प्रत्यक्ष माझा बाप रक्तपितीच्या विकारानें दूषित झालेला होता, असें तूं सांगितलें असतेंस, तरीदेखील मला इतकें वाईट वाटलें नसतें ! कारण, तो रक्तपितीचा दोष औषधोपचारानें जाण्यासारखा होता ! त्यांचें तें दूषित झालेलें रक्त माझ्या नाड्यांतून शिरलेलें असतें, तरी तें मी हकिमाच्या औषधानें साफ करून घेतलें असतें ! पण तूं माझे पूर्वज जातभाई देशद्रोही आणि निमकहराम होते म्हणून सांगितलेंस ! याला मी औषध काय करूं ! हा रक्तपितीचा विकार कशानें जाईल ! माझे बाप, आजे, पणजे रक्तपितीनें ग्रस्त होते असें सांगितलें असतेंस, तर फार तर या हतभाग्य हिंदुस्थानच्या पृष्ठभागावरील फक्त एकच कुटुंब दूषित झालें असतें ! पण तूं मीरजाफरची गोष्ट सांगून आमचीं सर्व कुटुंबें दूषित करून टाकलींस ! रक्तपितीचा दोष आनुवंशिक असला तरी तो इतके दिवस टिकला नसता. परंतु या मीरजाफरच्या रक्तकुष्टानें आज दोनशें वर्षेपर्यंत आमची पाठ सोडली नाहीं ! आणि एखाद्या ब्रह्मराक्षसाप्रमाणें तो दोष आणखी किती वर्षें आमच्या मानेस बसणार आहे, हेंहि समजत नाहीं ! या मीरजाफरच्या महारोगाला आतां काय औषध ! एक झालेल्या हिंदुस्थान देशाच्या भावी इतिहासामध्यें आम्ही मुसलमान लोक एखादें देशहिताचें महत्कृत्य करूं, तेव्हांच आमच्यावरील हा देशद्रोहाचा कलंक धुतला गेला तर जाईल. आम्ही तसा प्रयत्न करूं, परंतु तोंपर्यंत मित्रा, तूं फिरून माझ्यापाशीं मीरजाफर हें नांव उच्चारूं नको. नवीन होणाऱ्या मुलांच्या आईबापांनो, तुम्हांला जे पुत्र होतील, त्यांपैकीं कोणाचेंहि मीरजाफर हें नांव ठेवूं नका ! आणि पूर्वी झालेल्या मुलांचें जर मीरजाफर हें नांव ठेवलेलें असेल, तर तें लवकर बदलून टाका ! असलें नांव आपल्यामध्यें नको ! मित्रा, मीं तुझें काय केलें होतें कीं, ज्यासाठीं तूं मला असली उद्वेग उत्पन्न करणारी गोष्ट सांगितलीस ! असें विनाकारण अहित करणाऱ्या तुला शत्रु म्हणून कां हांक मारूं नये, याचा मी विचार करीत आहें. पण ही तुझी हकीकत खरी आहे काय? आणि मीरजाफर हा मुसलमानच होता काय? तुमच्या विश्वासघातकी हिंदूंमध्यें मीरजाफर अशीं कोणाचीं नांवें नसतात काय? तो मुसलमान होता,

आणि त्यानें हें देशद्रोहाचें अधम काम केलें, असें कोठें लिहिलें आहे? इतिहासांतच काय? हिंदुस्थानच्या इतिहासांत?—हिंदुस्थानच्या इतिहासांत दुसरें कांहीं लिहिलेलेंच नाहीं काय? मला वाटतें, हिंदुस्थानचा सारा इतिहास असल्या देशद्रोहाच्या गोष्टींनींच भरलेला आहे. आमच्या मुसलमानी अमदानीचा इतिहास जो मीं वाचला आहे, त्यांत कदाचित् आमच्या क्रूरपणाच्या गोष्टी सांपडतील. पण आमच्या देशद्रोहाच्या आणि निमकहरामपणाच्या गोष्टी सांपडावयाच्या नाहींत. परंतु क्लाईव्ह, हेस्टिंग्ज वगैरेसारख्या अपापभीरु लोकांनीं इकडे येऊन आम्हांला हीं स्वदेशद्रोहाचीं दुष्ट वळणें घालून दिलीं असल्यामुळें ब्रिटिश इंडियाच्या इतिहासामध्यें जिकडे तिकडे आपल्या हिंदुस्थानांतील लोकांच्या देशद्रोहाचींच उदाहरणें आढळून येतात. असला तो इतिहास वाचण्यापेक्षां न वाचलेलाच बरा! ज्याला आपलें मन शांत ठेवावयाचें आहे, त्यानें तो इतिहास कधींहि वाचूं नये!

हिंदुः—मित्रा, ही गोष्ट सांगितल्यानंतरहि मी तुझा मित्रच आहें. तूं आणि मीच काय, परंतु हिंदुस्थानांतील सर्व जातींचे सर्व लोक हे आपण एकमेकांचे मित्र झालेले आहों. इंग्लिशांनीं आपल्याला एकमेकांचे मित्र केलें आहे! ज्या मनाला मागील देशद्रोहाबद्दल इतका अनुताप वाटतो, त्याचें पातक धुवून गेलें आहे, असें तूं समज. आपण सर्वजण इतःपर परमेश्वरावर दृढ भाव ठेवूं; म्हणजे तो आपल्या हिंदुस्थान देशाला लवकरच उन्नतीचे दिवस खात्रीनें दाखवील.

---

# ग्रीस देश कसा स्वतंत्र झाला? : : : ६

काळ : अग्रलेख, ता. ११-८-१९०५

● या काळांत दहशतवादी गुप्त मंडळ्यांची संघटना प्रत्यक्ष चालू होती. गुप्त मंडळ्यांचा पुरस्कार फक्त ऐतिहासिक चर्चेच्या निमित्तानेंच करणें शक्य होतें. सावरकरांनीं मॅझिनीचें चरित्र याच पद्धतीनें लिहिलें होतें.

युरोपखंडामध्यें ग्रीस या नांवाचा एक देश आहे. आपल्या हिंदुस्थान-प्रमाणेंच हा अतिशय पुराणप्रसिद्ध असा देश आहे. आपला हिंदुस्थान देश हल्लीं गुलामगिरीमध्यें आहे; परंतु पूर्वीं अशी एक वेळ होती कीं, जेव्हां स्वतंत्रतेचीं, पराक्रमाचीं आणि वैभवाचीं सर्व सुखें हिंदुस्थान देश उपभोगीत होता. आणि ग्रीस देशाची देखील खिस्ती शतकाच्या प्रारंभापूर्वीं तशीच स्थिति होती. हिंदुस्थानप्रमाणेंच त्या बाजूला ग्रीस देश हें स्वदेशभक्ति, वेदान्तविचार, तत्त्वज्ञान, तर्कशास्त्र, अलंकारशास्त्र, युद्धनैपुण्य, पराक्रम, राजनीति वगैरे अनेक उपयुक्त शास्त्रांचें आणि कलांचें आगर होतें. युरोपांतील इतर लोक रानटी माणसांप्रमाणें अंगाला रंग लावीत असत, कातडीं पांघरीत असत, आणि अरण्यामध्यें फिरत असत. अशा वेळीं हिंदुस्थानांतल्याप्रमाणें ग्रीस देशांतील लोक त्या वेळीं उपलब्ध असलेल्या सर्व सुधारणांच्या शिखराला जाऊन पोहोंचलेले होते. हिंदुस्थानांतल्याप्रमाणें ग्रीस-मधील तत्कालीन कवींचीं काव्यें, नाटककारांचीं नाटकें, तत्त्ववेत्त्यांचीं तत्त्वदर्शनें, आणि योद्धयांचीं अद्‌भुत कृत्यें ऐकून ज्याचें मन आनंदभरित आणि उल्लसित होणार नाहीं, असा मनुष्य विरळाच सांपडेल. हिंदुस्थान आणि ग्रीस हे दोन्ही देश दोन भावंडांप्रमाणें बहुतेक एकाच वेळीं ऐश्वर्याच्या,

बुद्धिवैभवाच्या आणि पराक्रमाच्या शिखरावर डुलत होते. एके वेळीं हे दोन्ही देश सुखाच्या पुष्कळ बाबतींमध्यें अगदीं सारख्या स्थितींत नांदत होते. परंतु पुढें दोघांच्या दोन वाटा निरनिराळ्या फुटल्या ! तेथून स्थानभ्रष्ट झालेलें हिंदुस्थान वहात वहात आज गुलामगिरीच्या खडकावर कसें आदळून गेलें आहे, हें सर्वांना माहीतच आहे. ग्रीस देशाची चरित्रकथाहि अशीच विलक्षण आहे. ग्रीस देशाला रोमन लोकांनीं जिंकलें. त्या रोमन लोकांना जर्मनीच्या जंगलांतील रानटी लोकांनीं जिंकलें. परंतु त्यांच्याहि ख्रिश्चन वंशजांना महंमदाच्या अनुयायांनीं जिंकलें. आणि कॉन्स्टॅन्टि-नोपल हें जें रोमन बादशाहीचें पूर्वेकडील स्थान तें मुसलमानी सुलतानांच्या ताब्यांत गेलें. या सुलतानांनीं एशिया मायनर, ईजिप्त, कॉकेशस, ऑस्ट्रिया, सर्व्हिया बल्गेरिया वगैरे आसपासचे जे अनेक प्रांत काबीज केले होते, त्यांच्या बरोबरच ग्रीस देशाचीहि सत्ता मुसलमान लोकांच्या हातांत गेलेली होती. व ह्या मुसलमानी जुलमाखालीं पूर्वीचा ॲरिस्टॉटल्चा आणि प्लेटोचा ग्रीस देश कित्येक शतकेंपर्यंत कुजत पडलेला होता. परंतु त्याचें नशीब एकोणिसाव्या शत-काच्या पूर्वार्धामध्यें उघडलें. या सुमारास ग्रीस देशामध्यें बहुतेक ख्रिश्चन लोकां-चीच वस्ती झालेली होती. परंतु त्यांच्यावर राज्य करणारे हे मात्र परधर्मीय मुसलमान लोक होते. हल्लीं हिंदुस्थानांत हिंदू-मुसलमान वगैरे लोकांची वस्ती आहे. आणि त्यांच्यावर राज्य करणारे ख्रिश्चन लोक आहेत. त्याचप्रमाणें ग्रीस देशामध्यें स्थिति झालेली होती. ब्रिटिश साम्राज्याखालीं हल्लीं ज्याप्रमाणें निरनिराळ्या धर्मांचे आणि जातींचे लोक आहेत त्याचप्रमाणें त्या वेळीं टर्कीच्या अमलाखालीं होते. अशा निरनिराळ्या धर्मांच्या आणि जातींच्या लोकांना आपल्या ताब्यांत ठेवणें हें एक अतिशय कठिण काम आहे, व तें कठिण काम इंग्लिश लोक हल्लीं अतिशय कुशलतेनें करून दाखवीत आहेत, म्हणून सर्व लोक त्यांची तारीफ करितात. परंतु गेल्या शतकांतील टर्किश लोकसुद्धां ही गोष्ट तितक्याच कुशलतेनें घडवून आणीत होते. हल्लींचा इंग्लिशांचा आणि त्या वेळचा टर्किश लोकांचा दोघांचाहि मार्ग एकच होता. टर्कीच्या साम्राज्यांत सरासरी सव्वा कोटी इतर लोकांच्या वस्तीमध्यें मुसलमान लोक फक्त सुमारें तीस लक्षच असतील. पण इतके थोडे लोक असून देखील त्यांनीं आपल्यापेक्षां चौपट अधिक लोकांना

आपल्या ताब्यामध्यें ठेविलें होतें. आणि त्यांची युक्ति इंग्लिशांच्या युक्तीप्रमाणेंच अगदीं साधी होती. सर्व मुसलमान लोक हत्यारबंद होते. जेव्हां प्रसंग येईल तेव्हां ते सर्व लढण्याला तयार असत. राज्यांतील सर्व किल्ले आणि बंदरें त्यांच्या ताब्यांत असत. राज्यकारभाराचीं सूत्रें, खजिन्यांतील लागेल तितका पैसा, आणि सर्व मोठमोठीं शहरें, हीं मुसलमानांच्याच हातांत असत. आणि पुष्कळ दिवस राजसत्ता चालविलेली असल्यामुळें आपणहि आतां अशीच पुष्कळ दिवसपर्यंत चालवूं शकूं, असा मुसलमान लोकांना भरंवसा आलेला होता. या सगळ्या कारणांमुळें त्यांचें साम्राज्य इंग्रजी साम्राज्याप्रमाणेंच त्या वेळीं कांहीं दिवस टिकूं शकलें.

शिवाय लोकांच्या अंगांतील आणि व्यवस्थेंतील दोषांपासूनहि त्यांच्यावर परकीय अंमल टिकण्याला पुष्कळ मदत होत असते. टर्कीच्या अमलाखालीं निरनिराळ्या जातींचे लोक होते. त्यांच्यांत आपसामध्यें वैमनस्यें सहजच असत. आगगाड्या वगैरे साधनें त्या वेळीं नसल्यामुळें त्या भिन्न भिन्न लोकांमध्यें दळणवळणहि फारसें नव्हतें. ह्या कारणामुळें त्या सगळ्यांचा एक विचार म्हणून कधींहि होत नसे. आणि शिवाय शेंकडों वर्षांच्या गुलामगिरीनें ते सर्व लोक हतवीर्य होऊन गेलेले होते. तुर्क लोकांच्या जुलुमापासून आपणा सगळ्यांना सारखाच त्रास होत आहे, आणि आपण सगळेजण मिळून त्या जुलुमाच्या विरुद्ध कांहीं तरी उपाय करूं, अशा बुद्धीनें एकत्र जमणें आणि कांहीं प्रयत्न करणें, ह्या गोष्टी त्या लोकांच्या मनांतच येत नसत. व तसें होण्याला परिस्थितीहि अनुकूल नव्हती. हिंदुस्थानामध्यें गुलामगिरी कायम राहण्याला जीं कारणें झालेलीं आहेत, तींच टर्कीच्या साम्राज्यामध्येंहि आढळून येतात. हिंदुस्थानांतील इंग्लिश लोकांप्रमाणें टर्किश एम्पायरमधील राज्यकर्ते मुसलमान लोक हे सर्व एक धर्माचे आणि एक विचाराचे होते. आणि त्यांच्या साम्राज्यांतील प्रजा मात्र भिन्न धर्माची आणि भिन्न विचारांची होती. तेथील राज्यकर्ते सशस्त्र होते, आणि प्रजा बहुतेक निःशस्त्र होती. राज्यकर्त्यांची जात एक, भाषा एक, धर्म एक, आणि आपला अंमल कसा चालेल, हा विचारहि एकच होता. परंतु गुलाम बनलेल्या प्रजेमध्यें मात्र अनेक जाती, अनेक भाषा, अनेक धर्म आणि अनेक स्वहितविघातक कुकल्पना यांचा गोंधळ माजून राहिलेला होता.

आणि प्रजेच्या अशाच गोंधळामध्यें जुलमी राजांचा जुलूम सुयंत्रित-पणें चालूं शकतो. इंग्लिश लोक हिंदुस्थानांत जी पद्धत वापरीत आहेत, त्याच पद्धतीनें तुर्क लोकानीं आपल्या सर्व प्रजेच्या माना आपल्या जोखडाखालीं कायम ठेविलेल्या होत्या. इंग्लिशांची आणि तुर्क लोकाची या कामांतील मुख्य गुरुकिल्ली एकच होती. इंग्लिशांप्रमाणेंच तुर्क लोकाचा हा अगदीं नियम होता कीं, लष्करी खात्यामध्यें जिंकलेल्या लोकांपैकीं कोणालाहि घ्यावयाचें नाहीं. मुसलमान लोकांनाच फक्त शस्त्रें द्यावयाचीं आणि त्यांनाच फक्त लढाईचे वेळीं बोलवावयाचें, हा मुसलमानांचा परिपाठ होता. इंग्लिश लोकांनीं कांहीं काळ्या लोकांना आपल्या पलटणींतून घेतलें आहे, हें खरें. परंतु हिंदुस्थानांतील दहा पांच लक्ष गोरे राजे आणि तीस कोटी काळी प्रजा हें प्रमाण लक्षांत आणलें, म्हणजे नेटिवांना लष्करी खात्यात थोडेंसें तरी घेणें इंग्लिशाना कां आवश्यक झालेलें आहे, हें कोणाच्याहि लक्षांत येईल. शिवाय थोड्याशा लोकांना लष्करी खात्याची लालूच दाखवून ठेवून बाकीच्या कोट्यवधि लोकांच्या तोंडाला पानें पुस-ण्याची युक्ति एकोणिसाव्या शतकांतील मुसलमान लोकांना माहित झालेली नव्हती. त्यामुळें टर्कीच्या सैन्यामध्यें फक्त मुसलमान लोकच असत. परंतु सैन्यातील शिपाई जरी मुसलमान लोक होते, तरी त्या शिपायांचा खर्च आणि ऐपआराम हिंदुस्थानांतल्याप्रमाणें इतर जातींच्या रयतेच्या पैशावरच चालत असे. लष्करांत इतर लोक चालत नसत; पण इतर लोकांचा पैसा मात्र पाहिजे असे. टर्कीच्या साम्राज्यांतील इतर लोकांनीं इतर उद्योगधंदे करण्यात मर मर मरावें आणि त्यांतून जें उत्पन्न होईल तें या सैन्याच्या तैनातीला द्यावें, परंतु त्यांनीं स्वतः मात्र हातामध्यें कधींहि शस्त्र धरतां कामा नये, असा निर्बंध होता. अशा रीतीनें हल्लींच्या हिंदुस्थानांतल्याप्रमाणें त्या वेळीं टर्किश साम्राज्यामध्यें जी स्थिति होती, तिचें उपमेनें वर्णन करावयाचें असेल तर असें म्हणतां येईल कीं, त्या वेळचे लष्करी मुसलमान शिपाई हे घोडे होत आणि बाकीचे त्यांच्या पोषणासाठीं ओझीं वाहणारे सर्व जण ओझ्याचे बैल किंवा गाढव होत. अशी दुर्धर स्थिति त्या वेळीं टर्कीमध्यें होती. मुसलमान लोकांची म्हणजे एक लढवय्यांचीच जात बनून गेलेली होती, आणि बाकीचे जिंकलेले लोक म्हणजे शुद्ध गाढवांचीच जात होय, अशी

निकृष्ट स्थिति आलेली होती. लढाईचें काम आपल्या हातांत ठेवावयाचें आणि काबाडकष्टाचीं कामें गुलाम लोकांकडे सोंपवावयाचीं, हा हल्लींच्या इंग्लिश लोकांप्रमाणें मागच्या तुर्क लोकांनीं जो मार्ग स्वीकारिलेला होता, तो प्रथमतः जिंकणाऱ्या लोकांना जरी फायदेशीर असला, तरी पुढें पुढें तो जिंकलेल्या गुलामांनाहि गुणकारक होऊं लागतो. लढाया नेहमींच होत असतात असें नाहीं. त्यामुळें लढवय्ये राजे एकदां तरवार गाजवून आले म्हणजे बाकीच्या शांततेच्या दिवसांत ते आळशी आणि चैनी बनतात. व अतिशय चैनबाजीमुळें मूळचें त्याच्या अंगांत असलेलें शौर्यहि पुढें हळू हळू नष्ट होऊन जातें. परंतु काबाडकष्ट करणाऱ्या गुलामांना सदोदित उद्योगधंद्यामध्यें निमग्न होऊन रहावें लागत असल्यामुळें त्यांच्या अंगामध्यें तरतरीतपणा, बुद्धिचापल्य, धाडस, दीर्घप्रयत्न, वगैरे अनेक चांगले गुण उत्पन्न होतात. व पुढें तेच त्यांच्या अभ्युदयाला व शत्रूच्या पराजयाला कारणीभूत होतात. ग्रीसमध्येंहि अशाच प्रकारची स्थिति झालेली होती. ग्रीक लोकांच्या हातांत सर्व उद्योगधंदे होते. राज्यांतील मुलकी कारभारसुद्धां त्यांच्याकडेच होता. व्यापारधंदा, देवघेव, नौकानयन, वगैरे बाकीचीं सर्व बारीकसारीक कामें ग्रीक लोकांच्याच तंत्रानें चालत असत. जमिनींवर मुसलमान लोक शूर असत, परंतु समुद्राच्या पाण्यावर त्याची अक्कल मुळींच चालत नसे. ती कला सर्वस्वी ग्रीक लोकांच्याच हातांत होती. मुसलमान लोक घोड्यावर उत्तम तऱ्हेनें बसतील आणि पाहिजे तर जमिनीवरील एखादें साम्राज्यहि पादाक्रांत करून टाकतील; परंतु गलबतांत बसून एखादी लहानशी खाडी उतरून जावयाचें म्हटलें तरीदेखील त्यांना मोठें संकट पडत असे. ग्रीक लोकांचा मात्र नेहमीं समुद्राशीं सहवास असल्यामुळें नौकानयनामध्यें ते चांगलेच प्रवीण झालेले होते. व टर्कीचें त्या वेळीं जर कांहीं आरमार असलें, तर तें सर्व ग्रीक लोकांच्याच हातांत होतें. आणि त्यामुळेंच मुख्यत्वेंकरून स्वातंत्र्याच्या लढाईत ग्रीक लोकांना जय आला. इंग्लिश आणि टर्किश या लोकांची तुलना करून पाहिली असतां टर्किश लोकांचें चुकलें तें हेंच कीं, त्यांनीं ग्रीक लोकांच्या हातांत मुलकी कारभार, व्यापारधंदा, नौकानयन वगैरे कांहीं क्षुल्लक बाबी ठेविल्या होत्या. गुलामगिरीच्या पाशांतून लोकांनीं कधींहि सुटूं नये याकरितां त्यांनीं

आमच्या इंग्लिशांप्रमाणें जिंकलेल्या लोकांच्या हातांत कांहींसुद्धां टेवितां कामा नव्हतें. चोहोंकडून लोक नागवलेले असले, तरच ते गुलामगिरीमध्यें कायम टिकतील, हें उदात्त आणि अतिशय महत्त्वाचें तत्त्व टर्किश लोकांना कळलें नव्हतें. निराशा, दारिद्र्य, भिक्षा आणि उपासमार, ह्यांच्या खेरीज जिंकलेल्या लोकांच्या हातांत कांहीं एक ठेवितां कामा नये, हें तत्त्व जे लोक लक्षांत ठेवतील त्यांचींच साम्राज्यें कायम टिकतील. फार झालें तर अतिशय खालच्या दर्जाच्या आणि अतिशय थोड्या पगाराच्या जागा, राजनिष्ठेच्या सभा भरविण्याची परवानगी, साधी बडबड करण्याकरितां मोकळीं तोंडें, आपसांत भांडणाऱ्या लोकांचे मनोविकार आणि बेत कळण्याकरितां वर्तमानपत्रें, आणि फक्त राजनिष्ठेच्या वर्गण्या देण्याकरितां पुरण्याइतके पैसे, अशा कांहीं किरकोळ गोष्टी जिंकलेल्या लोकांपाशीं राहूं दिल्या तरी क्षणभर क्षम्य आहे; परंतु याच्यापलीकडे एक रतिभरसुद्धां जास्त हक्क जिंकलेल्या लोकांपाशीं असतां कामा नये, हा साम्राज्य टिकविण्याचा पहिला नियम सर्वांनीं लक्षांत बाळगिला पाहिजे. तुर्क लोकानीं या नियमाकडे लक्ष पोहोंचविलें नाहीं, या गोष्टीचा परिणाम काय झाला, हें ग्रीसचा सर्व इतिहास जगाला सांगतच आहे.

लष्करी खात्याशिवाय बाकी सर्व बारीकसारिक कामें तुर्क लोकांनीं ग्रीक लोकांच्या हातांत दिलीं होतीं, ही गोष्ट टर्कीला विनाशक झालीच. परंतु याशिवाय दुसरेंहि एक कारण होतें. हल्लींच्या युरोपियन राजांपाशीं जशी स्टँडिंग आर्मी असते, तशी पद्धत टर्कीशमध्यें नव्हती. खुद्द टर्कीच्या सुलतानापाशीं अगदीं फारच थोडें सैन्य असे. आणि आपल्या पुण्याच्या पेशव्यांच्या दरबारमध्येंसुद्धां हीच घातक चाल होती. दक्षिणेंत कर्नाटकापासून तों उत्तरेस पंजाबपर्यंत ज्यांनीं भराऱ्या मारल्या, त्या पेशव्यांपाशीं खुद्द खासगी सैन्य पाहूं गेल्यास फारच थोडें होतें. सरदारांना सैन्य बाळगण्यासाठीं मुलूख तोडून दिलेले असत. व कांहीं कामगिरी आली म्हणजे त्या सरदारांपैकीं कोणाला तरी ती करण्याविषयीं हुकूम सुटत असत. शिंदे, होळकर, रास्ते, पटवर्धन, वगैरेसारखे संस्थानिक आणि सरदार आधीं उत्पन्न करून मग आपल्या कामगिरीसाठीं त्यांच्यावर अवलंबून रहावयाचें, ही पेशवाईतील पद्धत चांगली नव्हती. खुद्द दुसऱ्या बाजीराव साहेबांना गादीवर बसण्याची वेळ आली तेव्हां त्यांचा हक्क सुरक्षित राखण्या-

करितां पुण्यापासून ग्वालेरीपर्यंत धांव घ्यावी लागली, ही गोष्ट इतिहास-प्रसिद्धच आहे. अशा पद्धतींत फार तोटे आहेत. सत्ता आपल्या हातांत न राहतां दुसऱ्याच्या हातात जाते. सरदारासरदारांमध्यें वारंवार कलह उत्पन्न होतात. एकतंत्री कारभार होऊं शकत नाहीं. राजा बलाढ्य असतो तोंपर्यंत फार तर ही सरदारी पद्धत बरी चालते. परंतु कमकुवत राजांच्या बेबंद कारकीर्दींत शिंदेहोळकरी माजते. आणि १८१८ सालांतल्याप्रमाणें नीच सरदार असतात ते शत्रुपक्षाला मिळून फितुरी करण्यालाहि कमी करीत नाहींत. मागील शतकांत पुण्यास ज्या वेळेच्या सुमारास हे प्रकार चालले होते, त्याच वेळीं टर्कींमध्येंहि ह्या सरदारी पद्धतीचे येथल्यासारखेच वाईट परिणाम दृष्टिगोचर होत होते. तिकडे पाच्छाईची पद्धत होती. सुलतान आपल्या ताब्यांतील मुलूख, या पाच्छांना वांटून देत असे व त्यांनीं अमुक अमुक सैन्याचा पुरवठा करावा असें ठरवून टाकीत असे. ह्या पद्धतीमुळें हे पाच्छा स्वतंत्र झाले, आपसांत भांडूं लागले, व सुलतानाला लांचानें स्वूप ठेवून आपल्या प्रजेवर अनान्वित जुलूम करूं लागले. तेव्हां ह्या पाच्छाई जुलमाला कंटाळून लोक स्वतंत्रतेचा प्रयत्न करण्याला प्रवृत्त झाले.

राजा आणि प्रजा यांच्यामधील इतर संबंधांच्या बाबतींतहि हिंदुस्थान आणि टर्की यांच्यामध्यें पुष्कळ साम्य होतें. येथल्याप्रमाणेंच तेथेंहि तेथील सुलतान जी म्हणतील ती पूर्व दिशा होत होती. आपल्या मर्जीस येतील ते ऑफिसर नेमावयाचे आणि त्यांनीं कसाही कारभार चालविला तरी तिकडे पहावयाचें नाहीं, अशी सुलतानी अंदाधुंदी टर्कींमध्यें चालू होती. सुलतानानें पाच्छापासून पैसे घ्यावे, पाच्छानें ते आगापासून वसूल करावे, आगानें आपल्या शिपायांपासून ते उकळावे, आणि ह्या शिपायांनीं गरीब शेतकरी लोकांना गांजून यांच्यापासून आपली भरपाई करून घ्यावी, अशी टर्कींमध्यें कारकून, शिपाई, कुळकर्णी, पाटील आणि गांवचे लोक यांची रांग लागली होती. हिंदुस्थानांत आणि टर्कींत दोन्ही ठिकाणींहि जमिनीची मालकी राजांची होती. आपल्या इकडे 'लँड ॲक्ट' नें ती लोकांच्या सल्ल्यानें कबूल करून घेतली आहे. व टर्कींमध्यें सुलतान उघडपणें म्हणतो कीं, लोकांची सर्व जमीन मी जिंकलेली असल्यामुळें ती माझी आहे. लोकांचें मन न दुखवितां गोडीगुलाबीनें कार्यभाग कसा साधून घ्यावा हें टर्कींच्या सुलतानांना

माहीत नाहीं ! जमिनीवर सरकारी मालकी झाल्यामुळें तिकडेहि स्थावर मिळकत मिळविण्याकडे कोणाचें लक्ष नाहीं. ज्यांच्याकडे न्यायाचीं आणि लोकसंरक्षणाचीं कामें होतीं, ते सर्व लोक पैसे खात आणि रयतेवर जुलूम करीत असत. टर्कीमधील लोकांनीं आपल्या धर्मगुरूंनीं दिलेलें धर्मपुस्तक मिटून ठेविलें होतें आणि आपल्या लाचांच्या जमाखर्चाचें पुस्तक उघडलें होतें. एखादा कोणी ग्रीक व्यापारी श्रीमंत होतोसा वाटला, म्हणजे ते त्याला समूळ नाहींसा करीत. एखाद्याची जमीन पाहिजे असली तर ती युक्तीनें बळकावून बसत. पाहिजे त्या दारू पिऊन बेहोष झालेल्या मनुष्यानें एखाद्या सभ्य ग्रीक मनुष्याचा खून केला, तरी कोणी त्याची वास्तपुस्त करीत नसे. असे ग्रीक लोकांवर अनेक जुलूम होत असत. म्हणून त्यांच्या प्रतिकारार्थ ग्रीक लोकांनीं स्वतंत्र होण्याचा प्रयत्न आरंभिला.

ग्रीस देश सगळ्या टर्किश साम्राज्याच्या मानानें पाहूं गेल्यास अतिशय लहान आहे. त्याचें क्षेत्रफळ सुमारें एकवीस हजार चौरस मैल असून तेथील लोकसंख्या सात लक्षांच्या जवळ जवळ आहे. इतक्या थोड्याशा लोकांनीं टर्किश साम्राज्याच्या विरुद्ध लढून आपली स्वतंत्रता मिळवावी हें सकृद्दर्शनीं अशक्य दिसतें. आधीं ग्रीक लोकांच्या मनामध्यें स्वतंत्रतेची इच्छाच कशी उत्पन्न झाली ह्याबद्दलहि पुष्कळांना आश्चर्य वाटेल. कारण, गुलामगिरीमध्येंहि सौख्य नाहीं, असें नाहीं ! परंतु गुलामगिरीची आवड हें अज्ञानाचें लक्षण होय. ग्रीक लोकांमध्यें ज्ञानाच्या प्रसाराबरोबर स्वतंत्रतेची इच्छा वाढत गेली. तुर्की जुलमाखालीं असूनहि हिंदुस्थानांतील लोकांप्रमाणें ग्रीक लोक अगदीं नंगे फकीर झालेले नव्हते. त्यांच्यापाशीं बरीच संपत्ति जमा झालेली होती. यूरोपखंडांतील इतर ठिकाणचीं ख्रिस्ती राष्ट्रें ज्ञानसंपन्न व स्वातंत्र्यशाली झालेलीं पाहून आपणहि तसें व्हावें, अशी इच्छा प्रथम ग्रीक लोकांच्या मनांत उद्भवली. ह्या लोकांवर टर्कीचा एकसारखा चारशें वर्षेंपर्यंत जुलूम चालू होता. तरी पण त्या जुलमाखालींहि त्यांनीं आपलें स्वत्व कायम राखिलें होतें. आपला देश, आपली भाषा आणि आपला धर्म यांबद्दलचा अभिमान मुसलमानी सत्तेखालींहि ग्रीक लोकांच्या मनांत कायम होता. जेथें भावी स्वतंत्रतेचीं हीं बीजें कायम टिकविलीं

जातात, तेथें परकीयांचा कितीहि वर्षें जुलूम चालू असला, तरी योग्य वेळ येईल तेव्हां लोक स्वतंत्र होतात. मुसलमानांचा धर्म पत्करला म्हणून काय झालें, त्यांची भाषा बोललें म्हणून काय झालें, आणि त्यांच्याशीं सलगीनें वागलें म्हणून काय झालें अशा प्रकारचें नेमस्तपणाचें तत्त्वज्ञान ग्रीक लोकांमध्यें माजलें नव्हतें, आणि म्हणूनच त्यांना आपली स्वतंत्रता फिरून मिळवितां आली. मुसलमान लोक त्यांच्यावर अतिशय जुलूम करीत होते, परंतु ग्रीक लोकांनीं कधीं आपला ख्रिस्ती धर्म सोडला नाहीं. ग्रीक शहरामधून मुसलमान लोकांनीं आपल्या मशिदी बांधल्या होत्या, परंतु खेडेगांवांतून ग्रीक लोकांनीं आपलीं ख्रिस्ती धर्माचीं चर्चेस कायम राखिलीं होतीं. स्वाभिमानानें ह्या ज्या गोष्टी राखिल्या होत्या, त्या ज्ञानाच्या प्रकाशानें जास्तच उद्दीपित झाल्या. ग्रीक लोक व्यापारानिमित्त युरोपांतील इतर स्वतंत्र देशांतून जात असत. तेथील स्थिति पाहून आपणहि स्वतंत्र व्हावें अशी इच्छा त्यांच्या मनामध्यें उत्पन्न झाली. ग्रीस देशांतील मोठ-मोठ्या शहरीं त्या हेतूनें शाळा स्थापित झाल्या. ग्रीसमधील जुन्या उत्कृष्ट आणि प्रख्यात ग्रंथांचीं चालू भाषेमध्यें भाषांतरें झालीं. आणि तीं त्यांनीं वाचलीं तेव्हां तर ग्रीक लोकांच्या अंतःकरणांनीं अतिशयच पेट घेतला. होमरनें ज्या भाषेमध्यें आपलें अजरामर काव्य लिहिलें ती आपली भाषा, प्लेटो आणि सॉक्रेटिस यांनीं जें शिकविलेलें तें आपलें तत्त्वज्ञान, स्पार्टन्स आणि अथेनियन्स ह्या इतिहासप्रसिद्ध पूर्वजांचे आपण वंशज, आणि थरमॉपिलीसारखीं पवित्र धारातीर्थें ज्या ठिकाणीं आहेत तो आपला देश, ह्या सर्व कल्पना त्यांच्या डोळ्यांपुढें उभ्या राहून ते लोक आपल्या स्वतंत्रतेसाठीं अधिकच प्रक्षुभित झाले. आपल्या देशाची ती मागील स्वतंत्रता, आपल्या वीर पुरुषांनीं लढाईमध्यें केलेले ते पूर्वीचे पराक्रम आणि जुन्या विद्या व कला यांच्यायोगानें त्या वेळच्या लोकांना प्राप्त झालेलें तें अद्वितीय ऐश्वर्य आणि तें राजकीय वैभव, ह्या सगळ्यांचें स्मरण होऊन आपणहि तसे कां होणार नाहीं, असे प्रश्न ग्रीक लोकांच्या मनामध्यें उद्भवूं लागले. युरोपखंडांतील इतर देश जुन्या ग्रीस देशाचे विद्या आणि कला यांच्या बाबतींत अतिशय ऋणी होते. व ग्रीस देशानें आपल्यावर अनंत उपकार केले आहेत, असें ते मानीत असत. इतर देशांतील लोकांचें हें

प्रेम पाहून ग्रीक लोकांना अशीसुद्धां खात्री वाटत होती कीं, मुसलमानांच्या विरुद्ध आपण स्वतंत्रतेचें निशाण उभारलें तर युरोपांतील सर्व ख्रिस्ती लोक ग्रीस देशामधील आपल्या धर्मबांधवांना मदत करण्याला आल्यावांचून रहावयाचे नाहींत. बाहेरच्या मदतीची इतकी खात्री होती आणि त्यांची स्वातंत्र्याची लालसा दिवसेंदिवस अतिशय वृद्धिंगत होत चालली होती, तरी हे स्वतंत्रतेचे विचार बाहेर काढण्याची सोय नव्हती. कारण, मुसलमानी जुलुमाची तरवार त्यांच्या डोक्यावर रात्रंदिवस टांगून ठेवलेली होती. ज्ञानाच्या प्रसारानें ग्रीक लोकांच्या मनांत स्वतंत्रतेची इच्छा उत्पन्न झालेली होती. पण त्या इच्छेचा काय उपयोग ? त्यांच्यापाशीं एकहि हत्यार मिळण्यासारखें नव्हतें. त्यांचे सर्व किल्ले शत्रूंच्या ताब्यांत होते. आणि देशांतील सर्व शिपाई त्यांच्या शत्रूंचे हुकूम शिरसावंद्य मानीत होते. अशा स्थितींत ग्रीक लोकांना उघड मार्ग कोणताच मोकळा नव्हता. स्वतंत्रतेची इच्छा आहे परंतु साधन नाहीं, अशा स्थितींत लोकांना एकच उपाय करतां येण्यासारखा असतो. आणि तो उपाय म्हटला म्हणजे गुप्त मंडळ्या स्थापन करणें हा होय. ह्या गुप्त मंडळ्या पुष्कळ दिवस गुप्त रहात नाहींत, आणि त्यांतील बऱ्याच मंडळ्यांना अपयश येतें, असें जरी इतिहासांत कित्येक ठिकाणीं आढळून येतें, तरी जेथें जेथें स्वतंत्रता मिळालेली आहे, तेथें तेथें गुप्त मंडळ्यांनींच सुरुवात केलेली आहे, हें कोणालाहि नाकबूल करतां येणार नाहीं. अपयशाच्या गर्भामधूनच यशाचें बालक उत्पन्न होत असतें. दहा गुप्त मंडळ्या उघडकीस आल्या म्हणून हरकत नाहीं, परंतु त्यांपैकींच एखादीनें कार्यभाग जुळून येत असतो, इकडे लक्ष दिलें पाहिजे. असल्या फसणाऱ्या गोष्टी हें एक प्रकारचें शिक्षण आहे. ह्यांत फसतां फसतांना यश कसें मिळवावें, हें सहज लोक शिकून जातात. गुप्त मंडळ्या फुटतात यासाठीं जेथें गुप्तमंडळ्या बनल्या नाहींत, त्या देशावर स्वतंत्रताहि कधीं हंसली नाहीं. हा सगळा जगाचा अनुभव लक्षांत आणून ग्रीक लोकांनीं एक हिटेरिया नांवाची गुप्त मंडळी स्थापन केली. ह्या गुप्त मंडळीच्या शाखा कॉनस्टॅन्टिनोपल, बव्हेरिआ, ऑस्ट्रिया, रशिया वगैरे सर्व ठिकाणीं स्थापन झाल्या. व जेव्हां योग्य संधि येईल तेव्हां स्वतःच्या प्रयत्नानें सर्व ग्रीस देशाला स्वतंत्र करावयाचें, हा त्या सर्व सभासदांचा हेतु

होता. या कटामध्यें पुष्कळ मोठमोठे लोक सामील झालेले होते. रशियां ह्या टर्कीचा शेजारी असल्यामुळें व टर्कीचें राज्य भक्षण करण्याची त्याला नैसर्गिक इच्छा असल्यामुळें टर्कीत कांहीं बखेडे उत्पन्न झाले तर ते रशियाला इष्टच होते. रशियानें पूर्वी आपल्या स्वतःच्या खर्चानें टर्किश साम्राज्यामध्यें असले कित्येक दंगेधोपे उत्पन्न करविले होते. त्या रशियांतील अलेक्झँडर बादशहाचा जो प्रायव्हेट सेक्रेटरी तो या कटांतील मुख्य असल्यामुळें रशियाची आपल्याला खात्रीनें मदत मिळेल असें ग्रीक लोकांना वाटत होतें. ह्या गुप्त मंडळींतील लोकांना हिटेरिस्ट असें म्हणत असत. यांचे चार वर्ग केलेले होते. जे अस्सल ग्रीक असत आणि ज्यांची ह्या सिक्रेट सोसायटीमध्यें येण्याची इच्छा असे त्या सगळयांना शेवटच्या वर्गामध्यें घेतलें जात असे, व सर्व ग्रीक लोकांची सामाजिक स्थिति सुधारावयाची हा ह्या सोसायटीचा उद्देश आहे, असें त्यांना सांगण्यांत येत असे. ह्याच्या वरील दुसऱ्या वर्गामध्यें सभासद जास्त कसोशीनें निवडले जात असत. राज्यक्रांति करून टर्कीच्या जुलुमापासून स्वतंत्र व्हावयाचें हा उद्देश यांना सांगण्यांत येत असे. तिसऱ्या वर्गातील लोक यांच्याहिपेक्षां जास्त दर्जाचे असत, व ही राज्य-क्रांतीची वेळ आतां जवळ येत चालली असून आपल्या कटामध्यें आपल्या-पेक्षां पुष्कळ मोठमोठे लोक आहेत अशी बातमी त्यांना सांगण्यांत येत असे. ग्रीसमधील बहुतेक सर्व धर्माधिकारी लोक ह्याच वर्गामध्यें सामील झालेले होते. चौथ्या वर्गामध्यें फक्त सोळाच असामी होते. पण हे कोण होते; तीं नांवें बाहेर फुटलेलीं नाहींत. परंतु रशियाचा झार, बव्हेरियाचा क्राऊन प्रिन्स, वगैरेसारखी मंडळी या वर्गांत होती. या लोकांची कमेटी मॉस्को येथें भरत असे आणि त्यांचे हुकूम खुणेच्या शब्दांनीं सुटत असत. ह्या गुप्त मंडळींच्या गुप्त खुणा होत्या. व त्यांवरून ते एकमेकांना ओळखीत असत. अशा प्रकारची गुप्त मंडळी स्थापन होऊन पुष्कळ दिवस झाले होते, तरी मुसलमान लोकांना त्याची दाद नव्हती. आणि १८२१ मध्यें जेव्हां राज्यक्रांतीचा एकाएकीं भडका उडाला, तेव्हां त्याच्या आकस्मिकपणामुळें मुसलमान लोकांची अगदीं धांदल उडून गेली.

हा मनुष्याच्या प्रयत्नाचा इतिहास झाला. परंतु यांत जर 'देवाचा हात नसता, तर हे इतके मोठे प्रयत्नहि जागच्या जागींच राहिले असते.

पृथ्वीच्या पृष्ठभागाखालून जशा धरणीकंप उत्पन्न करणाऱ्या एक प्रकारच्या आगीच्या लाटा वहात असतात, त्याचप्रमाणें पृथ्वीच्या पाठीवरील लोकसमाजामध्येंही राज्यक्रांतिकारक लाटा उसळत असतात. अशी एक लाट त्यावेळीं युरोपखंडावरून वहात जात होती. तिचा उगम प्रथमतः स्पेन देशामध्यें झाला. १८२० सालीं स्पेनमध्यें राज्यक्रान्ति सुरू झाली. आणि तेथून निघालेली ती लाट नेपल्स, सिसली, पीडमाँट, जर्मनी वगैरे ठिकाणें व्यापून युरोपखंडाचें पूर्वेकडील टोंक जें ग्रीस देश तेथपर्यंत येऊन पोहोंचली. हिटेरिया नांवाच्या गुप्त मंडळींतील सभासदांनीं लोकांचीं मनें आधींच तयार करून ठेविलीं होतीं. त्यामुळें आपल्या देशाच्या स्वतंत्रतेची आतां वेळ आलीच, असें त्यांना वाटूं लागलें. जिकडे तिकडे ग्रीसमधील राज्यक्रांतीच्या कल्पनेला उत्तेजन मिळूं लागलें. आणि ठिकठिकाणच्या लोकांनीं गुप्त वर्गण्या गोळा करून ग्रीक लोकांना पैसे आणि हत्यारें यांचा पुरवठा करण्याला सुरुवात केली. स्वतंत्रतेची प्रबळ इच्छा, लोकसत्तात्मक राज्याबद्दल उत्कट लालसा, आणि जुलूम करणाऱ्या लोकांबद्दल हाडीं खिळलेला तिटकारा, ह्या सगळ्या गोष्टी ग्रीक लोकांचीं मनें प्रज्वलित करण्याला एकत्र झाल्या, आणि ग्रीस देशामध्यें स्वतंत्रतेकरितां राज्यक्रांतीच्या चळवळीला सुरुवात झाली. ह्याच सुमाराला टर्कीच्या सैन्यामध्यें अतिशय असंतोष उत्पन्न झालेला होता, व टर्कीच्या सुलतानाला बाहेरच्या शत्रूपेक्षां स्वतःच्या शिपायांचीच जास्त भीति बाळगण्याची वेळ येऊन ठेपलेली होती. ही संधि साधून ग्रीसनें बंडाला सुरुवात केली. व्हॅलेशिआ या नांवाचा टर्कीच्या राज्यांतील एक मुलूख आहे. तेथें पहिला धडाका उडाला. तेथील पहिला सुभेदार मरण पावून दुसरा नेमला जावयाचा होता. या संधींत बंडाला सुरुवात करण्याचें हिटेरिस्ट लोकांनीं ठरविलें. रशियन लष्करांतील थिओडर या नांवांचा एक माजी लेफ्टनंट कर्नल बंडवाल्याचा पुढारी झाला. त्यानें आपल्याबरोबर दीडशें शेतकरी घेतले. आणि झरविट्झ या नांवाचें शहर हस्तगत करून तेथून त्यानें एक जाहीरनामा प्रसिद्ध केला. "तुमच्या स्वतंत्रतेची वेळ जवळ आलेली आहे. तुम्ही हातांत शस्त्र घेऊन उठा. आणि तुमच्यावर जुलूम करणाराचा जुलमी अंमल तुम्ही झुगारून द्या." असा त्या जाहिरनाम्यांत मजकूर होता. राजकीय जुलुमामुळें लोकामध्यें इतका

असंतोष पसरलेला होता कीं, हा जाहिरनामा वाचल्याबरोबर थिओडरच्या निशाणाखालीं थोडक्याच दिवसांमध्यें सुमारें दहा हजार शेतकरी लोक गोळा झाले.

यानंतर थोडक्याच दिवसांत मोल्डेव्हिया नांवाचा टर्कीश साम्राज्यामध्यें जो दुसरा एक प्रांत आहे त्याची राजधानी जॅसी येथें दुसरें बंड उद्भवलें. प्रिन्स अलेक्झँडर इप्सिलॅन्टी हा ह्या बंडाचा पुढारी झाला. हा सुद्धां रशियन सैन्यांतीलच एक तरुण ऑफिसर होता. १८१५ च्या तहानें नेपोलियनच्या लढाया थांबल्यानंतर हा शूर योद्धा हिटेरिस्टसच्या गुप्त मंडळीमध्यें शिरलेला होता. दोनशें घोडेस्वारांनिशीं यानें बंडाला सुरुवात करून पुढें लिहिल्याप्रमाणें एक जाहीरनामा प्रसिद्ध केला. " देशबांधवहो! ह्या वेळीं ग्रीस देशानें स्वतंत्रतेची मशाल पाजळली आहे, आणि जुलुमाचें जोखड मोडून टाकलें आहे. तसेंच मनुष्यप्राण्याचे जे जन्मसिद्ध हक्क ते ग्रीस देश आपल्या सर्वांकरितां परत मिळवीत आहे. अशा प्रसंगीं माझें कर्तव्यकर्म मला जिकडे बोलवीत आहे, तिकडे मी निघालों आहें. तुमच्या जिवाला व मालमत्तेला यत्किंचित्‌हि धक्का लावणार नाहीं. सबब तुम्ही सार्वजनिक सौख्य संपादन करून घेण्याला तयार व्हा. आणि कोणी तुर्क लोक तुमच्या मुलुखावर स्वारी करतील तर तुम्ही यत्किंचित्‌हि डगमगूं नका. त्यांचें शासन करण्याला तुमचा बलाढ्य पाठिराखा समर्थ आहे."

रशियाचा झार अलेक्झँडर हा या बंडाला उत्तेजन देत आहे, अशी सर्व ग्रीक लोकांची पूर्वीपासूनच समजूत होती. आणि वरील जाहीरनाम्यांतील शेवटल्या वाक्यानें तर ती समजूत पूर्णपणें दृढ झाली. त्यामुळें सर्व ख्रिस्ती लोक उठले. आणि त्यांनीं अनेक ठिकाणीं लुटालूट व कत्तल आरंभिली. समुद्राकिनाऱ्यावरील एक शहर जाळलें गेलें, आणि तेथील बंदरांतील गलबतें व तोफा बंडवाल्यांनीं आपल्या हस्तगत करून घेतल्या. इप्सिलँटी याचा जाहीरनामा ठिकठिकाणीं वाचण्यांत आला. आणि बंडवाल्यांच्या मदतीकरितां ठिकठिकाणीं वर्गण्या गोळा झाल्या, बंडवाल्यांची संख्या वीस हजारांवर गेली. इप्सिलँटी यानें सेक्रेड बॅटोलियन या नांवाची एक पलटण तयार करून त्यामध्यें ग्रीस देशांतील सर्व तरुण तरुण लोक निवडून घेतले. सर्वांना काळे पोषाख दिले आणि त्यांवर क्रॉसचें चिन्ह काढलें. आणि अशा

रीतीनें स्वतंत्रतेच्या ईर्षेमध्यें धर्माच्या स्फुरणाची भर पडून ग्रीक राज्य-क्रांतीला मोठ्या जोरानें चोहोंकडून सुरुवात झाली.

---

## ग्रीस देश कसा स्वतंत्र झाला? : : : ७

काळ : अग्रलेख : नंबर २ ता. १८।८।१९०६

मागील अंकीं ग्रीस देशांत राज्यक्रांतीला कशी सुरुवात झाली हें सांगितलें आहे. ही राज्यक्रांतीची उकळी पाण्याप्रमाणें लोक अतिशय तापल्यावांचून सहसा फुटत नाहीं. पण नुसता अतिशय जुलूम एवढेंच कारण राज्यक्रांतीला पुरत नाहीं. हा जुलूम आपल्याला नको, अशी बुद्धि लोकांच्या मनांत उत्पन्न व्हावयाला पाहिजे असते. हाच भावार्थ एका इंग्रजी इतिहासकारानें ग्रीसच्या या वेळच्या स्थितीसंबंधानें लिहितांना पुढील वाक्यामध्यें फार चांगल्या रीतीनें व्यक्त केला आहे.

It is not when the victims of oppression are most abject and most bitterly crushed, that they are ripest for insurrection and deliverance, but when the dignity of humanity exerts the strongest dominion over them. Not the crouching slave, but the man who has found it impossible to remain a slave, deserves and is able to be free.

वरील वाक्यांत अतिशय मोठें तत्त्व गोंवलेलें आहे. नुसतें गुलाम असण्यांत कांहीं अर्थ नाहीं. आजसुद्धां पृथ्वीच्या पाठीवर पुष्कळ गुलाम आहेत. ग्रीस देशांतील लोकांवर जितके जुलूम होत होते, तितके आज कोणावर

होत नाहींत असें नाहीं. किंबहुना त्याच्यापेक्षां शतपटीनें जास्तहि जुलूम अनेक अनाथ लोकांवर होत असतील. तसेंच ग्रीक लोकांपाशीं राज्यक्रांति घडवून आणण्याला जीं साधनें होतीं, तीं आज इतर लोकांपाशीं नाहींत असेंहि नाहीं. परंतु हीं साधनें असूनहि त्यांच्या योगानें इतर देश स्वतंत्र झाले नाहींत, अशीं उदाहरणें आहेत. आणि त्यावरून असेंच म्हणावें लागतें कीं, एखाद्या लोकांवर अतिशय जुलूम चाललेला असला आणि त्यांच्या हातामध्यें राज्यक्रांतीला उपयोगी पडणारीं पुष्कळ साधनें असलीं, तरी आपल्याच्यानें या गुलामगिरींमध्यें राहणें अशक्य आहे, असें त्यांना वाटूं लागल्याखेरीज जुलुमी राजांनीं कितीहि जुलूम केले तरी ते फुकट आहेत आणि देवानें राज्यक्रांतीसाठीं कितीहि अनुकूल स्थिति निर्माण करून ठेविली असली तरी ती व्यर्थ आहे. वरील प्रमाणें दुसऱ्याहि एका इंग्रजी इतिहासकारानें ह्या ग्रीसमधील राज्यक्रांतीसंबंधानें लिहीत असतांना हेंच तत्त्व अन्य शब्दांनीं प्रतिपादित केलेलं आहे.

The History of France. no less than the history of Greece shows that it is not the excess, but the sense of wrong that produces revolution. A people may be so crushed by oppression as to suffer all conceivable misery with patience. It is when the pulse has again begun to beat strong, when the eye is fixed no longer on the ground, and the kuowledge of good and evil again burns in the heart, that the right and the duty of resistance is felt.

राज्यक्रांति कशानें उत्पन्न होते? अतिशय जुलूम झाला म्हणजे? पुष्कळ लोक असें समजतात कीं, जुलमाची परमावधि झालेली नसते, म्हणून लोक त्या जुलुमाच्या विरुद्ध उठत नाहींत. पण हें गुलामांचें तत्त्वज्ञान अगदीं खोटें आहे. दगडांचें पीठ केलें, झाडें समूळ उपटून काढलीं, गांडूळ पायाखालीं चिरडून ठार मारले, तरीहि ते राज्यक्रांति करीत नाहींत. त्यांना राज्यक्रांति करण्याला जास्त जुलमाची अपेक्षा असते काय? असें नव्हे. ज्यांना आपल्यावर जुलूम होत आहे याचें ज्ञानच नाहीं, असे दगड आणि

गांडूळ यांच्या हातून त्या जुलमाचा प्रतिकार होणें कधींहि शक्य नाहीं. पुष्कळ जुलूम किंवा थोडा जुलूम ही प्रतिकाराला अपेक्षित गोष्ट नव्हे, तर जुलमाची चीड हें राज्यक्रांतीचें आदिकारण होय. फ्रान्स आणि ग्रीस ह्या दोन्ही ठिकाणच्या राज्यक्रांतीमध्येंहि हीच गोष्ट दृष्टोत्पत्तीस येते. जेव्हां आपल्यावर जुलूम होत आहे असें लोकांना कळूं लागतें आणि गुलामगिरीमध्यें राहून जुलूम सहन करणें ही अतिशय निंद्य गोष्ट आहे असा जेव्हां त्यांच्या मनामध्यें प्रकाश पडतो, तेव्हांच ते राज्यक्रांतीच्या उद्योगाला लागतात.

एकोणिसाव्या शतकांतील दुसऱ्या दशकाच्या अखेरीपर्यंत ग्रीस देशांत मुकाट्यानें जुलूम सहन करण्याच्याच अवस्थेमध्यें तेथील लोक होते. त्यांनीं सहन केलेले जुलूम आणि आपल्या हल्लींच्या तक्रारी यांच्यामध्यें कित्येक ठिकाणीं पुष्कळ साम्य आढळतें. ग्रीक मनुष्य आणि तुर्की मनुष्य यांच्यामध्यें जर भांडण उत्पन्न झालें, तर त्यांत ग्रीक मनुष्याला न्याय मिळण्याची मुळींच आशा नव्हती. टर्कीमध्यें मुसलमानांना शिक्षा देणारे कायदे आणि कोर्टें हींच मुळीं नव्हतीं. आपली स्थिति तितकी वाईट नाहीं. आपल्याकडे गोरे आणि काळे यांच्या दरम्यान कांहीं आगळीक घडली तरी त्यांत नेटिवाला न्याय मिळण्याची आपल्याकडेहि फारच थोडी आशा असते, हें आतांपर्यंत घडून आलेल्या न्यायाच्या अनेक निकालांवरून सर्वांना कळून चुकलेलेंच आहे. तरीपण गोऱ्या लोकांना शिक्षा सांगणारीं कलमेंच कायद्यांत नाहींत किंवा कोर्टेंच हिंदुस्थानांत नाहींत, अशी मात्र ग्रीससारखी शोचनीय स्थिति सुदैवानें आपल्याकडे नाहीं. शिवाय जमिनीचा सारा वसूल करण्याच्या कामांत आपल्याला जसा त्रास होतो तसाच पूर्वीं ग्रीक लोकांनाहि होत असे. परंतु या बारीकसारीक जुलमांपेक्षां दुसरा एक अतिशय भयंकर जुलूम ग्रीक लोकांवर त्या वेळीं होत होता. जमिनीचा सारा देण्याची ज्या गरीब ग्रीक लोकांना ऐपत नव्हती, त्यांचीं लहान लहान मुलें सरकारी अधिकाऱ्यांकडून पकडून नेलीं जात असत, व त्यांचा अतिशय वाईट कामाकडे उपयोग केला जात असे. त्या वर्गांतूनच टर्कीचे सुलतान आपल्या कांहीं पलटणी तयार करीत असत. यांना 'जॅनिझरीज' असें म्हणत असत. ह्या पलटणी फार शूर आणि पराक्रमी असल्याबद्दल त्यांची प्रख्याति असे. हीं ग्रीसमधील

ख्रिश्चन लोकांचींच मुलें असून त्यांच्या आईबापांना जिंकून गुलामगिरीमध्यें कायम ठेवण्याच्या कामाकडे टर्कीचे सुलतान त्यांचा उपयोग करीत असत. आणि येथें हिंदुस्थान आणि ग्रीस यांच्यामध्यें दुसरें एक साम्य उत्पन्न होतें. ग्रीसमधील-प्रमाणचें हिंदुस्थानांतीलहि पुष्कळ मुलें लहानपणीं आपल्या आईबापांस अंतरतात. राजांच्या करवसुलीपासून खालचे लोक अधिकाधिक गरीब होत जातात, व अखेरीस ते इतके गरीब होतात कीं, त्यांच्याजवळ पैसा न उरल्यामुळें पैशाच्या जागीं त्यांना आपले देह द्यावे लागतात, अशी अत्यंत दीन स्थिति येऊन पोहोंचते. इंग्लिश लोक फार न्यायी आणि दयाळु असल्या-मुळें ते टर्कीच्या सुलतानाप्रमाणें गरीब लोकांचीं मुलें त्यांच्या आईबापां-पासून प्रत्यक्ष कधींहि हिसकावून घेणार नाहींत. प्राण गेला तरी ते असली जुलमी गोष्ट उघड उघड रीतीनें करण्याला कधींहि प्रवृत्त व्हावयाचे नाहींत. तरीपण ग्रीसमधील मुलांप्रमाणें आपल्याइकडीलहि गरीबांचीं मुलें आपल्या आई-बापांपासून दूर होऊन दुसऱ्यांच्या ताब्यांत जातात हें कांहीं खोटें नव्हे. ज्यांनीं दुष्काळाच्या दिवसांत मिशनऱ्यांचीं कोठारें पाहिलीं असतील, त्यांना नेटिव अर्भकांचे किती देह त्या कोठारांतून सांठविलेले असतात, याची कल्पना येणें कठीण नाहीं. हीं मुलें मिशनरी लोक जबरदस्तीनें त्यांच्या आईबापां-पासून घेत नाहींत. तरी पण पैसे नाहींत म्हणून मुलें टाकावीं लागतात, ही भयंकर स्थिति दोन्ही देशांमध्यें सारखीच आहे. हिंदुस्थानांतील हीं मुलें ख्रिस्ती धर्मांत वाढून मोठीं झालीं म्हणजे पुढें तेच आपल्या आईबापांचे आणि देशबांधवांचे गुप्त शत्रु कसे बनतात, हें कोणाला सांगावयाला पाहिजे आहे असें नाहीं. ह्यावरून दारिद्र्यामुळें मुलें देण्याची चाल आपल्याइकडेहि नाहीं असें नाहीं. तसेंच आपल्या नेटिव पलटणींतील शिपाई हे इकडील इंग्लिशांचे एक प्रकारचे 'जॅनिझरीज'च होत असें म्हणण्यास हरकत नाहीं. तिकडील सुलतानांचे 'जॅनिझरीज' म्हणजे जिंकलेल्या लोकांपैकींच कांहीं असामींच्या बनविलेल्या पलटणी होत. त्या लोकांना आईबाप, भाऊबंद, देशधर्म, वगैरे कशाचीहि ओळख नसे. व हे लोक आपल्या देशबांधवांना सदोदित सुलतानाच्या गुलामगिरीमध्यें कायम राखीत असत. आणि अशा प्रकारची एक संस्था आपल्या हिंदुस्थानामध्येंहि आहे. गरीबीमुळें पोटाला मिळत नाहींसें होतें म्हणून इंडियन 'जॅनिझरीज'

सरकारी चाकरीमध्यें शिरतात. व तेथें असतांना त्यांनाहि आपले आईबाप, भाऊबंद, देशधर्म, वगैरे सर्व अत्यंत प्रियकर गोष्टी विसरून जाव्या लागतात, व आपल्या देशबांधवांना गुलामगिरीमध्यें कायम ठेवण्याच्या कामीं त्यांना मदत करावी लागते. अशा रीतीचें ग्रीस आणि हिंदुस्थान यांच्यामध्यें साम्य आहे. परंतु या साम्यामध्येंहि एक वैषम्य आहे. आणि तें कोणीहि विसरतां कामा नये. हिंदुस्थानांत जरी ग्रीससारखेच परिणाम उत्पन्न होत असले, तरी येथें कोणावर तसें करण्याबद्दल सक्ती होत नाहीं. मिशनरी लहान मुलें नेवोत आणि इंडियन ' जॅनिझरीज ' स्वदेशाच्या विरुद्ध वागोत, परंतु लोकांनीं आपलीं मुलें दिलींच पाहिजेत किंवा कोणीं ' जॅनिझरीज ' झालेंच पाहिजे, असा बिलकूल जुलूम नाहीं. आपण गरीबीमुळें अशा गोष्टी पत्करतों, हा आपला दोष आहे. सरकारकडे याचा कांहीं दोष नाहीं. आणि या दृष्टीनें पाहिलें असतां हिंदुस्थानांतल्यापेक्षां ग्रीस देशांतील त्या वेळची जुलमी स्थिति शंभरपटीनें अधिक भयंकर झालेली होती. ग्रीसवर सुलतानांचा इतका जुलूम चालला असतां त्याचा प्रतिकार न होणें कधीं तरी शक्य होतें काय? असले भयंकर गुन्हे करणारांस सृष्टीच्या नियमाप्रमाणें केव्हां तरी शासन मिळालेंच पाहिजे होतें. बीजापासून अंकुर उत्पन्न होतो किंवा वरून टाकलेला दगड जमिनीवर जाऊन पडतो, हे जसे सृष्टीचे बिनचूक नियम आहेत, त्याचप्रमाणें जुलमापासूनच जुलमी राजांचा नाश उत्पन्न होतो आणि अतिशय गांजणुकीपासूनच गांजलेल्या लोकांची स्वतंत्रता निर्माण होते, हे सृष्टीचे नियमहि कधीं खोटे व्हावयाचे नाहींत. त्याप्रमाणें ग्रीक लोकांच्या मनामध्यें स्वतंत्रतेची स्फूर्ति उत्पन्न झाली. ह्या वेळच्या ग्रीक लोकांच्या स्थितीसंबंधानें एका इतिहासकारानें पुढील प्रमाणें उद्गार काढले आहेत :—

The sacred right of rebellion had come almost as a revelation to the victims of Turkish misrule; and no sooner had they recognised that the casting off of a yoke was a solemn duty, than they became from that very moment practically free.

वरील वाक्यांतील तात्पर्य हें आहे कीं, मनें स्वतंत्र झाल्यावर शरीरें स्वतंत्र होण्याला फारसा अवकाश लागत नाहीं. आपल्याला हा टर्कीचा जुलूम

नको, व यापासून आपण स्वतंत्र झालें पाहिजे, अशी बुद्धि ग्रीक लोकांच्या मनांत उत्पन्न झाल्यापासून त्यांचीं सर्वच कृत्यें भिन्न रीतीनें होऊं लागलीं. ग्रीक लोकांवर जसा सुलतानांचा जुलूम होता तसा ग्रीक भाषेवर मुसलमानी भाषेचा जुलूम चाललेला होता. नवीन मुसलमानी शब्द ग्रीक भाषेंत घुसत होते आणि जुने मूळचे ग्रीक भाषेंतील रहिवासी शब्द हद्दपार केले जात होते. हा भाषेवरील जुलूम बंद करून आपली मातृभाषा स्वतंत्र करावी आणि पूर्वीच्या वैभवावर तिला पुनरपि नेऊन बसवावें, अशी इच्छा ग्रीक लोकांचे मनांत निर्माण झाली. व त्याप्रमाणें त्यांनीं आपल्या भाषेंत शिरलेल्या सर्व तुर्की शब्दांकरितां जुने ग्रीक प्रतिशब्द शोधून काढले. मनुष्याचें मन सगळीकडे एकच असतें. आपल्या इकडे नागरीप्रचारिणी सभेचा जो प्रयत्न आहे, त्यांत आणि या ग्रीक लोकांच्या प्रयत्नांत काय फरक आहे ? तसेंच इंग्रजी शब्दसुद्धां आपल्या देशी भाषांतून आलेले पुष्कळांना अलीकडे खपत नाहींसे झाले आहेत. इंग्रजीमध्यें लिहिणें नको, इंग्रजीमध्यें बोलणें नको, अशी इच्छा इकडेसुद्धां पुष्कळ प्रबळ होत चालली आहे. परंतु इंग्रजीमध्यें पुष्कळ चांगले विचार आहेत आणि ते आपल्याला पाहिजे आहेत, म्हणून त्या भाषेबद्दल आपला आदरहि पुष्कळ आहे. असो. ग्रीक लोकांचीं अंतःकरणें तुर्की भाषेविरुद्ध किती बिथरलेलीं होतीं हें पुढील एका गोष्टीवरून व्यक्त होतें. तोफ हा मुसलमानी शब्द आहे. व ग्रीक लोक इतके दिवस तोच शब्द वापरीत असत. पण तोफेची युक्ति नवीन असल्यामुळें ख्रिस्ती शतकापूर्वीच्या ग्रीक भाषेमध्यें तोफेला प्रतिशब्द असणें शक्य नव्हतें. तेव्हां त्यांनीं एक नवीन शब्द बनविला, परंतु तोफ हा आपल्या शत्रूंचा शब्द त्यांनीं स्वीकारला नाहीं. मनाला एकदां स्वतंत्रतेची गोडी लागली म्हणजे तें होतां होईल तोंपर्यंत प्रत्येक गोष्टीमध्यें स्वतंत्रतेचीं तत्त्वें लागू करण्याचा प्रयत्न करीत असतें. याच आपलेपणाच्या पिळानें ग्रीक लोक आपले जुने ग्रंथ वाचूं लागले. आणि त्यांचा ग्रीक लोकांच्या मनावर चांगला परिणाम झाला. ग्रीसमधील जुन्या ग्रंथांनीं मागें एकदां तर आपल्या लोकांना स्वतंत्रता दिलीच होती. परंतु या वेळीं दोन हजार वर्षांनंतरहि त्या ग्रंथांनीं ग्रीक लोकांना फिरून एकदां स्वतंत्र केलें. आपल्या महाभारतानें लोकांना स्फूर्ति येऊन शिवाजीच्या वेळीं ज्याप्रमाणें महाराष्ट्र स्वतंत्र झाला त्याचप्रमाणें

या वेळीं होमरनें ग्रीक लोकांना स्वतंत्र केलें; तसेंच ग्रीसच्या स्वतंत्रतेकरितां पुढें कोण शिपाई लढले असतील ते असोत, परंतु ग्रीसच्या स्वतंत्रतेचे पहिले शिपाई म्हटले म्हणजे ग्रीसमधील शिक्षक लोक होत. ग्रीसमधील कित्येक लोक प्रथमतः विद्या संपादण्यासाठीं व्हेनिसमध्यें गेले. परंतु ते दुसऱ्या देशांत गेले म्हणून ते आपल्या देशाला विसरले नाहींत. परदेशांतहि ते स्वदेशाला आपल्या अंतःकरणांत बाळगीत असत. तेथून येऊन त्यांनीं अथेन्स वगैरे ठिकाणीं शाळा काढल्या. पण ह्या शिक्षकांच्या शाळा होत्या. आपल्या इकडील ट्रेनिंग कॉलेजें वगैरेसारख्या संस्थांप्रमाणें या शाळांतून शिक्षक तयार होऊन ते सर्व देशभर पसरले, व त्यांनीं आपल्या देशबांधवांना स्वतंत्रतेचा उपदेश करण्याला आरंभ केला. आणि त्यापासून त्यांच्या प्रयत्नाच्या वृक्षाला स्वतंत्रतेचीं फळें आलीं ! या विद्याप्रसाराच्या कामीं ग्रीसमधील श्रीमंत लोकांनींहि पुष्कळ खटपट केली. मुसलमानी अंमलाच्या विरुद्ध एखाद्या एकट्याच श्रीमंत ग्रीक मनुष्यानें उठणें ही गोष्ट कठीण होती, यांत संशय नाहीं. परंतु त्या श्रीमंत मनुष्यानें आपली संपत्ति लोकांना विद्या देण्यांत खर्च करणें हें फारसें कठीण नव्हतें. व तें ग्रीसमधील श्रीमंत लोकांनीं केलें. या राजकीय बाबतींत नेहमींच असें असतें कीं, राजांच्या जुलुमाला प्रत्यक्ष प्रतिबंध करणें कठीण असतें. परंतु त्या प्रतिबंधाचीं कारणें किंवा त्या कारणांचीहि कारणें उत्पन्न करून ठेवणें फारसें अवघड नसतें. आणि हीं कारणें उत्पन्न झालीं म्हणजे तीं आपलें कार्य आपोआपच उत्पन्न करितात. यासाठीं ग्रीक लोकांनीं विद्याप्रसाराची जी युक्ति उपयोगांत आणली ती फार चांगली होती. आपल्या इकडील लोकांमध्यें एक प्रकारची धार्मिक बुद्धि आहे. परंतु तिचा विनियोग देशकालाला अनुरूप अशा रीतीनें होत नाहीं. लाडू आणि पोळ्या यांचीं सहस्रभोजनें श्रीमंतांनीं गरिबांना घातलीं म्हणजे आपण कृतकृत्य झालों असें आपल्या श्रीमंतांना वाटतें. परंतु लाडू आणि पोळ्या यांची चव एक क्षणभर जिभेला राहते. आणि त्या स्वतः फक्त एक दिवस पोटांत मुक्काम करतात. एक दिवसाच्या पलीकडे तो दानधर्म गरिबांच्या पोटांत नासल्या-शिवाय टिकत नाहीं. परंतु विद्येची देणगी ह्याच्यापेक्षां किती तरी पटीनें अधिक चांगली आहे ! सहस्र ब्राह्मणांना भोजन देण्यापेक्षां एकाला विद्या

देणें अधिक चांगलें. लाडूपोळ्यांनीं एक दिवस त्यांचें पोट भरेल, परंतु विद्या दिल्यानें तो जन्मभर आपलें पोट भरीत राहील. सबब असल्या राष्ट्रीय उपयोगाच्या गोष्टींकडे आपल्या श्रीमंत धार्मिकांचें लक्ष लागलें पाहिजे, तरच त्यांच्या संपत्तीचा कांहीं खरा उपयोग होईल. पण ग्रीस देशांतील श्रीमंत लोक फक्त शाळा आणि शिक्षक यांचा फैलाव करूनच राहिले नाहींत; त्यांनीं ठिकठिकाणीं लायब्ऱ्या स्थापित केल्या व लोकांमध्यें पुस्तकें वांटूनहि त्यांनीं विद्येचा बराच प्रसार केला. सारांश, ग्रीक लोकांनीं आपल्या देशबांधवांना सुशिक्षित करण्याचे कामीं अतिशय प्रयत्न केले व त्यामुळेंच ते स्वतंत्रतेला पात्र झाले. ज्ञान ही स्वतंत्रतेची पहिली पायरी आहे. ग्रीस देशामध्यें विद्याप्रसाराची अशी जंगी चळवळ चालली असता तेथील कविहि स्वस्थ बसलेले होते असें नाहीं. कवि हे राष्ट्राचे मार्गदर्शक होत. अशाप्रकारच्या त्या वेळच्या ग्रीक कवींमध्येंहि स्वतंत्रतेनें आगाऊ संचार केलेला होता. त्यामुळें त्यांचीं या वेळचीं काव्यें राष्ट्रामध्यें स्वतंत्रतेचा उत्साह उत्पन्न करणारीं अशीं होतीं. काव्य हें मनुष्याच्या अंतःकरणाला स्पर्श करणारें असें एक अत्यंत पवित्र शस्त्र देवानें मनुष्याच्या हातांत देऊन ठेविलेलें आहे. त्याचा उपयोग ग्रीक कवि गुलामगिरीची स्तुति गाण्याकडे करीत नव्हते. टर्कीच्या सुलतानाची स्तुति, त्याच्या पोरांचें स्तोत्र, त्याच्या पोरीच्या टोपीवर एक कविता, त्याच्या दारच्या कुत्र्यावर एक काव्य, अशा नीच वृत्तीनें ते आपल्या काव्यशक्तीला मळवीत नव्हते. आपल्या स्वदेशबांधवांचीं मनें निर्मळ स्वदेशभक्तीनें उंचबळून जावींत अशा हेतूसाठींच ते वाग्देवतेला प्रसन्न करून घेत असत. या वेळच्या त्यांच्या कवितांमधून स्वदेशभक्ति आणि स्वतंत्रतेची प्रीति निरानिराळ्या रीतीनें व्यक्त झाली आहे. शत्रूवर चालून जाणारीं सैन्यें ह्या कविता म्हणत असत आणि त्या योगानें त्यांना लढाईचे वेळीं विशेषच स्फुरण चढत असे 'The Turk shall live no onger, neither in Morea nor in the whole earth.' म्हणजे, फक्त आमच्या देशांतच काय, पण साऱ्या पृथ्वीवरहि तुर्क मनुष्य राहतां कामा नये, हें ग्रीक लोकांचें लढाईचें गाणें होतें. दुसऱ्या एका स्वतंत्रतेवरील कवितेमध्यें पुढीलप्रमाणें विचार व्यक्त करण्यांत आलेले आहेतः— "हे स्वतंत्रते! तुझें तेज विद्युल्लतेप्रमाणें अद्भुत आहे. तुझ्या तेजानें जुलमी

राजे दग्ध होऊन जातात. आणि तुझ्या आवेशानें शूर लोकांना स्फुरण चढतें. असें तुझें तेज येथें अपूर्व होतें. दुर्दैवानें तुला या ग्रीस देशामध्यें लयास जावें लागलें. परंतु आतां तूं आपलें थडगें सोडून बाहेर ये अशी तुला परमेश्वरानें फिरून आज्ञा केली आहे. परकीय जुलमानें दग्ध होऊन गेलेल्या आमच्या या देशामध्यें तूं तें आपलें तेज फिरून प्रज्ज्वलित कर. पुष्कळ शस्त्रें तयार आहेत. तुझ्या कृपेचा मात्र अवकाश आहे. इतके दिवस आम्ही डोंगरांतून आणि मैदानांवरून मुकाट्यानें बसलों होतों. प्रत्येक हातात साखळदंड घातलेले होते. आणि प्रत्येक अंतःकरण हताश होऊन गेलेलें होतें. परंतु आतां ग्रीसमधील लोक कितीहि संकटें आलीं तरी त्यांना न जुमानतां लढण्याला तयार झाले आहेत. आणि कोणत्याहि परकीय मनुष्याचा विश्वास न ठेवतां, स्वतंत्रता तरी मिळवूं किंवा मरून तरी जाऊं अशा निकरावर ते आलेले आहेत.'' प्रख्यात इंग्रजी कवि लॉर्ड बायरन यानें ग्रीक लोकांच्या अशाच एका वीररसप्रधान कवितेचें भाषांतर इंग्रजीमध्यें केलेलें आहे. त्यांतील सारांश येणेंप्रमाणें आहे:—"ग्रीसमधील लोकहो! उठा. तो अत्यंत स्पृहणीय समय आता प्राप्त झाला आहे. अशा वेळीं आपण कोणाच्या पोटीं जन्मास आलों आहों, हें जगाला दाखवा. हातांत शस्त्रें घेऊन आपण आपल्या शत्रूंविरुद्ध जाऊं चला. तुर्की जुलुमाचें जोखड तुम्हीं झुगारून दिलें आहे, आणि आपल्या हातापायांतील गुलामगिरीच्या शृंखला तुम्हीं तोडून टाकल्या आहेत, असें आपल्या देशाला दाखवा. पूर्वीं गतप्राण झालेल्या योद्धयांनों आणि साधूंनों, आम्ही हें स्वतंत्रतेकरितां युद्ध सुरू करीत आहों, त्याकडे तुम्ही कृपादृष्टीनें पहा. तुम्ही आमच्यासाठीं फिरून जिवंत व्हा. आम्ही जो हा रणदुंदुभि वाजवीत आहों त्याच्या आवाजानें तुम्ही झोपेंतून जागे व्हा, आणि आम्ही स्वतंत्र होईपर्यंत तुम्ही आमच्या बाजूनें लढा. हे स्पार्टा देशा! तुला अजून कशी झोंप लागली आहे? ज्यानें आपला देश स्वतंत्र राखण्याकरितां तीनशें लोकांनिशीं परशियन लोकांच्या सैन्यसमुद्राबरोबर लढाई करून थरमॉपिली येथें जय मिळविला, तो लिओनिडास अजून कोठें आहे? तुम्ही सर्वजण आम्हांस साह्य करा.'' ह्या वर दिलेल्या थोड्याशा नमुन्यावरून त्या वेळच्या ग्रीक लोकांची कविता काय होती आणि तिच्यापासून लोकांच्या

अंतःकरणांमध्यें स्वदेशभक्ति कशी पेट घेत होती, याबद्दल थोडीशी कल्पना आल्यावांचून राहणार नाहीं. ह्याशिवाय इतर मोठमोठीं मुलकीं कामें, व्यापारधंदा वगैरे बाबतींतहि ग्रीक लोक स्वतंत्रतेच्या दिशेकडे पुष्कळ पुढें सरसावलेले होते. तरीपण त्यांची एकंदर स्थिति जितकी सुधारावी तितकी सुधारेना. त्यावरून तर ग्रीक लोकांची अशी खात्री झाली कीं, आपल्याला राजकीय स्वतंत्रता मिळाल्यावांचून आपलें डोकें कधींहि वर निघावयाचें नाहीं. ( Until the national independence was established, no permanent improvement could be effected in the moral condition of the people.—Finlay.)

सर्व करूनहि कांहीं होत नाहीं अशी जेव्हां स्थिति झाली, तेव्हांच ग्रीक लोक शेवटच्या राज्यक्रांतीच्या उपायाकडे वळले. त्या उपायाचा उपक्रम ग्रीसमध्यें कसा झाला, ह्याचें दिग्दर्शन मागील अंकीं केलेलेंच आहे. ग्रीक लोकांनीं बंड करण्याला सुरुवात केली ही बातमी कॉनुस्टॅनुटिनोपल येथें कळतांक्षणींच सुलतान महम्मद यानें त्याच्या विरुद्ध उपाय योजण्याला सुरुवात केली. ग्रीक लोक हे धर्मानें ख्रिश्चन होते. व त्यांचा धर्मगुरु कॉनुस्टॅन्टिनोपल येथें रहात होता. ख्रिस्ती धर्मातील लोक आपल्या कह्यांत रहावेत, म्हणून सुलतान या धर्मगुरूंना कॉनुस्टॅन्टिनोपल येथें मोठ्या इतमानानें वागवीत असत. ह्या धर्मगुरूंच्या धार्मिक वजनानें सर्व ख्रिस्ती लोक आपल्या राजकीय अमलाखालीं खुषीनें रहावेत, हा दुष्ट हेतु या व्यवस्थेमध्यें मुख्य होता. आणि त्यामुळें कॉनुस्टॅन्टिनोपल येथील ख्रिस्ती धर्मगुरु सुलतानांच्या ताटाखालील एक मांजर होऊन बसलेलें होतें. ग्रीक लोकांनीं बंड केल्याबरोबर या गोष्टीविषयीं तुम्ही आपली नापसंती प्रदर्शित करा, असा हुकूम सुलतान महंमद यानें सोडला. आणि पॅट्रिआर्क ग्रेगोरियस यानें तो अमलांत आणला. ग्रेगोरियसाचें हें कृत्य पाहून कोणालाहि वाईट वांटल्यावाचून रहावयाचें नाहीं. धर्मगुरु हे लोकांना धर्माचा उपदेश करण्याकरितां आहेत. जुलमी राजांची गुलामगिरी त्या लोकांवर कायम राखण्याकरितां नाहींत. धर्म ही पवित्र वस्तु होय. ज्यानें मनुष्य बंधमुक्त व्हावयाचा तो धर्म. परंतु लुच्चे जुलमी राजे लोकांना आपल्या दुष्ट बंधनांनीं जास्त बद्ध करण्याकरितां त्या धर्माचा उपयोग करितात याच्यापेक्षां आणखी

निंद्य गोष्ट काय असणार ? तसेंच धर्मगुरु हे लोकांना वांचविणारे होत. ते कांहीं लुटारूंचे, दरवडेखोरांचे, खून करणारांचे, किंवा जुल्मी राजांचे साथीदार नव्हेत. पण सुलतान महंमद यानें ग्रेगोरियसचा आपल्या एका साथीदाराप्रमाणें उपयोग करून घेतला. धर्मगुरूंनीं केलेल्या बनावट निर्भर्त्सनेमुळें लोक राज्यक्रांतीच्या प्रयत्नापासून परावृत्त झाले, असें मुळींच नाहीं. परंतु त्या धर्मगुरूंना मात्र त्यांच्या पातकांचें लवकरच शासन मिळालें. एके दिवशीं सुलतानाला असा संशय आला कीं, हिटेरिस्ट लोकांच्या गुप्त मंडळीमध्यें हा खिस्ती धर्मगुरु सामील असावा. व तेवढ्या संशयावरून त्याला फांशीची शिक्षा देण्यांत आली. सुलतानाच्या या क्रूर कृत्यामुळें तर ग्रीक लोकांचीं मनें अधिकच खवळून गेलीं. ग्रीक लोक ही सुलतानाच्या ताब्यांतील प्रजा होती; त्यामुळें त्यांनीं बंड केलें म्हणून सुलतानाला राग आला हें ठीकच आहे. परंतु युरोपांतील इतर राजांना त्यामुळें खवळून जाण्याचें कांहीं कारण नव्हतें. पण ह्या ग्रीसमधील बंडाच्या बातमीनें त्यांचेंहि पित्त खवळून गेलें. त्या वेळीं युरोप खंडामध्यें 'Holy Alliance' या नांवाचा एक संघ कांहीं प्रमुख राजानीं केला होता. व युरोप खंडामध्यें कोणालाहि स्वतंत्र होऊं द्यावयाचें नाहीं असा त्यांचा हेतु होता. कोणी आपल्या मनगटाच्या जोरावर स्वतंत्र होऊं लागले, तर वास्तविक याच्या पदरचें कांहीं खर्च होत होतें असें नाहीं. पण आपलें हित न साधत असतांहि दुसऱ्याचें हित साधूं द्यावयाचें नाहीं, अशा दुर्जनांचा भर्तृहरीनें जो एक वर्ग केलेला आहे, त्या वर्गात मोडण्याला योग्य असे त्या वेळीं या "Holy Alliance" मध्यें कित्येक साधु पुरुष असल्यामुळें, जुलुमी राजांना आपल्या प्रजेवर यथेच्छ जुलूम करण्याची जणूं काय सनदच मिळालेली होती. रशिया, ऑस्ट्रिया, फ्रान्स व इंग्लंड हे देश या संघामध्यें प्रमुख होते. यांपैकीं कोणाच्या विरुद्ध ग्रीक लोक बंड करीत होते असें नाहीं, तरीपण ग्रीक लोकांच्या या बंडाला हाणून पाडण्याचा त्यांचा निश्चय ठरला. रशियाचा झार आपल्या बंडाला अनुकूल आहे अशी या वेळेपर्यंत ग्रीक लोकांची खात्री होती. परंतु ह्या बंडाची आणि इप्सिलँटीच्या जाहिरनाम्याची बातमी ऐकून झारच्या तोंडून

येणेंप्रमाणें उद्गार निघाले :—" मी या ग्रीसच्या बंडाला मदत केली तर कदाचित् त्यापासून माझ्या साम्राज्यांत भर पडेल. पण मला आणखी मुलूख मिळवून काय करावयाचें आहे ? परमेश्वरानें माझ्या हाताखालीं आठ लक्ष शिपाई दिले आहेत, ते माझी महत्त्वाकांक्षा परिपूर्ण करण्याकरितां नव्हेत; तर त्यांच्या साह्यानें मी धर्म, नीति आणि न्याय यांचें संरक्षण केलें पाहिजे. ह्याकरितां ह्या बंडाला आपण मदत करणार नाहीं. " असें सांगून त्यानें इप्सिलँटि याच्या वर्तनासंबंधानेंहि आपली नापसंती प्रदर्शित केली, आणि त्याचें नांव आपल्या लष्करी चाकरींतून काढून टाकावें असा हुकूम सोडला. ह्या सगळ्या कारणांनीं ग्रीक लोकांचा थोडासा धीर खचला. परंतु ज्यांना अंतःकरणापासून स्वातंत्र्याची आवड उत्पन्न झाली, ते दुसऱ्याच्या मदती-साठीं सुरुवात केल्यावर मग थांबून बसत नाहींत. ग्रीक लोकांनीं जास्त नेटानें प्रयत्न सुरू केला. त्यांत त्यांना कसें यश आलें, हें पुढील अंकीं दाखविण्यांत येईल.

---

## ग्रीस देश कसा स्वतंत्र झाला ? : : : ८

काळ : अग्रलेख, नंबर ३, ता. २५-८-१९०५

पूर्वीं सांगितलेल्या अनेक कारणांमुळें ग्रीस देशांत राज्यक्रांतीला सुरुवात झाली. राज्यक्रांतीचा सुरुवातीचा क्षण ही एक मोठी विलक्षण वेळ असते. या क्षणाच्या पूर्वीं राज्यक्रांतीचे गुप्त प्रयत्न चाललेले असतात आणि या क्षणाच्या नंतर राज्यक्रांतीला उघड प्रारंभ होतो. राज्यक्रांतीचा गुप्त प्रयत्न चाललेला असतो, तोंपर्यंत सर्व लोकांचें तें कृत्य चोरीचें असतें. वास्तविक

तें कृत्य पवित्र असूनहि त्या कृत्यात जो कोणी सांपडेल तो चोर, लबाड, आणि अधम म्हणून ठरतो. तो लोकांच्या कल्याणासाठीं यत्न करीत असतांहि तेच लोक त्याची निर्भर्त्सना करण्याला तयार होतात, आणि राजा त्याला शासन करतो. रात्रीशिवाय त्याला वेळ नाहीं, आणि अरण्याशिवाय त्याला जागा नाहीं, अशी त्याची स्थिति असते. प्रत्येक कामाची त्याला चोरी. ज्यांच्यावर उपकार करावयाचे त्यांच्यावरहि विश्वास टाकण्याची सोय नाहीं. अशा रीतीनें ह्या गुप्त प्रयत्नाच्या अवस्थेमध्यें मनुष्याची स्थिति होऊन गेलेली असते. परंतु सुरुवातीचा क्षण उलटून गेला म्हणजे त्याच स्थितीमध्यें कितीतरी अंतर पडतें! जें कृत्य करण्याची चोरी असते, तें पवित्र कर्तव्यकर्म बनून जातें. जे चोर, बदमाप, अधम म्हणून गणले जाण्याची भीति असते, ते परोपकारी, सद्वर्तनी, आणि उदात्त अंतःकरणाचे देशभक्त म्हणून मानले जातात. ज्यांना राजानें दंड केला असतो, त्यांच्या भयानें राजे थरथर कांपूं लागतात. ज्या कृत्यांत यत्किंचित्हि संबंध ठेवण्याची लोकांना भीति वाटत असते, त्या कृत्याला तेच लोक आपलें सर्वस्व वाहून टाकण्याला तयार होतात. जे राजद्रोहाच्या आरोपाला पात्र झाले असते, ते सन्मान्य देशभक्त बनतात. जे लोक आपली गुप्त मसलत आपल्या जिवलग मित्राच्या कानांतसुद्धां मोठ्यानें बोलण्याला धजत नसतात, ते आपल्या तक्रारी तोफांच्या गर्जनांच्या मोठ्या आवाजांनीं सर्व जगापुढें मांडतात. जेथें अंधःकार असतो तेथें सूर्यप्रकाश पसरतो. जें पाप असतें तें पुण्य होतें. जें दूषण असतें तें भूषण बनतें. जें परिहरणीय असतें तें अवश्यादरणीय होतें. जें त्याज्य असतें तें ग्राह्य होतें. जें अपकीर्तिकारक असतें, तें यशस्कर बनतें. आणि ज्या कृत्यामध्यें सामील होण्याला शूरहि भीत असतात, त्या कृत्यामध्यें भ्याडहि सामील होण्याला पुढें सरसावतात. अशा रीतीचा एकदम फरक पडतो. यासाठीं राज्यक्रांतीला गुप्त प्रयत्न जितका आवश्यक आहे तितकाच उघड प्रारंभहि हितकारक आहे. प्रवासांत रात्रीची मजल बरीच होते हें खरें, पण सूर्यप्रकाशापासूनहि अनेक फायदे आहेत. सर्व मार्ग डोळ्यापुढें दिसूं लागतो, व त्यामुळें अडचणीच्या जागा टाळण्याला जास्त मदत होते. राज्यक्रांतीचीहि अशीच गोष्ट आहे.

ग्रीसच्या राज्यक्रांतीमध्यें हे फायदे लक्षांत आणून निरनिराळ्या ठिकाणच्या लोकांनीं एकदम बंडाला सुरुवात केली. थिओडर आणि इप्सिलँटी यांनीं ग्रीसच्या उत्तरेकडील वॅलेशिआ आणि मोल्डेव्हिआ या प्रांतांत बंडाचा उपक्रम केल्याबरोबर खुद्द ग्रीस देशामध्येंहि ठिकठिकाणीं लोक हातांत शस्त्रें घेऊन उठले. कोलोकोट्रोनी, मिकाएल वगैरे ग्रीक लोकांचे पुढारी आपापल्या तयारीमध्यें होतेच. त्यांनीं डोंगरांच्या गुहांतून पुष्कळ शस्त्रें जमा करून ठेविलीं होतीं. त्यांना सुरुवात करण्याविषयीं इप्सिलँटीकडून सूचना मिळतां-क्षणींच ग्रीसच्या दाक्षिण भागांत चोहोंकडे वणवा पेटला. शेतकरी लोक आपापल्या डोंगरांतून जमा झाले. कोनाकोपऱ्यांत पडलेलीं जुनीं हत्यारें हुडकून काढण्यांत आलीं. आणि त्यांचे तुर्क लोकांवर प्रहार होऊं लागले. सामान्य लोक याप्रमाणें आपल्या देशाच्या स्वतंत्रतेसाठीं जिवावर उदार होऊन पुढें सरसावले असतां ग्रीसमधील धर्माधिकारी लोक देवाच्या स्मरणीचे लांकडी मणी ओढीत स्वस्थ बसले नव्हते. कित्येक ठिकाणीं तर धर्मोपदेशक बंडवाल्यांचे पुढारीहि झाले. त्यांचीं सैन्यें शत्रूवर चाल करून जात, तेव्हां ते बायबलमधील गाणीं म्हणत, व ते आपल्या अनुयायी लोकांना असें सांगत कीं, ही धर्माकरितां लढाई आहे, या लढाईमध्यें जो कोणी मरेल तो स्वर्गलोकामध्यें जाईल. "हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम् ।" हें आपल्यामधील आणीबाणीचें आणि उदात्त-पणाचें तत्त्व त्या वेळीं ग्रीसमधील धर्मोपदेशकाहि आपल्या लोकांना सांगून त्यांना लढाईला उद्युक्त करीत होते. अशा रीतीनें पॅट्रस, ॲथेन्स, क्रीट, हायड्रा, स्पेझिआ, इप्सारा वगैरे सर्व ठिकाणीं बंडाचा प्रादुर्भाव झाला. अर्चिपेलागोमधील सर्व बेटांनीं आपलें स्वतंत्रतेचें आणि स्वधर्माचें निशाण उभारलें. समुद्र कांठचीं जीं शहरें होतीं आणि समुद्रामध्यें जीं बेटें होतीं त्यांनीं जलमार्गानें शत्रूचा प्रतिबंध करण्याकरितां आपापलीं गलबतें तयार केलीं. ग्रीसमध्यें डोंगराळ मुलूख फार आहे, आणि तेथें जाण्याला रस्ते वगैरे सोई फारशा नाहींत, त्यामुळें बंडाची पूर्वरचना करण्याला ग्रीक लोकांना डोंगरी किल्ले फार उपयोगी पडले. तेथें त्यांना गुप्तपणें मोठमोठीं सैन्यें जमवितां आलीं. एपिरस, थिसली, ऑलिंपसचे डोंगर, म्यासिडोनियांतील डोंगर, कॅसंड्रा वगैरे सर्व ठिकाणीं हजारों लोक जमा झाले, आणि त्यांनीं आपणांवर शेकडों वर्षें चालू

असलेल्या जुलमाचा प्रतिकार करण्याला सुरुवात केली. हायड्रा, स्पेझिआ, वगैरे ठिकाणच्या लोकांनीं बंडाला सुरुवात करतेवेळीं असें प्रसिद्ध केलें कीं, " आम्हां लोकांच्या मानेवर हें जोखड आज शेंकडों वर्षे असून आम्हांला तें चिरडून टाकीत आहे. त्या जोखडाचें ओझें आमच्या मानेला इतकें जड आणि दुःसह झालें आहे कीं, दुःखानें कण्हण्याचेंहि सामर्थ्य आमच्यामध्यें राहिलें नाहीं. अशा स्थितींत आम्हांवर जुलूम करणारांविरुद्ध शस्त्र उचलण्याचा आम्हीं निश्चय केला आहे. आमच्यामध्यें आपसांत भांडणें आहेत. परंतु तीं आम्ही सर्व या घटकेला विसरून जात आहों, व सर्वजण एक होत आहों. आपले आपसांतील सर्व तंटे विसरून जाणें अवश्य आहे, हें आम्हांवर होणाऱ्या निष्ठुर जुलमानेंच आम्हांला शिकविलें आहे. असें केल्यामुळें आम्हांला स्वतंत्रतेच्या हवेमध्यें आज श्वासोच्छ्वास करतां येऊं लागला आहे. आमच्या हातांनीं आपल्या गुलामगिरीच्या शृंखला तोडून टाकिल्या आहेत आणि ते हात आतां आपल्या शत्रूंचा समाचार घेण्याला प्रवृत्त झाले आहेत." अशा रीतीचे मनोविकार ग्रीस देशांत सर्वत्र एकाच वेळीं प्रज्वालित झाले आणि सर्व ठिकाणीं एकदम बंडाला सुरुवात झाली. एकाच वेळीं अनेक ठिकाणीं सुरुवात होण्यामध्येंच यश असतें, हें ग्रीसच्या उदाहरणावरून चांगलें व्यक्त होतें. अमक्यांनीं केलें आहे त्यांचें काय होतें तें पाहूं आणि त्यांना जय आला म्हणजे आपणहि सुरुवात करूं, ही विचारसरणी ग्रीसमध्यें कोठेंहि दिसली नाहीं. ही विचाराची दिशा राष्ट्रीय हिताला फार विघातक आहे. जय आल्यानंतर जयाच्या पक्षाला कोणीहि मिळतील, आणि जयाचें अनुकरण करण्याला कोणीहि धजतील. परंतु खरें साहस पहिला जय मिळविण्याच्या प्रयत्नांतच आहे. एकाच वेळीं अनेक ठिकाणीं बंडें उद्भवल्यानें ग्रीसमधील राज्य करणारी सत्ता अगदीं घाबरून गेली. कोणीकडे किती लोक जमा झाले आहेत, याचा तिला अंदाज कळेना. एका ठिकाणींच बंड असतें, तर तेवढ्यावरच एखादें सैन्य पाठवून त्याचा नाश करतां आला असता. परंतु चोहोंकडून वणवा पेटल्यामुळें त्या सत्तेचें चित्त व्यग्र होऊन गेलें. आणि शत्रूचें चित्त गोंधळून टाकणें यामध्येंच निम्मा जय आहे.

आणि तो जय ग्रीक लोकांनीं त्या वेळीं प्रथमतः मिळविला. ते एकमेकांची वाट पहात बसले नाहींत. सर्वांनीं एकाच वेळीं बंडाला सुरुवात केली.

राज्य करणारी सत्ता आणि तिच्या विरुद्ध बंड या दोन गोष्टींमध्यें स्वभावतःच असें एक अंतर आहे कीं, राज्य करणाऱ्या सत्तेला पुष्कळ दिवसांच्या फुरसतीनें व्यवस्थित रूप आलेलें असतें. आणि बंड आयत्या वेळीं उपस्थित होणारें असल्यामुळें त्याच्यांत व्यवस्था राहणें फार कठीण पडतें. राजाचें सैन्य बंडवाल्यांविरुद्ध चालून गेलें तर त्याला अन्नसामग्री, दारुगोळा, पैसाअडका, वगैरे वेळच्या वेळीं पोहोंचविण्यासाठीं सर्व व्यवस्था जय्यत असते. परंतु बंडवाल्या लोकांमध्यें ही व्यवस्था तावडतोब उत्पन्न होऊं शकत नाहीं. बंडवाल्यांनीं बंडाचें निशाण उभारल्याबरोबर कॉमिसरीअॅट, ट्रॅन्स्पोर्ट, आर्डनन्स वगैरे खातीं त्यांच्यापाशीं तयार असूं शकत नाहींत, आणि त्यामुळें त्यांना मोठी अडचण पडते. गांजलेल्या देशांतील सर्वच लोक बंडवाल्यांना अनुकूल असल्यामुळें ते जेथें जातील तेथें लोक त्यांच्या कांहीं कांहीं गरजा भागवितात, हें खरें आहे. परंतु पुष्कळ वेळां ही सोय जमत नाहीं. आणि त्यामुळें राज्यक्रांतिकारक टोळ्यांना कित्येक ठिकाणीं बळजबरीनेंहि अन्न, पैसा, घोडे वगैरे साधनें बळकावून घ्यावीं लागतात. आणि त्यामुळें त्यांच्या सद्धेतूलाहि लुटारूपणाचा कलंक लावण्याची त्यांच्या शत्रूंना अनायासानें संधि सांपडते. असा प्रसंग आपल्यावर न यावा याबद्दल ग्रीसच्या राज्यक्रांतीमध्यें एक विशेष तजवीज केलेली आढळून येते. आपल्या इकडे ग्रामसंस्था ( village system ) ची पद्धत इंग्रज सरकारानें मोडून टाकली आहे. परंतु टर्कीच्या साम्राज्यामध्यें त्यावेळीं ही पद्धत चोहोंकडे सुरू होती. लोकांमध्यें एकीचें आणि कर्तृत्वाचें बीजसुद्धां राहूं नये, व वाळवंटांतील वाळूच्या कणांप्रमाणें प्रत्येकानें प्रत्येकापासून भिन्न असावें, म्हणजे त्यांना पाहिजे तेव्हां उडवून टाकतां येतें, यासाठीं ग्रामसंस्थांची पद्धत आपल्या ताब्यांतील लोकांमध्यें कायम ठेवूं नये, ही युक्ति टर्कीच्या सुलतानांना सुचलेली नव्हती. त्यामुळें ग्रीसमध्यें सर्वत्र ग्रामसंस्था कायम होत्या. व ठिकठिकाणच्या लोकांच्या अंगांत आपापलीं स्थानिक कामें करण्याची कर्तृत्वशक्ति शाबूद होती. त्यामुळें ग्रीस देशांत बंडाला सुरुवात झाल्याबरोबर एक मोठा विलक्षण चमत्कार दिसून आला. सर्व ग्रीक लोकांचे एकदम दोन वर्ग झाले. ज्यांच्या

अंगांत ताकद होती ते लढाईकरितां पुढें सरसावले, आणि ज्यांच्या अंगामध्यें शहाणपण होतें, ते लढाईवर जाणाऱ्या सैन्याची सर्व प्रकारची तरतूद करण्याकरितां मागें राहिले. ग्रामसंस्थांच्या पद्धतीमुळें असलीं कामें कशीं करावीं याबद्दल त्या लोकांना शिक्षण मिळालेलें होतें, म्हणून ते ताबडतोब आपल्या कामाला लागले. पिलापोनिससमधील सर्व पुढारी एकत्र झाले आणि त्यांनीं पुढें लिहिल्याप्रमाणें एक जाहिरनामा प्रसिद्ध केला: "आपण आपला देश परकीय जुलुमापासून सोडविण्यासाठीं हातामध्यें शस्त्रें घेतलीं आहेत. आपल्या स्वदेशबांधवांना त्यांची स्वतंत्रता मिळवून द्यावी हा आपला हेतु आहे. आपली स्वतंत्रता, आपला धर्म आणि आपला प्रसिद्ध देश या सगळ्यांच्या संरक्षणासाठीं आपण लढाई करणें हें आपलें कर्तव्य आहे, व तें करण्याला आम्ही प्रवृत्त झालों आहों. या कामीं आम्ही लोकांकडून दुसरें कांहीं मागत नाहीं. फक्त त्यांनीं आम्हांला हत्यारें, पैसा आणि योग्य सल्ला यांचा पुरवठा करावा." अशा प्रकारचा एक जाहिरनामा प्रसिद्ध करून त्यांनीं सर्व राज्यक्रांतिकारक सैन्याची व्यवस्था आपल्या हातामध्यें घेतली. हायड्रा येथेंहि अशाच प्रकारची एक संस्था स्थापन झाली. ॲथेन्स हें जें ग्रीसमधील पूर्वीचें इतिहासप्रसिद्ध मुख्य शहर, तेथेंसुद्धां एक सीनेटची सभा स्थापन झाली, व या सगळ्या संस्थांनीं, लढणाऱ्या सैन्यांनीं कोठें हल्ले करावे, केव्हां छापे घालावे, वगैरे गोष्टी ठरविणें, त्यांना सामग्री पोंचविणें त्यांना दारुगोळ्यांचा आणि हत्यारांचा पुरवठा करणें, जखमी लोकांच्या कुटुंबांचें पोषण करणें, वगैरे कामें आपल्या हातांत घेऊन ग्रीसची राज्यक्रांति यशस्वी करून सोडली. निरनिराळ्या ठिकाणीं पसरणाऱ्या अनेक लढाऊ टोळ्यांचा एका ठिकाणीं संबंध असणें आणि त्या केंद्रस्थानापासून सर्वांचीं सूत्रें चालविलीं जाणें अत्यंत आवश्यक असतें; अशा एकसूत्रीपणाशिवाय लढाईत यश येणें अशक्य आहे आणि हें जाणून तशी व्यवस्था ग्रीक लोकांनीं प्रथमपासूनच सुरू केली होती, ही गोष्ट त्यांना मोठी भूषणावह आहे.

ग्रीक लोकांनीं सर्व देशभर असा धुमाकूळ मांडल्यानंतर सुलतानालाहि कांहीं तरी हातपाय हालविणें आवश्यक होतें, व त्याप्रमाणें हें बंड मोडण्याचे सरकारी प्रयत्न सुरू झाले. मुसलमान लोकांचीं मनें फारच खवळून गेलीं.

सर्व साम्राज्यांतील मुसलमान लोक कॉन्स्टँटिनोपल येथें गोळा झाले, व ग्रीक लोकांची कत्तल करण्याविषयीं आम्हांला हुकूम द्या असें म्हणूं लागले. त्यांचा तो आवेश दाबामध्यें ठेवणें फार भयंकर व अगदीं अशक्य होतें. त्यामुळें ठिकठिकाणीं गरीब आणि अनाथ अशा लोकांच्या कत्तलीला सुरुवात झाली. महंमदी त्वेषानें पॅट्रिआर्क ग्रेगोरिअस याचा पहिला बळी घेतल्याचें मागें सांगितलेंच आहे. त्यानंतर दुसरेहि कित्येक धर्माधिकारी त्याच वाटेनें परलोकीं रवाना करण्यांत आले. ख्रिस्ती देवळें फोडलीं गेलीं. व त्यांतील सर्व मौल्यवान् चीजवस्त लुटली गेली. दररोज ग्रीक लोकांचे खून होऊं लागले, त्यांची मालमिळकत लुटली जाऊं लागली, आणि त्यांच्या बायका व मुली गुलाम म्हणून विकल्या जाऊं लागल्या. आणि सुमारें दहा दिवसांच्या अवकाशांत हजारों ग्रीक लोकांच्या प्रेतांचे ढीग पडले. ख्रिस्ती धर्मांतील बिशप, आर्चबिशप वगैरेसारख्या मोठमोठ्या लोकांनाहि चौकशी-वांचून भर रस्त्यावर फाशीं देण्यांत आलें. सॅलोनिका येथील किल्ल्यावर तर मुसलमान लोकांच्या क्रोधावेशामुळें एक फारच भयंकर देखावा दिसूं लागला. त्या किल्ल्याच्या सर्व तटाभोंवतीं रांगेनें ख्रिस्ती लोकांचीं कापलेलीं डोकीं टांगून ठेवलेलीं होतीं, व त्यांतील रक्त भिंतीवरून खालीं वहात होतें, व त्या भिंतीच्या सभोंवार जो खंदक होता त्या खंदकांतील सर्व पाणी त्या रक्तानें लालभडक होऊन गेलें होतें. स्मर्ना येथेंहि ग्रीक लोकांची पुष्कळ वस्ती होती. तेथें मुसलमानांनीं कत्तल आरंभिली. सायप्रस बेटामध्येंहि असाच भयंकर प्रकार सुरू झाला. दहा हजार मुसलमान सैन्य त्या बेटावर उतरलें, आणि तेथून ते लोक सर्व खेड्यांतून पसरले. जेथें जेथें ग्रीक लोक भेटले तेथें तेथें त्यांनीं त्यांचा शिरच्छेद केला, आणि त्यांच्या बायकांना आपल्या विलासमंदिरांतून पाठवून दिलें. त्यांनीं सर्व गांवें आधीं लुटलीं आणि नंतर जाळलीं. आणि अशा रीतीनें तें सर्व बेट त्यांनीं उध्वस्त करून टाकलें. हीं भयंकर वर्णनें वाचून कोणाच्याहि अंगावर शहारे आल्या-वांचून रहाणार नाहींत. असले भयंकर परिणाम उत्पन्न होतात, हजारों लोकांची प्राणहानि होते, लाखों रुपयांची मालमिळकत नाश पावते, आणि अनेक वर्षांच्या परिश्रमानें उभारलेल्या राजधान्या आणि संस्था लयाला जातात, यासाठीं असल्या राज्यक्रांतीच्या कामाला कोणीहि प्रवृत्त होऊं नये,

असें एखाद्या अदूरदृष्टि मनुष्याला सकृद्दर्शनीं वाटणें साहजिक आहे. परंतु हें मत बरोबर नाहीं. राज्यक्रांतीच्या प्रसंगांत अशा गोष्टी कधीं कधीं व्हावयाच्याच. त्यांत काय आहे ? एका इंग्रजी इतिहासकारानें ह्या राज्यक्रांत्यांबद्दल असें म्हटलें आहे कीं, Revolutions are not made with rosewater ! यांतील तात्पर्य असें आहे कीं, राज्यक्रांत्या ह्या कांहीं गुलाबपाण्यानें होत नाहींत. जे आपल्यावर जुलूम करीत असतील त्यांना आपण बोलवावें, त्यांच्या पायांवर आपण लोळावें, आणि त्यांच्या गळ्यांत सुंदर पुष्पांचे हार घालून व त्यांनीं केलेल्या जुलुमांबद्दल आनंद प्रदर्शित करून त्यांच्यावर गुलाबपाणी शिंपडावें म्हणजे राज्यक्रांति होते, हें म्हणणें इतिहासाला कधींहि पसंत पडणार नाहीं. राज्यक्रांत्या गुलाबपाण्यानें होत नसतात, हें इतिहासाचें तत्त्व कालत्रयींहि अबाधित आहे. त्या तत्त्वाशीं लटपट करून किंवा तडजोड करून कांहींएक अर्थ प्राप्त व्हावयाचा नाहीं. ह्या राज्यक्रांत्यांमधून प्रथमतः कांहीं नुकसान होतें हें खरें. परंतु स्वतंत्रतेच्या लाभापुढें हीं सर्व नुकसानें तुच्छ आहेत, असेंच सर्व लोक आजपर्यंत समजत आलेले आहेत. आणि म्हणूनच त्यांच्या हातून राज्यक्रांतीचीं दुष्कर कामें घडून आलीं. ग्रीस देशांतील लोकांनींहि असाच निर्धार केला नसता व पहिल्या कत्तलीमुळेंच त्यांच्या अंगावर शहारे आले असते, तर ते, आज स्वतंत्रतेचा उपभोग घेण्याला कधींहि पात्र झाले नसते.

असो. अशा रीतीनें ग्रीसमधील राज्यक्रांतीला लोकांकडून आणि तिच्या प्रतिबंधाला सुलतानाकडून सुरुवात झाली. यानंतर उभयपक्षांमध्यें सहा सात वर्षें एकसारख्या अनेक लढाया चाललेल्या होत्या. त्या सर्वांचें येथें वर्णन देत बसणें शक्य होणार नाहीं, व तें वाचकांना फारसें मनोरंजकहि वाटणार नाहीं. तरीपण त्या सहा सात वर्षांच्या स्वतंत्रतेच्या लढाईमध्यें ग्रीक लोकांनीं आपल्या देशासाटीं जें विलक्षण प्रकारचें प्रेम आणि शौर्य प्रदर्शित केलें आहे, त्याविषयींचें निरूपण कोणालाहि बोधप्रद झाल्यावांचून रहाणार नाहीं. म्हणून त्यांपैकीं ठळक ठळक ग्रीस पुढारी योद्ध्यांचे कित्येक प्रसंग पुढें दिले आहेत. त्यांत घेण्यासारखे पुष्कळ गुण आणि टाळण्यासारखे पुष्कळ दुर्गुण वाचकांना आढळण्यासारखे आहेत.

ग्रीक पुढाऱ्यांपैकीं इप्सिलँटी याचें चरित्र फार हृदयद्रावक आहे. ग्रीस-मधील राज्यक्रांतीला राशियाचा ज्ञार मदत करील अशी त्याला पुष्कळ आशा होती. परंतु युरोपांतील कोणीहि राजे आपल्या कृत्यास उत्तेजन देत नाहींत, असें पाहून त्याची फार निराशा झाली. तरी पण त्यानें आपलें धैर्य सोडलें नाहीं. आपल्या शिपायांचा आशाभंग न व्हावा म्हणून त्यानें त्यांना असें सांगितलें कीं, "आपल्याला युरोपमधील राजांकडून पुढेंमागें मदत मिळणार नाहीं, असें कधींहि व्हावयाचें नाहीं. ग्रीस सारखा देश स्वतंत्र होत असतांहि त्याला अमुक अमुक राजांनीं मदत केली नाहीं असा इतिहासांत कायम राहणारा डाग आपल्या नांवाला कोणता राजा लावून घेणार आहे?" अशा उत्तेजनपर शब्दांनीं त्यानें आपल्या सैन्याला धीर दिला, आणि सुलतानाचें सैन्य त्याला गांठण्याकरितां येत होतें त्या सैन्याचा पराभव करण्यासाठीं तो निघाला. ड्रॅगश्चन येथें उभय सैन्यांची गांठ पडून अतिशय निकराची लढाई झाली. पण त्या लढाईत कित्येक ग्रीक लोकांच्याच विश्वासघातामुळें इप्सिलँटीच्या सैन्याचा पराभव झाला, व त्यानें 'सेक्रेड बटेलियन' या नांवाची जी एक निवडक लोकांची पलटण तयार केली होती, तिचा या लढाईत सर्वस्वीं फडशा उडाला. ह्या पराभवानंतर दुसरे दिवशीं त्यानें आपल्या शिपायांना उद्देशून एक जाहिरनामा प्रसिद्ध केला. त्यांत पुढें लिहिल्याप्रमाणें मर्मभेदक शब्द होते :—"शिपायांनो!—अथवा तुमच्यासारख्या विश्वासघातकी आणि देशद्रोही लोकांना शिपाई हें नांव देऊन त्या पवित्र आणि सन्माननीय शब्दाची किंमत कमी करणें बरोबर नाहीं!—मी तुमचा सेनापति आणि तुम्ही माझें सैन्य, हा जो तुमच्या माझ्यामध्यें संबंध होता तो आज संपला. परंतु इतके दिवसपर्यंत तरी मी तुमच्यासारख्या देशद्रोही लोकांचा सेनापति झालों; याबद्दल मला लज्जा वाटल्यावांचून कधींहि रहावयाची नाहीं. आपण घेतलेल्या शपथा तुम्हीं पायाखालीं तुडविल्या! व तुम्हीं आपला देव आणि देश यांच्याशींहि निमकहरामपणा केला! मी तुमच्याबरोबर रणामध्यें जय मिळविण्याला किंवा ठार मरण्याला तयार झालों होतों, अशा वेळीं तुम्ही हा स्वदेशद्रोह केला, हें फार अनुचित आहे. असो. आतां तुमचा माझा कांहीं एक संबंध राहिला नाहीं. जा, आतां तुम्ही खुशाल जा! आणि आपल्या शत्रूच्या पक्षाला जाऊन मिळा. तुमच्या

सारख्यांना तेच मित्र योग्य आहेत. जा, त्यांच्याकडे जा ! आणि तुम्ही आपलें रक्त त्यांच्या खर्ची घालून आणि तुम्ही आपल्या बायका व पोरी त्यांच्या चैनीला सादर करून त्यांच्यापासून आपली गुलामगिरी कायम राखून घ्या. परंतु हे ' सेक्रेड बटेलियन' मधील शूर शिपायांच्या आत्म्यांनों ! तुम्ही मात्र यांच्यापैकीं नाहीं. तुम्ही आपल्या देशाच्या स्वतंत्रतेकरितां आपले प्राण खर्ची घातले आहेत व तुमच्या या निस्सीम देशभक्तीबद्दल आपल्या सगळया देशाच्या वतीनें मी तुमचे आभार मानतों, त्यांचा तुम्ही स्वीकार करा. तुमचीं नांवें आपल्या देशामध्यें अजरामर होऊन राहतील, यांत शंका नाहीं. परंतु ज्यांनीं देशद्रोह केला आणि जे ऐन प्रसंगीं विश्वासघातानें सैन्य सोडून गेले, त्यांचें नांव ऐकलें असतां सर्व लोक त्यांचा तिरस्कारच करतील, आपला सर्व देश त्यांना शाप देईल, आणि परमेश्वर त्यांना भयंकर शासन दिल्यावांचून कधीं राहाणार नाहीं ! " अशा प्रकारचे उद्गार काढून इप्सिलँटी हा निराश होऊन ऑस्ट्रियामध्यें गेला. तेथें ऑस्ट्रियन सरकारनें त्याला सहा वर्षेपर्यंत कैदेमध्यें ठेविलें होतें, आणि तेथून सुटल्यावर तो लवकरच मरण पावला.

इप्सिलँटीच्या हाताखालीं जॉर्गेकिस या नांवाचा एक शूर पुरुष होता. इप्सिलँटीच्या सैन्याची फाटाफूट झाल्यानंतर जॉर्गेकिस हा त्यांपैकींच आपल्या हाताखालीं कांहीं सैन्य घेऊन रशियाच्या सरहद्दीकडे हळूहळू मागें हटत चालला होता. परंतु आपल्या देशाच्या शत्रूला लढाई दिल्यावांचून आपण तसेंच माघारें जावें, हें त्या लोकांना ठीक वाटत नव्हतें. अशा स्थितींत एकदां त्यांची व शत्रूची गांठ पडली. परंतु त्यावेळीं जॉर्गेकिसचा इलाज चालण्यासारखा नव्हता. त्याच्यापाशीं फक्त चारशें लोक होते. आणि त्याच्यापेक्षां दसपट सैन्याचा त्यांना वेढा येऊन पडला. त्यावेळीं जॉर्गेकिस यानें अशी शपथ वाहिली होती कीं, माझ्या जीवांत जीव आहे तोंपर्यंत मी शत्रूच्या हातीं जिवंत कधींहि सांपडणार नाहीं. ही उग्र प्रतिज्ञा जॉर्गेकिस यानें यावेळीं फार विलक्षण रीतीनें खरी करून दाखविली. एका देवळामध्यें हे ग्रीक लोक तुर्की सैन्याकडून वेढले गेले. तेव्हां ती निकराची वेळ पाहून जॉर्गेकिस यानें तेथील दरवाजे मोकळे टाकले आणि आपल्या अनुयायांपैकीं ज्यांची मरणाची तयारी नव्हती त्यांना त्यानें बाहेर निघून जाण्याविषयीं

सांगितलें. आणि नंतर एका दारूच्या पेटीला त्यानें आग लावून दिली व त्या भडक्यामध्यें तो स्वतः जळून गेला; परंतु त्यानें आपल्याबरोबर आपल्या बऱ्याच शत्रूंनाहि जाळून टाकिलें! असलीं स्वदेहनिरपेक्ष कृत्यें ज्या स्वदेश-भक्तीच्या योगानें केलीं जातात, ती स्वदेशभक्ति ज्या लोकांच्या अंतःकरणांत बाणली आहे, त्यांच्यापासून त्यांच्या देशाची स्वतंत्रता फारशी दूर नाहीं.

वर दिलेले योद्धे जमिनीवर लढाई करणारे होते. पण ग्रीसला समुद्रावरहि शत्रूचा विध्वंस करणें जरूर होतें. कप्तान पाच्छा या नांवाच्या एका मुसलमान सरदाराच्या हाताखालीं टर्कीचें बरेंच आरमार ईजीयन समुद्रामध्यें येऊन राहिलें होतें व ईजिप्तमधील आरमार लवकरच त्याला येऊन मिळणार होतें. त्याच्या आधीं कप्तान पाच्छाच्या आरमाराचा नाश करणें आवश्यक होतें. म्हणून ग्रीक लोकांनीं त्याची तयारी केली. टर्कीच्या आरमाराचा नाश करण्याकरितां एके दिवशीं काळोखी रात्रीं दोन गलबतें पाठविण्याचा त्यांनीं निश्चय ठराविला. हीं दोन गलबतें आगीचीं गलबतें होतीं. हीं आगीच्या गलबतांची युक्ति ग्रीक लोकांनींच काढलेली होती व त्या अजब युक्तीपासून त्यांचा या लढाईत पुष्कळ फायदा झाला. ह्या आगीच्या गलबतांची रचना येणेंप्रमाणें असे:—एखादें जुनें टाकाऊ गलबत घेऊन त्याच्या एका बाजूला डांबर, राळ, वगैरेसारख्या ज्वालाग्राही पदार्थांचीं पिपें भरून ठेवीत असत, व दारूनें या सगळया पिपांचा संबंध जोडून ठेवलेला असे. तसेंच या गलबतांचीं शिडें, दोरखंडें वगैरेहि टर्पेनटाइन तेलामध्यें भिजवून ठेवलेलीं असत. अशा प्रकारचीं दोन गलबतें शत्रूच्या गलबतांमध्यें पाठवून तीं सर्व पेटवून देण्याचा ग्रीक लोकांनीं बेत केला. तो रमजानचा महिना असल्यामुळें व त्या दिवशीं कांहीं सण असल्यामुळें कप्तान पाच्छाच्या मुख्य गलबतावर फारच आरास केलेली होती व त्या एकाच गलबतावर सुमारें हजाराहून अधिक लोक जमा झाले होते, व ते सर्व आनंदांत गर्क होऊन गेले होते. अशी संधि साधून ग्रीक लोकांनीं निघण्याची तयारी केली. त्या दोन आगीच्या गलबतांबरोबर चौतीस असामी जाण्याला तयार झाले. त्यांपैकीं कोणी पाण्यांत बुडूं लागले तर त्यांना वर काढण्यासाठीं दुसरींहि दोन साधीं गलबतें निघालीं. आगीच्या गलबतांनीं फ्रेंच आणि ऑस्ट्रियन बाव्हटे शत्रूला फसविण्या-करितां उभारले होते. ह्या सगळया धाडशी कृत्यांमध्यें कॅनेरीस या नांवाचा

एक खलाशी प्रमुख होता. त्यानें आपलें गलबत नकळत थेट शत्रूच्या आरमारामध्यें आणून घुसावलें आणि कप्तान पाच्छाचें जें मुख्य गलबत होतें त्याला कॅनेरीस यानें आपलें गलबत सांखळदंडांनीं घट्ट अडकवून टाकलें. इतकें झाल्यानंतर त्यानें आपल्या गलबताला आग लावून दिली व आपण इतर मंडळीसह दुसऱ्या बोटींत बसून निघून आला. आपला बेत फसला तर आपल्याला शत्रूच्या स्वाधीन होण्याची पाळी न यावी म्हणून त्या लोकांनीं आपल्यापाशीं दुसऱ्या गलबतामध्यें दारूचीं पिपें भरून ठेविलीं होतीं, व अनिष्ट प्रसंग आला तर त्या दारूनें आपलीं गलबतें उडवून टाकावीं, असा त्यांचा बेत होता. परंतु ईश्वरी कृपेनें तसा प्रसंग मुळींच आला नाहीं. कॅनेरीस यानें आपलें गलबत कप्तान पाच्छाच्या गलबताला इतकें घट्ट बांधून टाकलें होतें कीं, तें कांहीं केल्या सुटेना. यांतच अतिशय जोराचा वारा सुटल्यामुळें कप्तान पाच्छाच्या गलबतानें पेट घेतला. आणि नंतर ती आग सगळीकडेच पसरली. त्या गलबतांवर जी दारू होती, तिनें पेट घेतला. लहान लहान बोटी बुडून गेल्या. पाण्याच्या पृष्ठभागावर असलेला गलबतांचा सर्व भाग जळून खाक झाला. आणि गलबतावरील खलाशांची तर अतिशयच त्रेधा उडाली. कित्येकांनीं पाण्यांत उड्या घेतल्या, आणि कित्येक आगीनें भाजून मेले. खुद्द कप्तान पाच्छा ह्याच्या डोक्यामध्यें एक जळकी डोलकाठी पडून त्याचा प्राणांत झाला. अशा रीतीनें कॅनेरीस यानें तुर्की आरमाराचा विध्वंस करून टाकला. या शूर पुरुषाचें नांव त्याच्या पराक्रमामुळें ग्रीसच्या इतिहासामध्यें अजरामर होऊन राहिलें आहे.

या ग्रीसच्या स्वातंत्र्याच्या लढाईमध्यें मिसोलोंघीचे वेढे अति प्रख्यात आहेत. त्यांपैकीं शेवटच्या प्रसंगीं ग्रीक लोकांनीं येथें जें शौर्य गाजविलें तें अगदीं अद्वितीय आहे. सन १८२३ च्या आगष्ट महिन्यांत स्कोड्राचा पाच्छा मिसोलोंघीला वेढा घालण्याकरितां बरोबर पंचवीस हजार सैन्य घेऊन येत होता. त्या वेळीं ग्रीक लोकांकडील सेनानायक बोझॅरीस हा तेथें होता. परंतु त्याच्यापाशीं तीन हजारांपेक्षां जास्त लोक नव्हते. इतक्या थोड्या लोकांनिशीं उघड लढाई करून जय मिळण्याची बिलकुल आशा नव्हती. तेव्हां बोझॅरीस यानें शत्रूवर रात्रीचा गुप्त छापा घालण्याचा बेत केला. एका शूर पलटणींतून त्यानें दीडशें निवडक लोक आपल्या हाताखालीं घेतले.

आणि शत्रूच्या छावणींतील मध्य भागावर स्वतः हल्ला करण्याचा त्यानें निश्चय केला. ज्या ठिकाणीं हल्ला करावयाचा तेथें तुर्की सैन्यांतील अघाडीचे पांच हजार लोक होते. ते रात्रीं गाढ झोंपीं गेलेले होते. बाहेर पाहऱ्याकरितां कोणी शिपाई ठेविलेले नव्हते, किंवा छावणीच्या सभोंवार संरक्षणासाठीं खंदकहि खणलेले नव्हते. अशा गैरसावध स्थितीमध्यें असलेल्या शत्रूवर बोझॅरीस यानें एकाएकीं छापा घातला, व शत्रूला जिंकण्याविषयीं बोझॅरिस हा आपल्या उच्च स्वरानें आपल्या अनुयायांना उत्तेजन देऊं लागला. शत्रूंनीं बोझॅरिसचा आवाज ओळखून काळोखांतहि त्याच्यावर मारा सुरू केला. त्यामुळें त्याला एक जखम लागली. परंतु आपले लोक धैर्य सोडतील, म्हणून त्यानें ती जखम तशीच दाबून ठेविली, व शत्रूवरील हल्ला जोरानें चालविला. अशा रीतीनें लढाई चालली असतां सकाळची वेळ झाली, आणि शत्रूचें सर्व सैन्य दाही दिशांनीं पळून गेलें. या छाप्यांत ग्रीक लोकांना फारच मोठा जय मिळाला. परंतु पहाटेच्या सुमारास बोझॅरिस याला डोक्यावर दुसरी एक जखम लागली, आणि त्यामुळें त्यानें लवकरच प्राण सोडले. परंतु आपले शत्रू पळून गेलेले पाहून नंतर त्याला मरण आलें, यामुळें त्याला त्या मरणाचें दुःख वाटलें नाहीं. त्याच्या अनुयायांनीं त्याला रणांतून उचलून नेलें आणि मिसोलोंघी येथें त्याचा अंत्यविधि अतिशय सन्मानपूर्वक करण्यांत आला. त्याच्याबद्दल पुढीलप्रमाणें उद्‌गार काढण्यांत आलेले आहेत :—'Beloved Greeks! Lo, another Leonidas figures in your history.'

अशाच प्रकारचीं कोलोकोट्रोनी वगैरे पुढाऱ्यांचींहि शौर्याचीं आणि स्वदेशभक्तीचीं उदाहरणें देतां येण्यासारखीं आहेत. परंतु देशप्रीतीचें तत्त्व मनांत बिंबण्याला वर दिलेलीं उदाहरणें थोडीं आहेत असें नाहीं. असो. तुर्क लोकांनीं किऑस बेटामध्यें भयंकर कत्तल केली आणि मिसोलोंघी येथील शेवटच्या वेढ्यामध्यें ग्रीक लोकांचे असंख्य बळी पडले. या व इतर अमानुष कृत्यांमुळें युरोप खंडाचें ग्रीसकडे लक्ष वळलें, व त्यापासून ग्रीक लोकांचा फार फायदा झाला. ग्रीक लोक इतर युरोपियन राजांनीं आपल्या स्वतंत्रतेच्या प्रकरणामध्यें मध्यस्थी करावी म्हणून पुष्कळ खटपट करीत होते. परंतु त्यांत प्रथमतः फारसें यश आलें नाहीं. परंतु अखेरीस इंग्लंड आणि

फ्रान्स यांचें आरमार एकत्र होऊन त्यांनीं ईजिप्तमधील इभ्राहिम पाच्छाच्या आरमाराचा नॅव्हारिनो येथें भयंकर पराभव केला. आणि तेव्हांपासून ग्रीसच्या स्वातंत्र्याला बरेंच चांगलें स्वरूप येऊं लागलें. ग्रीक लोकांनीं आपण टर्कींच्या अंमलापासून स्वतंत्र झाल्याबद्दलचा जाहीरनामा १८२२ च्या जानेवारी महिन्यांत प्रसिद्ध केला होता. तो जाहीरनामा येणेंप्रमाणें आहे :—

"लोकांवरील जुलूम इतका अनावर झालेला आहे कीं, त्या जुलमाखालीं ग्रीक राष्ट्र नामशेषच होऊन जावयाचें. परंतु परमेश्वराच्या कृपेनें तें अजून-पर्यंत जिवंत राहिलें आहे. ग्रीसवर राज्य करणाऱ्या क्रूर व जुलमी राजांनीं आपलीं वचनें मोडलीं आहेत. कोणत्याहि न्यायाच्या तत्त्वाची त्यांनीं पर्वा बाळगली नाहीं. आपला अंमल दिवसेंदिवस जास्त जुलुमी करण्याचाच त्यांचा रोख चालू आहे. आणि जिंकलेल्या लोकांचा समूळ उच्छेद व्हावा अशीं त्यांचीं कारस्थानें चाललेलीं आहेत. अशी स्थिति असल्यामुळें स्वतःच्या संरक्षणासाठीं ग्रीस देशाला हातामध्यें शस्त्र घेणें भाग पडलें आहे. ग्रीसमधील लोकांनीं कोणाच्याहि मदतीशिवाय लढाई करून शत्रूच्या जुलुमाचा प्रतिकार केला आहे. आणि त्या कामांत त्यांना यश आल्यानंतर ग्रीस देशांतील लोकांचे एकत्र जमलेले प्रतिनिधि परमे-श्वराला साक्षी ठेवून आज आपला ग्रीस देश स्वतंत्र झाला आहे, असें जगाला जाहीर करीत आहेत."

ग्रीक लोकांनीं त्याप्रमाणें आपलें स्वातंत्र्य जाहीर केलें होतें. तथापि तें युरोपांतील इतर राष्ट्रांनीं कबूल करण्याला ग्रीक लोकांना आणखी चार पांच वर्षें लढाई चालू ठेवावी लागली. परंतु कष्टावांचून सुख कधींहि मिळत नाहीं. ग्रीक लोकांनीं त्या वेळीं नेटानें लढाई चालविली आणि पराक्रम केले, म्हणूनच आज त्यांना आणि त्यांच्या वंशजांना स्वतंत्रतेच्या कल्पतरूचीं मधुर फळें यथेच्छ सेवन करवायालामिळत आहेत, हें कोणाला सांगावयाला पाहिजे आहे असें नाहीं.

# आपण काय पेरावें ? : : : १

काळ : अग्रलेख, ता. १६-६-१९०५

काळच्या याच अंकात "एका गुलामाचा प्रासंगिक इषारा" हा स्वतंत्र लेख आहे. " आमचे पूर्वज गुलाम होते ही स्पष्ट गर्वोक्ति करण्याचें भाग्य जरी या राष्ट्राचे पदरीं नाहीं तरी आमचे वंशज जगाच्या अंतापर्यंत ब्रिटिशांच्या गुलामगिरींत असेच व शक्य तर याहून चांगल्या रीतीनें खोल खोल जावोत अशी आपण—विशेषत: हे आम्हांमधील वृद्धांनीं, तुम्ही—परमेश्वराची त्रिकाल प्रार्थना करा."

पेरणीच्या हंगामाचे दिवस जवळ आले आहेत. सूर्याच्या उष्णतेनें अगदीं कमाल करून सोडली आहे. दिवसां आणि रात्रीं एकसारखा उकाडा होत आहे. आकाशांतून पावसाच्या धारा निघण्याविषयीं जणुं काय सूचकच अशा घामाच्या धारा अंगांतून निघत आहेत. ग्रीष्म ऋतूचा जुलूम अगदीं शिखराला जाऊन पोहोंचला आहे. आणि त्याचें पारिपत्य करण्याकरितां मेघराजा केव्हां येतो, अशा उत्कंठेनें सर्वांचे डोळे आकाशाकडे लागून राहिलेले आहेत. आकाशामध्येंहि मेघांची तयारी चाललेली दिसत आहे. पृथ्वीवर सूर्य आपल्या करांनीं अखेरीस अगदीं कहर करून सोडील आणि सर्व लोक जीवनासाठीं तळमळूं लागतील, असा प्रसंग पुढें येईल, हें जाणून आकाशांतील अदृश्य भागांतून मेघानें पुष्कळ दिवसांपासून गुप्त तयारी चालविलेली होती. जेथें जेथें म्हणून कांहीं पाणी चमकत होतें, तेथून तेथून तें मेघराजानें गुप्तपणानें आपल्या बाजूला आकर्षण करून घेतलें होतें. मेघराजाची ही गुप्त तयारी तीन चार महिने चाललेली होती. परंतु आतां ती परिपूर्ण झालेली असल्यामुळें व सूर्याचा जुलूम भूमंडळावरील लोकांना असह्य झालेला असल्यामुळें आपल्य

आपल्याला अवतीर्ण होण्याची हीच वेळ आहे, असें समजून, मेघराजा आकाशाच्या पृष्ठभागावर आपल्या सैन्याची परेड करूं लागला आहे. या सैन्यामध्यें सर्व कांहीं आहे. या सैन्यासारखें पाणी तर दुसऱ्या कोणत्याहि सैन्यामध्यें नसेल ! आणि पाणीदारपणासारखा दुसरा कोणताहि गुण लढाई-मध्यें उपयोगी पडत नाहीं, हें तर सर्वश्रुतच आहे. तसेंच या सैन्याजवळ नवीं जुनीं वगैरे सर्व प्रकारचीं आयुधें सज्ज आहेत. इंद्रधनुष्यासारखीं एका डोंगरापासून दुसऱ्या डोंगरापर्यंत विस्तृत होणारीं अशीं प्रचंड धनुष्यें या सैन्यापाशीं आहेत. व त्यांच्या सहाय्यानें पर्जन्यास्त्र, वाय्वस्त्र, करकास्त्र वगैरे अनेक प्रकारचीं अस्त्रें सोडतां येतात. तोफांचा शोध नवीन आहे असें म्हणतात; परंतु त्या तोफासुद्धां ह्या सैन्याबरोबर आहेत. त्या तोफांच्या गर्जनेनें सर्व त्रैलोक्य दणाणून जातें, आणि त्यांच्या तोंडांतून निघालेल्या आगीच्या लोळांनीं सर्व त्रैलोक्याचे डोळे दिपून जातात, अशा अद्‌भुत शक्तीच्या या तोफा आहेत. या सैन्यांतील घोडेस्वारहि मोठे पाणीदार असून ते वायु-वेगानें पळतात. पाठलाग वगैरे करण्याच्या कामीं तर ते इतके चपळ आहेत कीं, अतिशय थोड्या वेळामध्येंहि ते सर्व आकाशमंडळ आक्रमण करूं शकतात. पायदळाची तर गणनाच करतां येणार नाहीं. असलें हें प्रचंड सैन्य मेघराजानें इतके दिवसपर्यंत कोठें दडवून ठेविलें होतें, हें तयार कसें केलें, याला कवाईत कोठें शिकविली, आणि हें शत्रुविजयांत तरबेज कसें झालें, हे प्रश्न लोकांच्या मनांत आले म्हणजे, ते अगदीं थक्क होऊन जातात. चांदण्या रात्रीं चांदण्यांत मजा मारणाऱ्या लोकांच्या स्वप्नांतहि कधीं आलें नसेल कीं, जेथून हा चैनीचा ज्योत्स्नाप्रवाह वाहात आहे, तेथेंच जगाचा ताप हरण करणारीं प्रचंड सैन्यें तयार होत आहेत ! साराश, नजर चुकवून आणि सर्वांची कल्पनाशक्ति चकित करून, आपलीं असंख्य सैन्यें तयार करून मेघराजा तीं आकाशांतील रणमैदानावर उभीं करीत आहे. एखादा चांगला सेनापति शत्रूवर हल्ला करण्याकरितां योग्य जागा स्वाधीन करण्यासाठीं आपलीं सैन्यें इकडून तिकडे आणि तिकडून इकडे चाळवीत असतो, तशा प्रकारच्या हालचाली हल्लीं आकाशामध्यें चाललेल्या आहेत. इकडून एक ढगांची पलटण मार्च करीत येते; तिकडून

दुसरी येते; आणि तिसऱ्या दिशेकडून तिसरी येते; अशा रीतीनें मेघगर्जनेचें बिगूल वाजल्याबरोबर आकाशांतील सैन्यें एकत्र होऊन त्याचे मॅनुव्हर्स हल्लीं आकाशांत चालू झालेले आहेत. या मेघराजाच्या सैन्यांतील अॅडव्हान्स-गार्डपैकीं कित्येकांच्या कांहीं चकमकीहि झालेल्या आहेत व त्यामुळें सूर्याचें साम्राज्य जें उदयागीरीपासून अस्ताचलापर्यंत अखंड पसरलेलें होतें, तें डागाळलेलें झालें असून सूर्य प्रकाशमान असतांनाहि त्याच्या राज्यांतील कित्येक प्रदेश मेघराजांचीं सैन्यें राजरोसपणें बळकावून बसलीं आहेत. ह्या एकंदर चिन्हांवरून मेघराजाच्या मुख्य सैन्याचा भडिमार लवकरच सुरू होईल, असें दिसत आहे.

अशी एकंदर अंतरिक्षामध्यें आणि वातावरणामध्यें स्थिति बदललेली आहे. पावसाचीं चिन्हें स्पष्ट दिसत आहेत. मृगनक्षत्रहि निघालेलें आहे. सर्व शेतकरी लोकांनीं आपल्या जमिनी नांगरून तयार केल्या आहेत. अघोटचे दिवस अगदीं येऊन ठेपले आहेत. पेरण्यांचा हंगाम प्राप्त झालेला आहे. आणि प्रत्येक शेतकरी आपण काय पेरावें, या विचारामध्यें निमग्न होऊन बसलेला आहे.

आणि हा खरोखर विचार करण्यासारखाच प्रश्न आहे. आपण काय पेरावें याच्यासारखा महत्त्वाचा प्रश्न दुसरा कोणताहि नाहीं. तसेंच हा फक्त शेतकऱ्यांचाच प्रश्न नसून यच्चयावत् सर्व लोकांचा हा प्रश्न आहे. आणि याच्यावर सर्व भावी फळ अवलंबून असल्यामुळें आतां आपण काय करावें, याच्यासारखा जोखमीचा आणि जबाबदारीचा प्रश्न दुसरा कोणताहि नाहीं. परंतु आपणा हिंदुस्थानांतील लोकांना तर हा प्रश्न अतिशयच जबाबदारीचा आहे. आपल्या ह्या हिंदुस्थान देशाच्या शेताची जितकी नासाडी झालेली आहे, तितकी दुसऱ्या कोणत्याहि शेताची झालेली नसेल. आपलें हें शेत गझनीच्या महंमदापासून किती तरी लोकांनीं येऊन तुडविलेलें आहे. कित्येकांनीं हें लुटलें आहे, कित्येकांनीं यांतील पीक खाल्लें आहे. कित्येकांनीं तें कापून टाकिलें आहे, आणि कित्येकांनीं यामध्यें भलभलतीं रोपें लाविलीं, आणि कित्येकांनीं ह्याला अनेक वर्षें ओसाड टाकिलें. अशा अनेक कारणांमुळें या आपल्या हिंदुस्थानच्या शेतांत रानोमाळ गवत उगवलें आहे आणि कांटेरी झाडांनीं सर्व जमीन व्याप्त करून टाकली आहे. जेथें चांगलें पीक यावयाचें, ती

माळ जमीन झाली आहे, व जेथें पाणी असावयाचें तेथें वाळवंटासारखा शुष्कपणा उत्पन्न झाला आहे. आपल्या शेतांत पाणी असें बिलकुल राहूं नये म्हणून कित्येक दुष्ट लोकांनीं त्या शेताचे बांध आणि बंधनें सर्व मोडून टाकण्याचा यत्न केल्यामुळें येथील जमीन अगदीं खराब होऊन गेलेली आहे. जातिमत्सर, परस्पर अविश्वास, घरभेदेपणा वगैरे अनेक प्रकारचीं बिळें या शेतांत ठिकठिकाणीं पडलीं आहेत व कित्येक खेंकडीं हीं बिळें जास्त जास्त खोल करण्याचा प्रयत्न करीत आहेत. त्यामुळें जेथें पाऊल टाकावें तेथें तें खळग्यांत जात आहे. कंटक तर इतके पसरलेले आहेत कीं, आपण यांच्यापासून दूर असलों, तरीहि ते आपल्या अंगाला येऊन बोंचतात. जेथें सोनें पिकत असे आणि म्हणूनच ज्याला सुवर्णभूमि असें नांव देत असत, त्या शेताची अशी स्थिति झालेली पाहून प्रत्येकाच्या डोळयांतून अश्रु येतात. आपलें हें वडिलार्जित शेत, आपल्या पूर्वजांनीं याचा उपभोग घेतला आणि आपल्या वंशजांकरितां त्यांनीं हें मागें ठेविलें. त्या शेताची अशी दैना झाली, आता याला काय करावें, अशी चिंता करीत आपल्या डोळयांतील अश्रूंनीं सर्व लोक हें शेत भिजवून टाकीत आहेत. या शेताच्या भोंवतालून फिरावें, त्याचा मागील सुपीकपणा आठवावा, त्याच्या शेजारच्या दुसऱ्या लोकांच्या सुंदर शेतांकडे दृष्टि फेंकावी, आणि आपल्या शेतांतील वाळवंट आणि कांटेरी झाडें पाहून दुःखाचे उसासे टाकावे, अशा कष्टमय स्थितीचा अनुभव आपण हिंदुस्थानांतील लोकांनीं आपल्या या शेतासंबंधानें घेतलेला आहे.

परंतु ही स्थिति समजूं लागल्यापासून योग्य दिशेनें पुष्कळ प्रयत्न झालेले आहेत, ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. आपल्या आजपर्यंतच्या उद्योगानें आपली भूमि बरीच तयार झालेली आहे. हिंदुस्थान हें आपलें शेत होय आणि त्या शेताबद्दल कळकळ बाळगणारे असे जे आपण सर्व लोक, ते त्या शेताचे शेतकरी होत. त्या आपल्या आजपर्यंतच्या पूर्वगामी मेहनतीनें बरीच तयारी झालेली आहे. खोट्या कल्पनांचीं कांटेरी झाडें जीं रानोमाळ उगवलीं होतीं तीं बरींच तोडलीं गेलीं आहेत. ज्यांतून पाणी मुरत होतें तीं बिळें आणि त्या भेगा बऱ्याच बुजविण्यांत आलेल्या आहेत. शेताचे जे बांध मोडून गेले होते, ते फिरून बरेच दुरुस्त झालेले आहेत. मधून मधून लहान लहान निरुपयोगी बांध विनाकारण घातल्यामुळें आपल्या शेताचे जे

असंख्य वितीवितींचे तुकडे झाले होते, ते आत्मघातकी बांध मधून काढून टाकून येथून तेथून सर्व शेताची जमीन बहुतेक सारखी करण्यात आलेली असून, त्या अनेक शेतांचें आतां एक शेत बनलें आहे. पूर्वी आपलेच लोक या शेताच्या मशागतीसंबंधानें उदासीन होते, ते आतां त्याबद्दल काळजी वाहूं लागले आहेत, व हें शेत सुपीक होण्याला जे कांहीं अडथळे असतील ते दूर करण्याचे सर्वांचे प्रयत्न सफळ होत चालले आहेत. अशा रीतीनें तयार झालेल्या या शेतावर आपल्या दयाळू इंग्लिश लोकांनीं चोहोंकडे नांगर फिरविला आहे व हें काम त्यांनीं इतक्या इमानेंइतबारें केलें आहे कीं, जेथें हा नांगर फिरला नाहीं, किंवा अगदीं खोलपर्यंत गेला नाहीं, अशी या शेतामध्यें आतां एकहि जागा उरली नाहीं. बारीक सारीक मतभेदाच्या ढिपळ्या समंजस लोकांनीं आपल्या शब्दप्रहारांनीं सर्वत्र फोडून टाकल्या आहेत व येथून तेथून सर्व शेत एक झालेलें आहे. अशी आपल्या शेताची उत्तम तयारी झाली, तरी त्याला वर्षाकालाची अपेक्षा आहेच. परंतु ती हंगामाची वेळहि जवळ येत चालली आहे, अशीं चिन्हें दिसत आहेत. पाऊस पडण्याच्या पूर्वी अतिशय ताप व्हावा तसा होत आहे. अल्पस्वल्प उदरनिर्वाहासाठींसुद्धां उष्ण काळाच्या अगदीं अखेरच्या दिवसांप्रमाणें अंगांतून घामाच्या धारा चाललेल्या आहेत, व निढळाच्या घामाचे थेंब अखंडित प्रवाहानें टपटपां गळत आहेत. वैशाखमासाच्या परिसमाप्तीच्या वेळेप्रमाणें सर्व लोकांच्या अंगाची लाही होत आहे. जलसंचयाप्रमाणें सर्वत्र शुष्कता उत्पन्न झाली आहे. हरणांप्रमाणें शहाणीं माणसेंसुद्धां मृगजळाच्या पाठीमागें धांवून थकलीं आहेत. तीव्र आणि प्रखर अशा करांच्या योगानें जेवढें कांहीं शोषून घेतां येण्यासारखें होतें, त्यांपैकीं कोठेंहि कांहीं शिल्लक उरलेलें नाहीं. जिकडे तिकडे उन्हाळा झाला आहे. वातावरणामध्यें कोठें कोठें ढग उत्पन्न होऊं लागले आहेत. हे ढग उद्भवतात आणि वितळून जातात आणि फिरून एकत्र होतात, अशी आजची स्थिति आहे. परंतु असें होतां होतां हें भयंकर मेघडंबर कायमचें उद्भवेल, अशीं चिन्हें आहेत. यामुळें आतां आपला पावसाळा फारसा दूर आहे, असें दिसत नाहीं.

सारांश, शेत नांगरून तयार आहे, आणि पावसाळ्याचीं चिन्हेंहि विपुल आहेत. अशा वेळीं आपण काय पेरावें, हा आपणा हिंदुस्थानच्या शेतकऱ्यां-

पुढें एक मोठा प्रश्न आहे. या वेळीं आपण आपल्या देशाच्या अभ्युन्नतीचें बीं पेरावें, हें उत्तम होय. आपल्याला आपल्या या शेतामध्यें जें पुढें उगवावयाला पाहिजे असेल त्याचें बीं आपण आज पेरिलें पाहिजे. आपल्या देशांत दुःख, दुष्काळ, दारिद्र्य, मरणोन्मुखता, भयंकर रोग, आणि पारतंत्र्याचे क्लेश यांची वाढ व्हावी, असें आपण कोणी तरी इच्छितों काय ? आणि अशी जर आपली इच्छा नाहीं, तर मग यांचें बीं आपण आपल्या ह्या हिंदुस्थानच्या शेतामध्यें काय म्हणून पेरूं द्यावें ? ज्या वेळीं आपलें हें शेत मुसलमान लोकांच्या ताब्यांत गेलें होतें, त्या वेळीं रामदास, तुकाराम, नानक वगैरे शेतकऱ्यांनीं या शेतामध्यें धर्माचें बीं पेरलें; आणि त्यापासून शिवाजी, थोरले बाजीराव, रणजितसिंग वगैरेसारखे पुरुष निर्माण झाले. परंतु नानक आणि रामदास यांनीं पेरलेल्या धान्याला कणसें धरत होतीं न धरत होतीं, इतक्यांत पाश्चिमात्य लोक येथें आले, आणि त्यांनीं आपसांतील कलहाचें बीं या शेतांत चोहोंकडे पसरून टाकलें. चांगल्या धान्यापेक्षां वाईट बियांची वाढ आणि त्यांचा फैलाव नेहमींच जास्त होतो. त्याप्रमाणें शेतांत इंग्लिशांनीं पेरलेल्या आपसांतील कलहाच्या बियांला फारच चांगलें पीक आलें आणि त्यामुळें हिमालयाच्या शिखरापासून तों रामेश्वराच्या तळापर्यंत सर्व हिंदुस्थानदेश आपल्या स्वातंत्र्याला मुकून पराधीन झाला. आपली स्वतंत्रता गेली, आपलीं राज्यें गेलीं, आपलीं सैन्यें गेलीं, आपली संपत्ति गेली, आपलें वैभव गेलें; फक्त एका डागळलेल्या अपकीर्तीशिवाय आपल्यापाशीं दुसरें कांहीं एक राहिलें नाहीं ! असा मागचा अनुभव आहे. यावरून आपण शहाणे झालें पाहिजे व आतां तरी आपल्या शेतांमध्यें आपण काय पेरावें, याबद्दल चांगला विचार झाला पाहिजे. कॉँग्रेसचें बीज या शेतांत पेरावें, म्हणजे त्याला चांगलें पीक येईल, अशी वीस वर्षांपूर्वीची कित्येकांची कल्पना होती. परंतु ती अनुभवानें खोटी ठरली आहे. औद्योगिक बीजाचें येथें आरोपण केलें असतां त्याला चांगलीं फळें येतील अशी एक आशा होती. परंतु कित्येक दुष्ट किडे या बीजाचे अंकुर जमिनींतून बाहेर येतां येतांच खाऊन टाकतात, आणि त्यामुळें हा रोपा येथें वाढत नाहीं. शिक्षणाचें बीं येथें पेरलें जात आहे, व त्याच्या वेली जोरानें जमिनींतून वर येत आहेत. परंतु त्या वेलींना वर चढण्याला

कांहीं आश्रय नसल्यामुळें त्या खालीं पडून त्यांच्या माना मोडून जात आहेत. अशा रीतीचीं अनेक बीजें पेरून अनुभव घेण्यांत येत आहे. परंतु आपल्या या हिंदुस्थानच्या शेतामध्यें जें उगवावयाला पाहिजे आहे, तें यांपैकीं कोणत्याहि बियापासून उगवत नाहीं. अशा रीतीनें मागचे प्रयत्न निष्फळ झाले आहेत. म्हणून आतां आपण काय पेरावें, याच्याबद्दल पुनरपि शांतपणानें विचार केला पाहिजे. आपल्याला काय उगवावयाला पाहिजे आहे हें प्रत्येकानें आधीं आपल्यापाशीं ठरविलें पाहिजे, आणि मग त्याचें बीज कोणतें, याचा शोध केला पाहिजे. आपल्याला सुख पाहिजे आहे, संपत्ति पाहिजे आहे, विद्या पाहिजे आहे, एकी पाहिजे आहे. आपल्या देशाला इतर देशाप्रमाणें वैभव पाहिजे आहे, इतरांप्रमाणें आपलें हिंदुस्थान बलाढ्य आणि सामर्थ्ययुक्त व्हावयाला पाहिजे आहे, आपला पराधीनपणा जितका कमी होईल तितका व्हावयाला पाहिजे आहे. आपण सर्व एक झालों पाहिजे, आणि आपले सर्व कारभार एकमतानें देशाच्या हितासाठीं चालले पाहिजेत, दैदीप्यमान राष्ट्रमालिकेमध्यें आपल्या राष्ट्राला जागा मिळाली पाहिजे, स्वदेशाभिमानी लोकांमध्यें आपल्या लोकांची गणना झाली पाहिजे, पराक्रमानें, कौशल्यानें आणि बुद्धीनें आपल्या देशानें आपलें पूर्वीचें नांव फिरून मिळवून तें आपल्या वंशजांनीं अखेरपर्यंत कायम ठेविलें पाहिजे, अशा प्रकारचीं फळें आपल्या राष्ट्राला पाहिजे आहेत. हीं फळें मिळण्यासाठीं कोणतें बीं पेरलें पाहिजे, हें सांगणें कठीण आहे. तरीपण यांच्यासाठीं म्हणून आजपर्यंत जें जें बीं पेरण्यांत आलें, त्यांपासून हे इष्ट परिणाम घडून येत नाहींत, हें अनुभवसिद्ध झालें आहे. याकरितां दर पावसाळ्यांत तेंच तेंच बीं पेरीत बसण्यांत कांहीं अर्थ नाहीं. या बियांची परीक्षा झाली. आतां दुसरें कांहीं तरी असें बीज पेरलें पाहिजे कीं, ज्याच्यापासून आपल्याला पाहिजे आहे तसें पीक उत्पन्न होईल. मिरचीचें बीं पेरून गोड उंसाची अपेक्षा धरली असतां ती कधींहि परिपूर्ण होणार नाहीं. सारांश, आपण आपल्या देशाच्या शेतामध्यें असें बी पेरावें कीं, ज्याच्यापासून त्याच्यामध्यें आपल्या देशाचें खरें सुख उगवेल !

---

# एका शेतकऱ्याचे उद्‍गार : : : १०

काळ : स्वतंत्र लेख, ता. ९-६-१९०६

मी आणखी किती दिवस जगणार ! मला अजून मरण कां येत नाहीं ! जिवाचा कंटाळा म्हणून एक वस्तु असते, हें यमदूतांनों, तुम्हांला माहीत आहे किंवा नाहीं ? माझ्या वयाला आज सत्तर वर्षें आहेत. मी दहा वर्षांचा झालों तेव्हां माझ्या बापानें ही नांगराची मूठ माझ्या हातांत दिली. आणि तेव्हांपासून मी या शेतामध्यें रात्रंदिवस राबत आहे. तरीपण माझ्या भाताच्या कणगींत एकहि दाणा शिल्लक नाहीं; आणि माझ्या पैशांच्या मडक्यांत एक कवडीहि सांपडावयाची नाहीं ! आमच्या सगळ्या शेतांचें उत्पन्न विलायतेंतील श्रीमंत लोकांच्या पोषणाकडे जातें, असें मला कोणीं सांगितलें आहे. असले हे लोक आहेत तरी कोण ? मी आज साठ वर्षें आपल्या शेतांत धान्य पिकवीत आहें, तरीहि ह्यांचें पुरें पोषण झालें नाहीं. असे हे विलक्षण खादाड लोक आहेत तरी कसले ? मी प्रत्येक वर्षी असें म्हणतों कीं, यंदाचें उत्पन्न त्यांच्या पोटांत गेलें म्हणजे पुढल्या वर्षीचें उत्पन्न मला आणि माझ्या बायकामुलांना मिळेल. परंतु अशीं साठ वर्षें लोटलीं तरी अजून त्यांचें राक्षसी पोट कांहीं भरत नाहीं आणि मला आणि माझ्या बायकामुलांना कधीं पोटभर खावयाला मिळत नाहीं. असलें हें अद्‍भुत पोट आहे तरी कसलें ? आणि हें भरणार तरी केव्हां ? माझ्या साठ वर्षांच्या अनुभवावरून मला वाटतें कीं, आमच्या शेतांतील धान्यांनीं हें बकासुरी पोट कधींहि भरावयाचें नाहीं. इतकेंच नव्हे तर आमचीं हीं अन्नावांचून वाळलेलीं शरीरें त्या पोटांत कोंबलीं तरीहि त्यांची भरती होईल किंवा नाहीं, याची शंकाच आहे. अशा स्थितींत निष्फळ कष्ट कोठपर्यंत

करावेत ? मला आतां या नांगराची मूठ हातांत धरण्याची लाज वाटूं लागली आहे. साठ वर्षांच्या घर्षणानें ही मूठ पहिल्यापेक्षां कितीतरी बारीक झाली आहे ! दररोजच्या अतिशय कष्टामुळें माझ्या हाताप्रमाणें या मुठीला-सुद्धां जरा प्राप्त होत चालली आहे ! या बैलांना रोज रोज नांगराला जुंपण्याचीहि मला लाज वाटूं लागली आहे. मी त्यांना रोज श्रम देतों पण त्यांना श्रम देऊन त्यांपासून मी आपला काय फायदा करून घेतों ! मी जसा कोरडा आहें तसा आहें. हें शेत दरवर्षी मीं नांगरावें आणि त्यांतील ढिपळया फोडून त्यांची चांगली मशागत करावी आणि त्यांत जें कांहीं उत्पन्न होईल तें दुसऱ्यांना देऊन मी उपाशी राहावें, असा माझा आज ६० वर्षें सारखा क्रम चालला आहे. हें शेत मला म्हणतें कीं, " अरे, मजकडून तुला दरवर्षी किती तरी धान्य दिलें जातें; त्यांतून तूं आणि तुझ्या बायकामुलांनीं पोटभर जेवून बाकी उरेल त्यांतून थंडीवाऱ्याच्या निवारणासाठीं तूं चांगले कपडे करावे आणि चार पैसे जवळ शिल्लक बाळगून असावें, असा माझा हेतु असतो; पण तूं पाहावा तो जसा होतास तसा कायम आहेस. तुझ्या पोटाचा एकहि खळगा अजून बुजाला नाहीं, आणि तुझ्या अंगावर एक वीतभरहि धड कपडा नाहीं. तुझ्या मनगटांत जोर नाहीं, आणि तुझ्या डोळ्यांत पाणी नाहीं. एवढ्या धान्याचें तूं करतोस तरी काय ?" असें माझ्या शेतानें मला विचारिलें म्हणजे, त्याला काय उत्तर द्यावें, हें मला कळत नाहीं. माझें धान्य कुणीकडे जातें, हें मलाहि समजत नाहीं. कोणी दरवडा घालायाला येत नाहीं, किंवा कोणी माझें घर फोडीत नाहीं. तरी पण माझ्या घरांतलें धान्य नाहींसें होतें एवढें खरें. जी वस्तु चोरून न्यावयाची त्या वस्तूला प्रत्यक्ष हात लावल्यावांचून ती नेतां यावी ही जादु ज्यांनीं काढली असेल, ते खरोखर सर्व जगामध्यें हस्तचापल्याच्या कामांत अगदीं पहिल्या नंबरचे असले पाहिजेत. त्यांची भूक निवारण करण्यांत आजपर्यंत माझें सर्व कांहीं खर्च होत असल्यामुळें जगांतील कोणतेंहि सुख मला माहीत नाहीं. पोटभर जेवलें म्हणजे रात्रीं चांगली झोंप लागते असें म्हणतात, पण मला त्याचा अनुभव नाहीं. सगळ्या अंगभर जर उबदार कपडा असेल, तर थंडीनें हातपाय कांकडा-वयाचे नाहींत, असें कांहीं लोक खात्रीनें सांगतात. त्याचा अनुभव मला

एकदां घेऊन पाहावयाचा आहे. पण तो कधीं ! पावसानें अंग भिजूं नये म्हणून अलीकडे कोणी छत्र्या काढल्या आहेत म्हणून सांगतात. जो पाऊस सगळ्या शेतांना भिजवितो तो त्या शेतांतील एका शेतकऱ्याला भिजवूं शकणार नाहीं, खरें असेल काय ? माझ्या समोरचीं झाडें आणि जनावरें हीं जशीं ऊन, वारा, पाऊस आणि भूक सहन करितात त्याचप्रमाणें मलाहि करतां येऊं लागलें आहे. पण मला कोणी सांगतात कीं, मी मनुष्य आहें ! पण मी जर मनुष्य आहें तर मी तान्हेनें आणि भुकेनें मरत नाहीं कसा ! संवय ! संवय ! याच्याशिवाय दुसरें कांहीं कारण नाहीं. पण माझें असो ! माझें काय? परंतु ज्या महात्म्यांच्या सुखासाठीं आणि ऐषआरामासाठीं मी राबत आहें, त्यांचें तरी ठीक चाललें आहे ना ! देवा, त्यांच्या सुखामध्यें आणि चैनीमध्यें कधीं कांहीं कमतरता पडत नाहीं ना ! त्यांची चैन, नाच, रंग, तमाशे, मेजवान्या, व्यसनें; इत्यादि कोणत्याहि कामांत कोठें न्यूनता पडत नसली म्हणजे बाकीचें जग सुबत्तेमध्यें नांदण्यास कोणत्याहि प्रकारची हरकत नाहीं. सारांश, आमच्यासारखें आयुष्य हें परोपकारी आयुष्य होय ! पण या साठ वर्षांच्या अनुभवानें मला माझ्या या आयुष्याचाहि वीट आलेला आहे. आपल्या शेतांत नांगर हांकीत असतां पावसाळ्याच्या प्रारंभीं माझ्यासभोंवतीं पुष्कळ विजा पडलेल्या मीं पाहिल्या आहेत. पण माझ्या अंगावर एकहि पडत नाहीं ! मी इतकी वर्षें शेतांत राबलों आहें कीं, मीं जर तितकींच वर्षें सरकारी कचेरींत नोकरी केली असती, तर मला दोनदां पेनशन मिळालें असतें. इतकी लांब चाकरी करूनहि अखेरीस माझ्यापाशीं कांहीं नाहीं तें नाहींच. आणि तरीहि आकाशांतील वीज अजून मला जिवंत ठेवीतच आहे ! मृत्यूला कान नाहींत असें मला वाटतें ! नाहीं तर त्यानें माझ्या हाका खात्रीनें ऐकिल्या असत्या. मी वृद्ध झालों; माझ्या नांगराची मूठ झिजून माझ्या टकलाप्रमाणें गुळगुळीत झाली, माझ्या बैलाचे पाय शेत तुडवून दोन दोन बोटें झिजून कमी झाले, आणि हें शेतदेखील इतःपर शरीरविदारणाच्या वेदना सहन करूं शकत नाहीं. हे आम्ही सर्व कंटाळलों ! तरीहि विलायतेची क्षुधा अद्यापि शांत होत नाहीं, आणि आमच्या पोटाला पोटभर मिळत नाहीं. अशा स्थितींत निष्फळ मेहनत करून काय हंशील ? बैलांनो, जा. मी एखादा जुलमी राजा नव्हें, तुम्ही

मेलां तरीदेखील तुमच्या मानेवरचें जोखड काढूं नये, इतका मी निर्दय नाहीं. यासाठीं मी हें तुमच्या मानेवरचें जोखड काढून घेतों, आणि तुम्हांला मोकळे करतों, व मीहि मोकळा होतों. संध्याकाळ झाल्यामुळें तुम्हांला मोकळे सोडण्याची वेळच झाली आहे. हल्लीं जशी संध्याकाळ झाली आहे, तशी माझ्या आयुष्याचीहि संध्याकाळ झाली आहे. सूर्याच्या तेजाप्रमाणें माझें सामर्थ्यहि हल्लीं अगदीं क्षीण झालें आहे. पण तो सूर्य आतां अस्ताला जाईल ! माझ्या मात्र नाशिबीं तें सुख नाहीं. मी आपल्या अस्ताची आज कित्येक वर्षे वाट पाहात आहें. पण त्या अंधळ्या मृत्यूला मी सापडत नाहीं ! काय करावें !

# पावसानें अतिशय घाण केली ! : : : ११

काळ : अग्रलेख ता. ७-७-१९०५

या वर्षी पावसाळा नेहमींपेक्षां उशीरानें सुरू झाला.

नाहीं तर यंदांसुद्धां अशी मजेदार वेळ आली होती कीं, तिच्या योगानें आपल्या देशाचें किती तरी कल्याण झालें असतें ! मृगनक्षत्र लागल्यानंतरहि कित्येक दिवस पाऊस न पडल्यापासून अतर्क्य फायदे आहेत ! उतावीळ झालेले लोक ग्रीष्मऋतूंच्या आगींतून होरपळून निघालेले असतात ! चातकाप्रमाणें पावसाची वाट पाहणारे मूर्ख लोक चातकाप्रमाणें बहुतकरून तिर्यग्योनींतीलच असले पाहिजेत ! मृग नक्षत्रामध्यें सूर्यानें प्रवेश केला म्हणजे ताबडतोब पावसानें पडलेंच पाहिजे, ही धर्मवेडेपणाची समजूत लोकांच्या

डोक्यांत कोठून शिरली आहे कोण जाणें ! पूर्वी कदाचित् मृग नक्षत्रामध्यें नियमानें पावसाची सुरुवात होत असेल. परंतु हल्लीं जेव्हां हिंदुस्थानची चोहोंकडून प्रगति आणि सुधारणा चालली आहे, अशा वेळींहि प्रगमनशील मेघांनीं हिंदुस्थानांतील लोकांच्या धर्मवेडेपणाला मान दिलाच पाहिजे, हा मोठा जुलूम आहे ! मूर्ख लोकांच्या ओरडीकडे चांगल्या राज्यकर्त्याप्रमाणें पावसानेंहि लक्ष न देतां इतके दिवस दम काढला हें खरोखर त्याला भूषणावह आहे ! तरीदेखील तो थोडासा लवकरच आला, असें म्हणण्यास हरकत नाहीं. पावसानें लोकांच्या हल्लयाविरुद्ध आणखी कांहीं दिवस टिकाव काढला असता, तर तो हिंदुस्थानच्या किती तरी फायद्यांना कारणीभूत झाला असता ! पाऊस न पडल्यापासून किती फायदे आहेत, या विषयाकडे शास्त्रज्ञ लोकांचें जितकें लक्ष जावयाला पाहिजे आहे, तितकें गेलेलें नाहीं, असें दिसतें. तरी पण हिंदुस्थानांतील लोकांच्या लक्षांत यापैकीं कित्येक फायदे येऊन चुकलेले आहेत व या फायद्यांशीं प्रत्यक्ष रीतीनें किंवा परंपरेनें सरकारचा कांहीं तरी संबंध आहे, अशीहि लोकांची समजूत असल्यामुळें सदर फायद्यांबद्दल ठिकठिकाणचे लोक आपल्या अधिकाऱ्यांकडे अभिनंदनपर आणि आनंदप्रदर्शक मानपत्रेंहि पाठविण्याच्या बेतांत होते ! कारण, पाऊस न पडल्यापासून तसेच अश्रुतपूर्व फायदे होत असतात !

पहिला फायदा म्हटला म्हणजे हा कीं, आजकाल व्यापाराच्या बाबतींत हिंदुस्थान किती खालती गेलें आहे, हें कोणालाहि सांगण्याची जरूरी नाहीं. सगळा माल परदेशांतून येतो. आणि पावसाळ्याचे दिवस आले म्हणजे छत्र्या तर अतोनातच येतात. बरें, त्या छत्र्या जर सर्वच आमच्या इंग्रजांच्या विलायतेहून येत्या, तर आमचें कांहीं म्हणणें नव्हतें. परंतु त्या फ्रान्स, जर्मनी, जपान वगैरे देशांतूनहि येतात. आणि त्या आम्हीं काय म्हणून घ्याव्या ? या परदेशी मालाचा लोकांना अतिशय वीट आलेला आहे. सबब पाऊस न पडल्यापासून परदेशी छत्र्या घेण्याची आवश्यकता राहात नाहीं. आणि त्यामुळें आपल्या देशांतील पैसा ( विलायतेस जाण्याकरितां ) देशांतच कायम रहातो ! याच्यासारखा आज अग्रगण्य फायदा दुसरा कोणताहि नसेल !

चिखलांतून चालण्यापासून किती त्रास आहे, याची कल्पना जे चिखलांतून चालतील त्यांनाच येण्यासारखी आहे. परंतु हा त्रासहि अलीकडे बराच चुकत चालला आहे. पाऊस न पडल्यामुळें बहुतेक सर्व हिंदुस्थानचे रस्ते बहुधा सदा सर्वदा कोरडे ठणठणीत असतात. त्यामुळें कोणी पाय घसरून पडत नाहीं, किंवा कोणाच्या अंगावर चिखल उडत नाहीं. सदोदित रस्त्यांतून चालणाऱ्या लोकांना मोठी हौस वाटते. आणि विशेषेंकरून चिखलानें भरलेले कपडे साफ करण्याचे हिंदुस्थानांतील परटांचे श्रम अलीकडे विशेष वांचूं लागले आहेत.

रस्त्यांतील चिखलापासून शहरांतील लोकांना फार त्रास होतो. पण खेडेगांवांतील लोकांनाहि पावसापासून निराळ्या एका तऱ्हेचा त्रास होत असतो. मोठमोठ्या नद्यांच्या काठीं लहानलहान खेडगांवें पुष्कळ आहेत. मागें अतिशय पाऊस पडत असे व हे गांवच्या गांव वाहून जात असत. परंतु अलीकडे इंग्रजी राज्याच्या उतार वयामध्यें सुधारकांप्रमाणें पाऊसहि नेमस्त झाल्यामुळें नदीला पूर येण्याची धास्ती उरली नाहीं. हा जो नदीकांठच्या लोकांना निर्धास्तपणा उत्पन्न झाला आहे, तो कोणाच्या पुण्याईमुळें झाला आहे, याच्याबद्दल बरोबर निर्णय करतां येत नसल्यामुळेंच केवळ कित्येक नदीकांठच्या गांवच्या पानसुपाऱ्या आणि मानपत्रें तहकूब राहिलेलीं आहेत.

आपल्या देशांत कापड व इतर जिन्नस पुष्कळ पैदा व्हावा असें लोक तोंडानें म्हणतात मात्र; परंतु मजूरदार लोकांवांचून गिरण्या चालाव्या कशा! आणि मोठमोठ्या शहरांतील गिरण्यांमधील पुष्कळ मजूरदार लोकांना पावसाळ्यामध्यें आपलें गिरणीचें काम सोडून शेतें लावण्याकरितां गांवीं जाण्याची वाईट संवय लागलेली आहे. परंतु अलीकडे पाऊस न पडूं लागल्याकारणानें ही अडचण बरीच दूर होत चालली आहे. शेतकऱ्यांचें शेताकडे दुर्लक्ष, शेतांतील उत्पन्नाच्या बरोबरीचा शेतसारा, आणि पावसाचा अभाव, यामुळें शेतकरी मजुरांना पावसाळ्यामध्यें आपल्या शेतावर जाण्याची अपेक्षा राहिलेली नाहीं. व त्यामुळें गिरण्यांच्या कामाला आणि देशी मालाच्या वाढीला बरेंच उत्तेजन येत चाललें आहे. पाऊस न पडल्यामुळें गिरण्यांच्या व्यापाराला हा जो भर येत चालला आहे त्याबद्दल चेंबर्स

ऑफ कॉमर्सनीं आपला आनंद व्यक्त केला आहे. व इंग्रज सरकारच्या राज्याखालीं जर आपल्या देशाचा व्यापार अशाच रीतीनें नेहमीं वृद्धिंगत होत राहिला, तर या चेंबर ऑफ कॉमर्सच्या संस्था सरकारचेंहि अभिनंदन केल्यावांचून कधीं राहावयाच्या नाहींत !

पाऊस न पडल्यामुळें होणाऱ्या फायद्यांबद्दल चेंबर्स ऑफ कॉमर्स सरकारचें अभिनंदन करोत किंवा न करोत, परंतु पाऊस पडत नाहीं या परमेश्वराच्या कृपेबद्दल खुद्द सरकारनेंहि आपलें स्वतःचें अभिनंदन करून घेण्यास हरकत नाहीं. हिंदुस्थानातील जुन्या रानटी राजांना 'इरिगेशन खातें' हें नांवसुद्धां माहीत नसेल, मग त्यापुढें त्या खात्याच्या मार्फत कालवे बांधून लोकांना पाणी विकण्याची गोष्ट तर लांबच राहिली ! दयाळु इंग्रज सरकारनें हें खातें नवीन काढलें आहे. व या खात्यापासून हिंदुस्थान देशाला त्यांनीं किती तरी श्रीमंत करून सोडलें आहे ! आणि या खात्याला पैसे मिळण्याचा हंगाम म्हटला म्हणजे पावसाच्या नक्षत्रांत पाऊस न पडेल तेव्हांच होय ! इरिगेशन खात्याच्या या सुगीच्या दिवसांत या खात्याला किती उत्पन्न होतें ! अशा संधींत पाऊस पडून आपल्या हिंदुस्थान देशाचें उत्पन्न कमी व्हावें आणि तो देश भिकारी व्हावा, अशी कोणी तरी खरा देशभक्त कधीं तरी इच्छा करील काय ?

परंतु आपण हिंदुस्थानांतील लोक आप्पलपोटे नाहीं. आपण फक्त देशभक्तच नसून राजनिष्ठहि आहों. व आपल्या देशाचा जसा फायदा झाला पाहिजे, तसा सरकारचाहि झाला पाहिजे, अशी आपली कळकळ आहे. आणि म्हणून सरकारच्या हितासाठींहि लवकर पाऊस न पडण्यामध्यें फायदा आहे. मीठ हें आपलें जसें जीवन आहे, तसेंच तें हिंदुस्थानांतील इंग्रज सरकारचेंहि आहे. मिठावांचून आपल्याला ज्याप्रमाणें जेवण गोड लागत नाहीं, त्याचप्रमाणें तें सरकारलाहि गोड लागत नाहीं. समुद्राचें पाणी फुकटचें, आणि सूर्याची उष्णताहि फुकटची, अशा रीतीनें परस्पर पिकणाऱ्या मिठावरहि आपला कर ठेवल्यावांचून सरकारला हिंदुस्थानावरील आपलें राज्य अगदीं अळणी वाटतें. सारांश, आपल्या सरकारची मुख्य उपजीविका मिठावर आहे. परंतु दिल्ली दरबारचे वेळीं औदार्य दाखविण्याकरितां

मिठावरील कर आठ आण्यांनीं कमी केला असल्यामुळें सरकारच्या या उदरनिर्वाहाच्या साधनामध्यें सांप्रत बराच खळगा पडला आहे. अशा सरकारी आपत्तीच्या समयीं पावसानें इतकी घाई करणें योग्य नव्हतें. सर्वांना हें माहितच आहे कीं, पाऊस आला म्हणजे सूर्यानें वाळविलेलें इंग्रज सरकारचें मीठ विरघळून जातें. अशा स्थितीमध्यें ‘ पावसा, तूं येऊं नको ! ’ ‘ पावसा, तूं येऊं नको ! ’ अशी रोज प्रार्थना करीत बसणें हेंच खऱ्या राजनिष्ठेचें चिन्ह आहे ! आणि ‘ अजून पाऊस कां येत नाहीं ? ’ ‘ आर्द्रा नक्षत्रहि कोरडें चाललें ! ’ असले उद्‍गार काढणारे, पावसासाठीं परमेश्वराची विनवणी करणारे, किंवा देवांवर संततधार धरून असलेलें पाणी नाहींसें करणारे हे सर्व लोक लुच्चे आहेत ! सरकारचीं मिठागरें विरघळून जावीं अशी या लबाडांची इच्छा असते. सारांश, पावसाला बोलावणें म्हणजे हा एक निवळ आच्छादित राजद्रोह आहे, यांत संशय नाहीं. पाऊस न पडल्यामुळें मिठाच्या मक्तेदारांपासून सरकारला चांगला पैसा मिळूं शकतो. आणि सरकार श्रीमंत झालें म्हणजे तीच आपली श्रीमंती ! यावरून मिठासाठींसुद्धां पावसाचें न येणें किती अगत्याचें आहे, हें लक्षांत येईल.

हिंदुस्थानांतील कित्येक मूर्ख लोकांमध्यें अशी समजूत आहे कीं, पाऊस न पडणें वगैरे ज्या दैविक आपत्ती आहेत त्या राजांच्या अन्यायांमुळें उत्पन्न होत असतात. व अलीकडे पाऊस उशीरां सुरू होतो व पुरेसा पडत नाहीं, यापासून किती फायदे आहेत इकडे लक्ष न देतां, या पावसाचा दोष पुष्कळ धर्मभोळे लोक बिचाऱ्या इंग्रज सरकारच्या माथीं मारतात. वास्तविक राजाचा आणि पावसाचा कांहीं एक संबंध नाहीं. राजानें विनाकारण एखादी लढाई करून तेथें हजारों लोकांचे खून केले असले, किंवा एखाद्या लोकांचें अन्यायानें राज्य लुबाडून त्यांना सर्वतोपरी नागविलें असलें तरी त्याबद्दल पावसानें रुसावयाला काय झालें ? राजानें लोकांना लुटलें असेल, पावसाला कांहीं लुटलें नाहीं ! मग यानें न पडावयाला काय झालें ? शिवाय लोकांना त्रास देण्याच्या बाबतींत राजांना पावसाइतकाच सशास्त्र अधिकार आहे ! या बाबतींत राजा व आपण दोघेंहि बरोबरीचे आहों, हें पावसानें विसरतां कामा नये. कारण, राजानें लुटलें आणि पावसानें भिजविलें, तर त्याची फिर्याद कोणाकडे न्यावयाची ? या इंडियन श्रुतिवाक्यावरून लोकांना

भिजविण्याचा पावसाला जितका हक्क आहे, तितकाच लोकांना लुटण्याचा सरकारलाहि हक्क आहे; व त्याबद्दल कोणाकडेहि फिर्याद न नेतां किंवा तत्प्रतिकारार्थ यत्किंचित्‌हि हातपाय न हालवितां लोकांनीं तें सर्व सहन केलें पाहिजे, अशी श्रुतीची अनुज्ञा असल्यामुळें या कामांत पावसाला राजा-विरुद्ध कुरकूर करण्याला कांहीं एक कारण नाहीं. शिवाय पावसानें धान्य उत्पन्न करावें आणि राजानें लोकांच्या मडक्यातून तें पळवून न्यावें, असा हा सृष्टिक्रम चालू राहण्यासाठींच परमेश्वरानें पाऊस आणि राजा यांची जोडी निर्माण केलेली आहे. प्रजेला छळण्याच्या कामातील हे दोघे साथीदार आहेत. परमेश्वरानें या दोघांला एकमेकांचे भाऊ म्हणून निर्माण केलें आहे. असें असतां या भांवडांनीं एकमेकांवर असें रुसावें हें इष्ट आहे काय ? पावसापासून राजाचें निःसंशय नुकसान आहे; व पावसानें पडणें हा राजाच्या संबंधानें पावसाचा निवळ अन्याय आहे. तरी पण हा अन्याय केल्याबद्दल राजा पावसावर कधीं तरी रागावतो काय ? आणि पावसाच्या अन्यायाबद्दल जर राजा कधीं रागावत नाहीं, तर राजाच्या अन्यायाबद्दल पावसानें आकाशामध्यें फुगून बसणें हें तरी योग्य होईल काय ? सारांश, वास्तविक राजांच्या अन्यायाचा आणि पावसाच्या पडण्याचा कांहीं एक कार्यकारणभावसंबंध नाहीं. परंतु असा जर कांहीं कदाचित् अदृश्य संबंध असेल, तर त्याच्यासाठींहि हल्लींच्या काळांत दुसरी एक योजना करून ठेवण्यांत आलेली आहे. झाडें पुष्कळ असलीं म्हणजे पाऊस पुष्कळ पडतो, असा एक अर्वाचीन शास्त्राचा खरा सिद्धान्त आहे. त्यामुळें जिकडे तिकडे जंगलें राखून ठेवण्याचा उपक्रम हिंदुस्थानांत सुरू झालेला आहे. राजांच्या अन्यायामुळें पाऊस जातो ही जुनी वेडगळ कल्पना खरी असेल, तर या रिझर्व फॉरेस्ट्‌स्‌चे आपण खरोखर आभार मानले पाहिजेत. कारण, पहिलीं दोन नक्षत्रें गेल्यावर का होईना, थोडासा तरी जो पाऊस आहे, त्याचें श्रेय जंगलांनाच दिलें पाहिजे. राजांच्या अन्यायांनीं पाऊस जातो हें जुनें मत खरें असतें, आणि राखलेल्या जंगलांनीं पाऊस खालीं पडतो हा नवीन शोध अजून लागला नसता तर हिंदुस्थानाला कदाचित् फारच भयंकर स्थिति आली असती ! व आजपर्यंत हिंदुस्थानच्या इतिहासामध्यें दुर्गादेवीचा दुष्काळ जो एकच आहे, त्याची संख्या किती वाढली असती, याचा अंदाज

करणेंहि कठीण झालें असतें ! ह्यावरून राखलेल्या जंगलाची आज आपल्याला किती आवश्यकता आहे, त्या जंगलांतील झाडांचे आपण किती आभार मानले पाहिजेत, आणि राजांची पुण्याई कमी होत असली तर समतोलपणा राखण्यासाठीं त्या मानानें रिझर्व फॉरेस्टांची संख्या किती वाढविली पाहिजे, याबद्दल कोणालाहि कल्पना येण्यासारखी आहे. राखलेल्या जंगलांपासून लोकांना त्रास होतो अशी कित्येकांची ओरड आहे. परंतु राजनीति आणि पाऊस यांच्या संबंधावर ज्यांचा विश्वास आहे, त्यांनीं रिझर्व फॉरेस्टसूची मर्यादा आजकाल वाढवूं देण्याला कोणतीहि हरकत आणून उपयोगी नाहीं. कारण, आतां पावसाची सर्व भिस्त काय ती एकट्या जंगलांवरच आहे. आणि म्हणून आपल्याला पावसासाठीं जंगलांची अतिशय आवश्यकता आहे; व ती इतकी आहे कीं, लोकांनीं आपल्या इतर जमिनी रिझर्व फारेस्टांसाठीं देऊन शिवाय त्यांनीं आपल्या खुद्द घरांवरहि जंगल वाढूं दिलें तरीसुद्धां पावसासाठीं त्याची अपेक्षा आहेच ! इतकीं पावसाचीं अन्य कारणें अलीकडे दुर्मिळ होत चाललीं आहेत ! जंगलांची ही जरूरी कळल्यामुळें अलीकडे कित्येक उदार व सार्वजनिक हित चिंतणारे लोक आपल्या जमिनी आपण होऊन जंगल राखण्याकरितां देण्याला तयार होतात. परंतु "आमच्या जमिनी घ्या आणि जंगल वाढवा" असें कोणी म्हणूं लागला, म्हणजे कित्येक अधिकारी चिडतात व राज्यांतील पुण्याई कमी झाली आहे अशा अर्थामध्यें या देणग्यांचें पर्यवसान होतें असें समजून पुष्कळ अधिकारी लोक फुकट मिळत असलेल्या जमिनी नाकारूं लागले आहेत. परंतु हें चांगलें नव्हे. जंगलांची वाढ अवश्य झालीच पाहिजे. शिवाय राखलेल्या जंगलामध्यें पाऊस पाडण्याचें सामर्थ्य नाहीं, अशी शंका घेण्याचें कारण नाहीं. कारण, ठाणें जिल्ह्यांतील एका खेडेगांवाजवळील राखलेल्या जंगलांतून एका कातकऱ्यानें एक जळाऊ लांकडांची मोळी राउंड गार्डाच्या न कळत चोरून नेल्यामुळें यंदाचा पावसाळा सुरू होण्याला उशीर लागला. कारण, त्यामुळें ठाणें जिल्ह्यांतील जंगलाचें आकर्षण मेघांवर कमी पडलें, तेणेंकरून वातावरणावर दाब कमी होऊन कोलंबोच्या किनाऱ्यावरील पावसाळ्याच्या वाऱ्यामध्यें गति उत्पन्न होईना, आणि त्यामुळें मृग, आर्द्रा वगैरे नक्षत्रांमध्यें कोठेंहि पाऊस पडला नाहीं, असा शास्त्रीय कार्यकारणभावसंबंध एका वनस्पतिशास्त्राच्या आणि

वातावरणशास्त्राच्या वेत्त्यानें नुकताच प्रसिद्ध केला आहे ! सारांश, सरकारी अन्यायांनीं पाऊस जातो, हें जुनें आणि सरकारी जंगलांनीं पाऊस येतो हें नवें अशीं हीं दोन्हीं तत्त्वें जर खरीं असतील तर हल्लींच्या राजांच्या हातांत पावसावर दाब ठेवण्याचें अद्‌भुत सामर्थ्य आलें आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. जेव्हां पाऊस नको असेल, तेव्हां अन्याय करावा, आणि जेव्हां तो पाहिजे असेल तेव्हां जंगलें वाढवावीं ! अशा रीतीनें या अद्‌भुत शक्तीच्या वाफेच्या दोन्ही नळयांवर हात ठेवून व त्यांचे कॉक आवश्यकतेप्रमाणें खुले किंवा बंद करून आपल्याला पाहिजे तेव्हां आणि पाहिजे तेवढा पाऊस पाडून घेण्याची अजब युक्ति आजपर्यंत कोणालाहि सांपडलेली नव्हती. नळाच्या तोटींतून आपण लागेल तेवढें पाणी घेतों, त्याप्रमाणें पावसाला अर्वाचीन शोधांनीं अगदीं बांधून टाकलें आहे. अन्याय आणि जंगलें यांचा समतोलपणा राखून ढगांमधून पाणी काढून घेणें, ही युक्ति पूर्वीं शक्यच नव्हती ! कारण, एकीकडे अन्याय करणें आणि दुसरीकडे त्याच्या निरसनार्थ लोकांच्या जमिनी घेऊन त्यांवर अतिशय जंगलें वाढविणें, ह्या कल्पनाच पूर्वीं कोणाला माहित नव्हत्या. किंवा यांविषयीं माहिती असती तरी पूर्वींच्या लोकांना इतके पुष्कळ अन्याय निर्धास्तपणें करण्याची हातोटी साधलीहि नसती ! सारांश, पाऊस न पडल्यापासून जंगलखात्याचें महत्त्व विशेष वाढतें, त्याची आवश्यकता लोकांना भासूं लागते, व हें खातें निर्माण करण्यांत सरकारची किती दूरदृष्टि आहे याचीहि लोकांना कल्पना येते. आणि हे फायदे कांहीं थोडेथोडके नाहींत.

परंतु या राजकीय फायद्यांशिवाय पाऊस न पडल्यापासून कित्येक सामाजिक फायदेहि आहेत. ज्येष्ठ, आषाढ, श्रावण वगैरे महिन्यांत मागें पावसाची झोड फार असे, त्यामुळें या महिन्यांत लग्नें करण्याचा रिवाज आपल्या इकडे नव्हता. परंतु आतां ज्येष्ठ महिन्याच्या अगदीं अमावास्ये-पर्यंतसुद्धां लोकांनीं लग्नें करून पाहिलीं आहेत. आणि तसें करण्याला पावसा-कडून तरी निदान कांहीं हरकत नाहीं. सबब आकाशांतील रवि, शुक्र, गुरु वगैरे मंडळीची कांहीं हरकत नसेल, तर आषाढ, श्रावण, वगैरे महिन्यांतसुद्धां लग्नाची चाल पाडण्याला सुरवात करण्याची आतां वेळ

आलेली आहे. प्लेगनें व दुष्काळानें हिंदुस्थानची लोकसंख्या कमी होत आहे, हें सर्वांना माहीतच आहे. अशा वेळीं ती लोकसंख्या वाढविण्याचें राजरोस असें एकच साधन जें लग्न, त्या लग्नाचे मुहूर्त जर जास्त निघतील, आणि या लग्नाचा कारखाना बाराहि महिने जर सुरू राहील, तर त्यापासून पुष्कळ फायदा होणार आहे. परंतु या सर्व गोष्टी पावसानें पडण्याची घाई न केली, किंवा मुळींच न पडण्याची मेहेरबानी केली, तरच साध्य होण्यासारख्या आहेत. आणि आपल्या देशावर सामाजिक बाबतींतहि अनुग्रह करण्याचा पावसाचा विचार नाहीं असें दिसत नाहीं.

तसेंच पूर्वी घरें बांधण्याला लवकर सुरवात करीत असत व चैत्रवैशाखांत लोक घराचीं कामें आटोपून घेत असत. लवकर पाऊस सुरू होईल आणि मग घराचें काम पुरें होणार नाहीं, अशी पूर्वी भीति असे. परंतु आतां लोकांनीं लग्नाप्रमाणें घराचेंहि काम खुद्द पावसाळ्यामध्येंहि हातीं घ्यावें अशी एक उत्कृष्ट सोय या इंग्रजी राज्यामध्यें झालेली आहे.

परंतु यंदा पाऊस पडण्याला सुमारें महिनाभर उशीर लागल्यामुळें लोकांची दुसरी एक मोठी सोय जुळून येण्याच्या बेतांत आली होती. आगगाडीसारखी आजकाल सोय दुसऱ्या कशामध्येंहि नाहीं. जे आगगाडींत बसून जातात, त्यांना साहेबांनीं धक्के मारले तरी आपण विमानांतच बसलों आहों असें वाटतें. अशा प्रकारची आगगाडी आपल्या इकडे व्हावी असें कोणाला वाटणार नाहीं? जिकडे आगगाड्या झाल्या आहेत, तेथील लोकांना कदाचित् त्यांची किंमत नसेल; परंतु हे अग्निरथ ज्या प्रदेशावरून अजून फिरले नाहींत, तेथील लोकांना हें भाग्य केव्हां आपल्या नशीबीं येईल असें होऊन जातें. अशा प्रकारचे एके ठिकाणचे लोक 'यंदा आपल्याकडे आगगाडी होईल!' 'यंदा आपल्याकडे आगगाडी होईल!' असें म्हणत प्रत्येक दुष्काळाची वाट पहात बसत. असे बिचाऱ्यांचे आठ दुष्काळ फुकट गेले! पण आगगाडी कांहीं झाली नाहीं. गरीब बिचारे लोक! त्यांचा गांव कांहीं सरहद्दीवर नाहीं! किंवा तिकडे कधीं सैन्य नेण्याचा प्रसंग यावयाचा नाहीं! मग दुष्काळाखेरीज बिचाऱ्यांच्या मुलुखांत आगगाडी कोण बांधितो? परंतु यंदा त्यांना पुष्कळ आशा वाटूं लागली होती व एकसारखा महिनाभर जेव्हां पाऊस पडेनासा झाला होता, तेव्हां तर

त्यांचा अजमास अगदीं दृढ होऊन गेला होता; व आतां आपल्या इकडे आगगाडी होणार, तारेचे खांब आपल्या शेतांत उभे राहणार, आणि तारेच्या कुंपणावर उभे राहून आगगाडींतील पॅसेंजर लोकांना वेडावण्याची सुसंधि आपल्या गांवच्या मुलांना मिळणार, अशाबद्दल तेथील लोकांना अतिशय आनंदहि झाला होता. व आतां "येथील आगगाडीच्या रस्त्याचा भराव टाकण्याची सुरुवात करण्याला बिलकुल विलंब लावितां कामा नये," असा रिपोर्ट तेथील मुख्य अधिकाऱ्यांकडून गेल्याची खात्रीलायक बातमी गांवच्या लोकांना समजून त्यांनीं आगगाडीबद्दल कळकळीची व जरुरीची शिफारस करणाऱ्या त्या अधिकारी साहेबांच्या सन्मानार्थ एक पानसुपारी करण्याचासुद्धां बेत केला होता. मानपत्राचा मसुदा तयार झाला होता. खुर्च्याटेबलें आणि जाजमें जमा झालीं होतीं. आणि हार तयार करणाऱ्या माळ्यांनीं कित्येक फुलें दोऱ्यांत ओंवलींसुद्धां होतीं. परंतु इतक्यांत सदर अधिकाऱ्यांना कोणी चावट माणसांनीं सांगितलें कीं, या आगगाडीचा रस्ता सुरू करण्याबद्दल तुम्हीं मानपत्र घेणें म्हणजे पर्यायानें पाऊस न पडल्याबद्दल व दुष्काळ पडल्याबद्दल हें मानपत्र घेण्यासारखें होणार आहे ! ही भलतीच कल्पना कोणी हलकटांनीं त्यांच्या डोक्यांत भरवून दिल्यामुळें तो मानपत्राचा आणि पानसुपारीचा बेत मध्येंच बंद पडला !

अशाचमुळें इतर ठिकाणींहि लोकांचा हिरमोड होत आहे. लोकांना वाटलें होतें कीं, आतां ठिकाठिकाणीं 'टेस्ट वर्क्स' सुरू होतील ! जागोजाग तळीं आणि विहिरी खणल्या जातील ! ज्या सडकेवर खडी नाहीं त्या सडकेवर खडी घातली जाईल, जिकडे तिकडे 'रिलीफ कामें' सुरू होतील, किंचनगृहें उघडतील, आणि काशीपासून रामेश्वरापर्यंत जिकडे तिकडे अन्नशांतीचे समारंभ सुरू होतील ! ते हां अशा रीतीनें हीं जीं इष्टापूर्तांचीं कामें आणि सहस्रभोजनें होणार त्याबद्दल आपण कोणाचे तरी आभार मानिले पाहिजेत अशा शुद्ध बुद्धीनें ठिकाठिकाणचे लोक कोणी अधिकारी भेटला म्हणजे त्याला मानपत्र समर्पण करण्याला जात. परंतु लोक मानपत्र देण्याला गेले म्हणजे तो अधिकारी घुस्सा येऊन त्यांच्या पाठीस लागे, तेव्हां लोकांचा निरुपाय होई. तरी पण एखादा शांत स्वभावाचा अधिकारी

भेटला असतां त्याच्या गळ्यांत एखादी तरी फुलांची माळ त्यानें कारण विचारण्याच्या आधीं ते घालीत. पुढें 'हा माझा सन्मान तुम्ही कशाबद्दल करतां,' असें त्यानें विचारलें, म्हणजे ते मोठ्या नम्रपणानें म्हणत कीं, 'मेहेरबान साहेब, आपल्या हातून आतां लवकरच तळीं, विहिरी, अन्न-संतर्पण वगैरे अनेक पुण्यकारक कामें व्हावयाचीं आहेत; म्हणून आम्ही आपला हा सन्मान करीत आहों.' हें ऐकून गळ्यांतील माळा तोडून टाकून त्या अधिकाऱ्यानें म्हणावें कीं, 'मूर्खांनो, दुष्काळ पडत चालल्याबद्दल मला मानपत्र! मी दुष्काळ पाडतों कीं काय! असला सन्मान दाखविणें म्हणजे एखाद्याचा अपमान करण्यासारखेंच आहे!' असे रागाचे शब्द ऐकले म्हणजे आपली चूक काय होत आहे, हें लक्षांत येऊन खेडेगांवचे लोक पळून जात. अशी लोकांची मानपत्र देण्याची हौस असून त्यांची पावलोंपावलीं निराशा होत आहे. पाऊस न पडल्यापासून काय फायदे आहेत, हें लोकांना पूर्णपणें कळून चुकलें आहे. परंतु सरकारी अधि-काऱ्यांची अद्यापि कांहीं कोती समजूत असल्यामुळें बरेच मानपत्राचे समारंभ सफळ झाल्यावांचून राहिले आहेत. वास्तविक पाहिलें असतां या कामीं मानपत्रें घेण्याला कांहीं हरकत नाहीं.

परंतु पाऊस महिनाभर उशीरानें सुरू होण्यापासून दुसरे कितीहि फायदे होत असले तरी त्या सर्वोपेक्षांहि अतिशय मोठा असा एक फायदा आहे. शांत झालेल्या मेंदूसारखी दुसरी उत्तम चीज या जगामध्यें कोणतीहि नाहीं. शांत मेंदू वाटेल ती अद्‌भुत कल्पना काढूं शकेल. परंतु कामाचे गाडे उपसून उपसून थकून गेलेला मेंदू काय करणार? त्याला विश्रांतीच पाहिजे. सिमला, दार्जिलिंग, महाबळेश्वर, उटकमंड वगैरेसारख्या गार हवेच्या जागेंत तीन तीन महिने तरी निदान विश्रांति पाहिजे! जून महिन्याच्या प्रारंभींच गिरीवरून अवरोहण करणें म्हणजे खरोखर फार दुःखदायक आहे. पावसानें आपली मुदत पुढें ढकलल्यास, म्हणजे जूनच्या प्रारंभींच पावसाळा सुरू होतो तो निदान जुलैच्या प्रारंभीं सुरू झाल्यास, अनेक तऱ्हेच्या कुटिल कारस्थानांनीं त्रासून गेलेल्या डोक्यांना आणखी एक महिनाभर तरी निदान जास्त विश्रांति सांपडेल. व अशा रीतीनें बरेच महिने विश्रांतीमध्यें फुकट गेल्यानें पुढें काम करण्याला सरकारी अधिकाऱ्यांना चांगली हुषारी येईल! हा

देखील पाऊस लवकर न पडल्यापासून एक मोठा फायदा आहे. आणि कोणताहि राजनिष्ठ मनुष्य या फायद्यासाठीं तरी निदान पावसाला थोडासा उशीर लागला म्हणून विनाकारण कुरकूर करणार नाहीं.

आतां पाऊस न पडल्यापासून तोटे अगदींच नाहींत असें नाहीं. आणि त्या सर्वांतील मुख्य तोटा म्हटला म्हणजे हा आहे कीं, सुटीचा हुकूम येण्याच्या आधीं भरपूर शेतसारा वसूल करून टाकण्याच्या कामीं एखाद्या पापभीरु अंमलदाराला थोडी शंका उत्पन्न होते! परंतु असल्या तोट्याच्या मानानें पाहिलें असतां पाऊस न पडल्यापासून एकंदरींत फायदेच जास्त आहेत. आणि हे सगळे फायदे सुदैवानें यंदा हिंदुस्थानला लाभण्याची वेळ आली होती. परंतु इतक्यांत पावसानें घाण केली! असो. परमेश्वराची मर्जी! त्याला कोण काय करणार!

---

# मनापुढें खरा व स्पष्ट उद्देश असला पाहिजे : १२

काळ : अग्रलेख, ता. २८।७।१९०५

---

● या काळांतले राजकीय पुढारी वृत्तीनें सनातनी होते. स्वातंत्र्याच्या चळवळीला धर्माचें अधिष्ठान पाहिजे असा त्यांच्या शिकवणीचा सूर होता. याचा परिणाम फक्त धार्मिक आचारांच्या पुनरुज्जीवनांत झाला. स्वातंत्र्याचें उद्दिष्ट समोर ठेवून त्यावर लक्ष केंद्रित केलें पाहिजे.

परमेश्वरानें ह्या जगामध्यें जमीन आणि राजे उत्पन्न केल्यापासून कित्येक लोक स्वतंत्रतेंत आणि कित्येक लोक गुलामगिरींत अशी व्यवस्था चाल-लेलीच आहे. या दोन अवस्थांपैकीं स्वतंत्रता ही सुखाची अवस्था आहे,

आणि गुलामगिरी म्हणजे यमलोकांतील नरकाची ऐहिक प्रतिमाच होय. अशा स्थितीमध्यें राहण्यांत कोणालाहि सुख वाटणार नाहीं. आईच्या पोटांतून बाहेर पडणाऱ्या मुलाला जर जन्मल्याबरोबर बोलतां येत असतें आणि त्याला जर विचारलें असतें, तर त्यानेंसुद्धां 'गुलामगिरी वाईट' म्हणून सांगितलें असतें, इतका गुलामगिरीचा तिटकारा नैसर्गिक आहे. आतां कित्येक लोकांना या गुलामगिरीमध्येंहि सुख वाटतें. परंतु ते अपवाद होत. किड्यांना शेणामध्यें आनंद वाटतो, म्हणून शेण उत्तम नव्हे. त्याप्रमाणें कित्येक किड्यांना गुलामगिरीमध्यें सुख वाटतें, म्हणून ती उत्तम होय, असें मुळींच म्हणतां यावयाचें नाहीं. असल्या ह्या अतिशय निंद्य, नीच आणि नरकप्राय गुलामगिरीच्या अवस्थेमधून बाहेर निघण्यासाठीं सर्व लोक नेहमीं प्रयत्न करीत असतां कित्येकांना यश येतें आणि कित्येकांचें धैर्य अपयशानें खचून जातें. असल्या सगळ्या प्रयत्नांचें परीक्षण केलें असतां अपयश टाळण्याचा आणि यश मिळविण्याचा मार्ग कोणता, हें लक्षांत येण्यासारखें आहे.

या कामाला परमेश्वराची कृपा, दैवाची अनुकूलता वगैरे गोष्टी तर अवश्य पाहिजेतच. परंतु या परस्वाधीन गोष्टींची अपेक्षा करण्याच्या पूर्वी मनुष्यानें आपल्या स्वाधीन असलेल्या गोष्टी तयार केल्या पाहिजेत. बहुतेक यश मनुष्याच्या हातीं असलेल्या दीर्घ उद्योगामध्येंच आहे. मनुष्याचा दृढनिश्चय आणि दीर्घ उद्योग हीच देवाची कृपा आणि दैवाची अनुकूलता होय.

वेदांतील मोक्ष आणि राजकीय मोक्ष या दोहोंच्यामध्यें बरेंच साम्य आहे. बंधमोचन हेंच दोघांचेंहि लक्षण होय. परंतु तें घडवून आणण्याला आध्यात्मिक मोक्षप्राप्तीसाठीं राजकीय मोक्ष हाच एका दृष्टीनें जास्त कठीण आहे. आध्यात्मिक मोक्षाचें काय ? तें बंधविमोचन एका व्यक्तीचें असतें. एका व्यक्तीच्या मनांत आपण मुक्त व्हावें अशी इच्छा उत्पन्न झाली, म्हणजे तो त्या मार्गाला लागतो, त्याबद्दल प्रयत्न करतो, तदुपदेशक शास्त्रांचा अभ्यास करतो, व श्रवणमनननिदिध्यासनादिकांनीं तो आपला हेतु सफळ करून घेतो, आणि या गोष्टी एका जन्मांत झाल्या नाहींत तर तो त्याच गोष्टी पुढील जन्मांत चालू ठेवून आपला हेतु साध्य करून घेतो. परंतु जो मनुष्य राजकीय मोक्ष, राजकीय बंधविमोचन म्हणजे अर्थात् स्वतंत्रता मिळवूं इच्छितो, त्याचें काम फार कठीण असतें. आध्यात्मिक मोक्ष आणि राजकीय मोक्ष यांच्यामध्यें फरक

हा असतो कीं, दुसरा मोक्ष कोणत्याहि एका व्यक्तीकरितां नसून अनेक व्यक्तींकरितां असतो. हा आप्पलपोटेपणाचा नसून सार्वजनिक परोपकाराचा असतो. यांत एकच आत्मा उद्धारावयाचा नसून गुलामगिरींत सांपडलेल्या देशांत जितके लोक असतील तितक्या सर्व लोकांना त्यांच्या बंधनापासून मुक्त करावयाचें असतें. उदाहरणार्थ, एखाद्या परतंत्र देशांत एक लाख लोक असले आणि तो देश स्वतंत्र करावयाचा असला, तर हें कृत्य एक पारमार्थिक मुमुक्षूच्या ध्यानधारणादिकांपेक्षां लाखपटीनें अधिक महत्त्वाचें अधिक उपयोगी, आणि अधिक कठीणहि आहे. या राजकीय मोक्षाच्या कामांत एखाद्याच व्यक्तीच्या मनांत इच्छा उत्पन्न होऊन कांहीं उपयोग होत नाहीं. आपल्या स्वतंत्रतेची इच्छा सर्व लोकांच्या मनांत सारख्या प्रमाणानें उत्पन्न झाल्यावांचून तो कार्यभाग घडून येत नाहीं. आध्यात्मिक मोक्षांत एकदां इच्छा उत्पन्न झाली म्हणजे ज्याचा तो आपल्या प्रयत्नाला पर्याप्त असतो; पण राजकीय मोक्षामध्यें एखाद्याच्या मनांत इच्छा उत्पन्न झाली, म्हणजे तेथून त्याच्या अडचणींना सुरुवात होते. अज्ञानामुळें ज्यांच्या मनांत तशी इच्छा उत्पन्न होत नाहीं, ते आपलेच सर्व लोक आधीं त्याचे शत्रू होतात व इतरांना जिंकण्याच्या आधीं यांनाच जिंकण्याची जास्त आवश्यकता उत्पन्न होऊं लागते. ह्या अडचणीचें निवारण करण्यासाठीं प्रथमतः उद्योगाला न लागतां आपल्या मनांत जशी राजकीय मोक्षाची इच्छा उत्पन्न झाली असेल, तशीच इच्छा दुसऱ्याच्याहि मनामध्यें उत्पन्न करणें भाग पडतें. अशा रीतीनें सर्वांच्या चित्ताचें एकत्व झाल्यानें आपल्याच लोकांपासून आपल्याला जो विरोध होत असतो त्याचा जोर कमी होतो, आपले अनुयायी वाढतात, आणि आपल्या पक्षाला बळकटी येते.

आध्यात्मिक मोक्षप्राप्तीच्या वाटेंत आपल्याला कोणी इतर मनुष्य जाणून बुजून अडथळा करीत नाहीं. हा सायुज्यपदवीप्रत जात आहे, तिकडे जाऊं न देतां याला नरकामध्यें ढकललें पाहिजे, असें कोणी म्हणत नाहीं, किंवा करीतहि नाहीं. मुमुक्षूंना मोक्षपदाप्रत जाऊं न देण्याकरितां म्हणून मुद्दाम कोठें कांहीं संस्था स्थापन झालेल्या नाहींत, किंवा त्यासाठीं कोणी सैन्यें ठेविलेलीं नाहींत; किंवा त्याकरितां कोणी दरसाल कोट्यवधि रुपयेहि खर्च करीत नाहींत. मोक्षाच्या दरवाज्यापाशीं एखादा आत्मा आला तर त्याच्यावर

भडिमार करून त्याच्या अंगाच्या चिंधड्या करण्याकरितां किंवा त्याला भाजून काढण्याकरितां,कोणी रायफल्स आणि मशीनगन्स तयार करून ठेविलेल्या नाहींत. आध्यात्मिक मोक्षाचा दरवाजा खुला आहे. तो दरवाजा येणाऱ्या वाटसरूंचीच अपेक्षा करीत असतो. परंतु राजकीय मोक्षाची गोष्ट तशी नाहीं, हें सर्वांना माहीतच आहे. कित्येक लोकांनीं गुलामगिरींतच राहिलें पाहिजे, अशासाठीं बाकीच्या कांहीं लोकांचे रात्रंदिवस दीर्घ प्रयत्न चालले आहेत. दुसऱ्याच्या हातापायांत गुलामागिरीच्या शृंखला कायम ठेवण्याकरितां कित्येक लोक आपल्या हातांपायांना बंदुकीच्या गोळीच्या आणि तरवारीच्या धारेच्या असाध्य जखमा करून घेण्यालाहि तयार होतात. दुसऱ्यांना उपासमारीमध्यें ठेवण्याकरितां कित्येक लोक आपण स्वतः ठार मरण्याला तयार होतात. दुसऱ्यांना गुलामगिरींतून आपलें डोकें वर काढूं न देण्याकरितां कित्येक लोक आपलीं स्वतःचीं डोकीं यमलोकांतील भयंकर नरकामध्यें घुसडण्यालाहि मागेंपुढें पहात नाहींत. सारांश, जे गुलामगिरींत आहेत, त्यांना राजकीय मोक्षपदाप्रत जाऊं द्यावयाचेंच नाहीं, असा या जगामध्यें कित्येकांचा कृतसंकल्पच असतो. आणि त्यामुळें हा मोक्षमार्ग अतिशय बिकट झालेला आहे. अशा बिकट मार्गामध्यें एकट्या दुकट्यानें जाण्याची सोय नाहीं म्हणून, व अनेक लोकांची एक इच्छा झाल्यावांचून या कामीं यश येण्याचा संभव नाहीं म्हणून, एका विचाराचे अनेक अनुयायी बनणें अत्यंत आवश्यक आहे.

परंतु एखाद्या गुलामगिरींत सांपडलेल्या देशांतील सर्व लोक एकमताचे होणें जितकें आवश्यक आहे, तितकेंच तें कठीणहि आहे. देशांत म्हटलें म्हणजे अनेक प्रकारचे लोक असावयाचे. ते सर्व एकाच दर्जाचे, एकाच विद्वत्तेचे, एकाच योग्यतेचे, किंवा एकाच पायरीवरचे असणें अशक्य आहे. त्यांपैकीं कित्येकांना आपण गुलामगिरीमध्यें आहों, याचीसुद्धां कल्पना नसते. स्वतंत्रता म्हणजे काय, हेंसुद्धां पुष्कळांना समजत नाहीं. परकीय अंमलाच्या विंचवाचें विष कांहींना मुळींच चढत नाहीं. दासपणाची दुर्गंधि दुसऱ्यांच्या नाकांत मुळींच शिरत नाहीं. परतंत्रतेचे परम दारुण देखावेहि कोणाच्या डोळ्यांमध्यें खुपत नाहींत. असे नानाविध लोक ज्या ठिकाणीं राहतात, अशा देशांमध्यें एक विचार कसा उत्पन्न करावयाचा,

आणि त्याच्यापासून राजकीय मोक्ष कसा उत्पन्न करून घ्यावयाचा, हा एक मोठा बिकट प्रश्न आहे. अशा प्रसंगीं सगळे लोक सारख्या शहाणपणाचे बनून सगळ्यांच्या मनामध्यें एकच उद्देश उत्पन्न होईपर्यंत थांबणें, ही गोष्टहि वरच्या इतकीच दुरापास्त आहे. व तशीच ती कालावधीचीहि आहे. या अडचणीस्तव अशा प्रसंगीं कित्येक पुढारी लोक, लोकांची स्थिति असेल, त्या त्या प्रमाणें त्यांच्यापुढें निरनिराळे उद्देश मांडतात. १८२५ सालीं रशियामधील कांहीं लोकांनीं एक राज्यक्रांतीचा घाट घातला होता. समजदार लोक राजाच्या जुलमाला त्रासले होते व कायदेशीर राज्यपद्धति सुरू करावी अशी त्यांची इच्छा होती. अलेक्झँडरच्या मरणानंतर कॉन्स्टन्टाइन आणि निकोलस या दोन भावांपैकीं रशियाच्या गादीवर कोणीं बसावें, याबद्दल दोघांमध्यें कांहीं दिवस वादविवाद चालला होता. ही संधि आपल्याला बंड करण्याला चांगली आहे, असें सैन्यांतील कित्येक पुढाऱ्यांना वाटलें. त्यांच्या मनांतून रशियामध्यें कॉन्स्टिटयूशनल ( कायदेशीर ) राज्यपद्धति स्थापन करावयाची होती. परंतु कॉन्स्टिटयूशनल राज्यपद्धति म्हणजे काय, तिच्यापासून आपले फायदे काय आहेत, आणि राजाच्या अनियंत्रित जुलुमापासून आपले तोटे काय आहेत, याची रशियांतील त्या वेळच्या अनेक लोकांना कल्पनाहि नव्हती. अशी स्थिति असल्यामुळें जसे लोक तसे त्यांना लढण्याला उद्युक्त करणारे उद्देश हा सिद्धांत पुढें सरसावला. भावाभावांच्या वादविवादांत निकोलस हा राजा ठरून राज्याचें काम चालू झालें. परंतु ज्यांना बंड करण्यासाठीं कांहीं तरी निमित्तच पाहिजे होतें, त्यांनीं कॉन्स्टन्टाइनचा पक्ष उचलून धरला. आपल्यांतील पुष्कळ लोक जुलुमी राजांच्या लाथांना चटावलेले आहेत. त्यांच्यापुढें स्वतंत्रतेचें महत्त्व सांगून कांहीं उपयोगी नाहीं. त्यांना कोणी तरी लाथा देणाऱ्या राजांचेंच आमिष दाखविलें पाहिजे. या धोरणावर रशियन पुढाऱ्यांनीं आपल्या पलटणींतील लोकांना असें सांगितलें कीं, कॉन्स्टन्टाइन हा आपला खरा राजा आहे, आणि त्याला गादी मिळत नाहीं याकरितां आपण त्याच्यासाठीं लढणें अवश्य आहे. त्या रशियन पलटणींतील अडाणी आणि गुलाम लोकांना हा उद्देश पसंत पडला. आणि ते नवीन जुलुमी राजा मिळविण्या-

करितां पहिल्या राजाविरुद्ध बंड करण्यासाठीं फितुर झाले. असल्या मूर्ख लोकांशीं गांठ पडलेली असल्यामुळें स्वतंत्रता आणि कॉन्स्टिटयूशनल राज्य-पद्धति हे जे अत्युत्तम उद्देश ते रशियन पुढाऱ्यांनीं फक्त आपआपल्या मनामध्येंच ठेवले होते. व आपण सर्व कॉनूस्टन्टाईन राजाकरितांच लढत आहों, असें ते म्हणत होते. पुढें कांहीं वेळ आपल्या पक्षाला जय येत आहे असें त्यांना वाटलें, तेव्हां ते पुढारी आपले खरे उद्देश बाहेर प्रकट करूं लागले, व "कॉनूस्टन्टाइन आणि कॉन्स्टिटयूशन (कायदेशीर राज्यपद्धति) यांचा जयजयकार असो" असें ते म्हणूं लागले. या जयजय-काराचा अनुवाद फितूर झालेल्या लोकांनींहि केला. परंतु कॉन्स्टिटयूशन म्हणजे काय, हें बिचाऱ्यांना माहीतसुद्धां नव्हतें. हा जयजयकार केल्यानंतर त्या अडाण्यांपैकीं एकानें विचारलें कीं, 'अरे, ही कान्स्टिटयूशन म्हणजे कोण?' त्यावर दुसऱ्या एका शहाण्यानें उत्तर केलें कीं, 'कॉन्स्टनूटाइन हा राजा आणि कॉन्स्टिटयूशन ही त्याची राणी!' यावर तिसरे एक दीडशहाणे जवळ होते ते म्हणाले कीं, 'छे छे! असें नव्हे. ज्या गाडींत बसून राजा राज्याभिषेकाला जाणार आहे, त्या गाडीचें नांव कॉन्स्टिटयूशन असें आहे!' जेथें इतकें अज्ञान आहे, तेथील लोकांना स्वतंत्रता मिळणार कशी? आणि मिळाली तरी तिची त्यांना किंमत काय?

रशियांतील शिपायांनंतर १८५७ सालीं हिंदुस्थानांतील शिपायांनीं बंड केलें होतें. ज्यांनीं हें बंड मूळ उपस्थित केलें असेल, त्यांच्या मनांत कदाचित् त्या वेळच्या मानाप्रमाणें हिंदुस्थानच्या स्वतंत्रतेविषयींच्या उदात्त कल्पना असतील. पण हिंदुस्थानांतील बाकीचे लोक तशा कल्पनांना तयार झालेले नव्हते. कॉन्स्टिटयूशन म्हटलें म्हणजे ती राजाची बायको किंवा घोड्याची गाडी असावी, असें म्हणणारांपैकींच ह्या वेळीं हिंदुस्थानांतील बहुतेक लोक होते. पाश्चिमात्य लुच्चेगिरीचें कसब तर त्यांना माहिती झालेलें नव्हतेंच; पण पूर्वेकडील आपल्या पूर्वजांनीं दिलेलें स्वाभाविक ज्ञानहि ते हरपून गेले होते. येथील लोक त्या वेळीं सर्व कांहीं विसरले होते. त्यांच्या डोळ्यांसमोर मोठमोठ्या राज्यांच्या उलथापालथी होत असूनहि त्यांना त्यांपैकीं कांहीं दिसत नव्हतें, आणि सर्व हिंदुस्थान देश भयंकर आक्रोश करीत असतांनाहि त्यांना कांहीं ऐकूं येत नव्हतें. निपुत्रिक अवस्थेमध्यें

मरण पावलेल्या राजांचे आत्मे अर्ध्या वाटेवरून आपल्या खालसा झालेल्या संस्थानांकडे मार्गे वळून दुःखानें पहात आहेत, ज्यांचें नखहि कधीं दृष्टीस पडावयाचें नाहीं अशा राजपत्न्या सामान्य स्त्रियांप्रमाणें उघड्या पडल्या आहेत, राजभूषणांचे लिलांव होत आहेत, आणि राजवाड्यांवरून नांगर फिरत आहेत, अशी स्थिति सर्वत्र चालू असतांहि त्या वेळीं कोणी डोळे उघडून पहात नव्हते. शिपाई म्हणविणारे सर्व लोक इंग्रजांच्या पलटणांतून चाकरी करीत होते. आपलेपणाचीं, स्वाभिमानाचीं, सर्व बंधनें तुटून गेलेलीं होतीं. 'ज्याची भाकरी त्याची चाकरी' या एका नीच तत्त्वज्ञाना-समोर बाकीचीं सर्व तत्त्वज्ञानें लोपून गेलीं होतीं. ज्याच्या योगानें असल्या मुरदाड लोकांचीं मनें खडबडून जागीं होतील असें एकहि साधन उरलेलें नव्हतें. फक्त एक धर्माचें साधन कांहींबाहीं शिल्लक होतें. तो धर्मदेखील उपनिषदांतील किंवा भगवद्गीतेंतील उज्ज्वळ धर्म नव्हे; तर आचारस्वरूपी धर्माचा थोडासा अंश उरलेला होता. ती किल्ली फिरवून हिंदुस्थानच्या जड झालेल्या शरीरामध्यें चैतन्य उत्पन्न करावें, अशी कल्पना त्या वेळच्या पुढाऱ्यांच्या मनांत येऊन हिंदूंना आणि मुसलमानांना दोघांनाहि उपयोगी पडेल अशी काडतुसांची सबब त्यांनीं काढली. जसे लोक असतील तशाच प्रकारचे उद्देश त्यांच्यापुढें मांडले पाहिजेत, हें जें एक तत्त्व तेंच या ठिकाणींहि दृष्टोत्पत्तीस येतें. अशा लोकांच्या पुढें निवळ स्वदेशाभिमानाची किंवा स्वतंत्रतेची कल्पना ठेवून काय उपयोग होता ? त्यांना जर स्वाभि-मान असता आणि स्वतंत्रतेची किंमत माहीत असती, तर त्यांनीं आधीं इंग्लिशांच्या चाकरीला राहून आपला देश दुसऱ्यांच्या हवालींच कां केला असता ? आपल्याला स्वतंत्रता नाहीं म्हणून चिडणारे जे लोक असतील त्यांच्यापुढें स्वतंत्रतेचा उद्देश ठेवून उपयोग. बाकीच्यांना त्याचें काय ? त्यांना त्यांच्या कल्पनांच्या बेताचेच उद्देश पाहिजेत. हिंदुस्थानच्या त्या वेळच्या लोकांना चिडविण्याला गाईचीं आणि डुकरांचीं काडतुसें हेंच साधन योग्य होतें. परंतु असल्या साधनांमधून मोठा दुर्गुण हा असतो कीं, त्यांनीं पेटविलेला विस्तव फार थोडा वेळ टिकतो. कारण संपलें कीं, कार्य संपतें. गाईच्या आणि डुकराच्या चरबीचीं काडतुसें नाहींत, अशी शिपायांची खात्री झाली, म्हणजे शिपायांचें बंड थांबलें ! हिंदुस्थानच्या स्वतंत्रतेकरितां

जर सर्वांच्या अंतःकरणापासून ती चळवळ चालू झालेली असती, तर आपल्या हिंदुस्थान देशाला स्वतंत्रता दिल्यावांचून ती कधींहि थांबली नसती. यावरून मूळ उद्देशामध्यें किती शहाणपण आणि सामर्थ्य असतें, याची कोणालाहि कल्पना येईल.

अथवा, उद्देश चांगला असला पाहिजे हें कोणाला समजत नसेल? स्वदेशाची स्वतंत्रता हा उद्देश समोर ठेवून देशांतील लोकांनीं एखादा उद्योग आरंभिला, तर देश स्वतंत्र झाल्यावांचून लोक त्या उद्योगापासून विराम पावणार नाहींत, हें खरें आहे. परंतु सर्वच ठिकाणीं तशी अनुकूल लोकस्थिति मिळत नाहीं व जे पुढारी असतात त्यांना जसे लोक असतील त्याप्रमाणेंच त्यांच्याशीं वागावें लागतें. १८५७ नंतर बरोबर चाळीस वर्षांनीं हिंदुस्थानावर मागच्यासारखाच दुसरा एक प्रसंग आला होता. कानपूर, दिल्ली, मिरत, लखनौ, झाशी, ग्वाल्हेर यांनीं आपली कामगिरी स्वाट, दीर, चगदरा, नवागी, इनायत किल्ला वगैरे ठिकाणांकडे दिली, व हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्दीवर १८९७ सालीं अतिशय भयंकर प्रसंग गुदरला. त्या सरहद्दीवरील दऱ्यांतून मॅड मुल्ला, हडा मुल्ला, वगैरे जे पुढारी रहात होते त्यांच्या मनांतून इंग्लिशांविषयीं फारसा प्रेमभाव नव्हता. व हे परकीय लोक आपल्या मुलखामध्यें नसावेत असें त्यांना वाटत होतें. परंतु त्या दऱ्यांतील अडाणी लोकांचीं मनें तितकीं तयार झालेलीं नव्हतीं. त्यामुळें मॅड मुल्लाला जसे लोक त्याप्रमाणें त्यांच्यापुढें कल्पना ठेवणें भाग पडलें. त्या दऱ्यांतील अडाणी लोक मुसलमानी धर्माचे होते. व त्यांच्या मेलेल्या शरीरांमध्यें धर्माच्या ज्योतीनेंच कांहीं उष्णता आली तर येईल, असा संभव होता. त्यामुळें मॅड मुल्लानें त्यांच्यासमोर त्यांना योग्य अशा कित्येक कल्पना ठेविल्या. त्या लोकांना स्वदेशाभिमान आणि स्वतंत्रता या गोष्टी काय आहेत, हें कधीं समजलें नसतें. परंतु आपल्या इस्लामी धर्माचा पुनरुद्भव होणार आहे, ही गोष्ट त्यांना समजण्यासारखी होती. ही कल्पना मॅड मुल्लानें त्यांच्या समोर मांडली. त्यानें लोकांना सांगितलें कीं, पैगंबराचा अवतार झालेला आहे, तो आपल्या मुसलमानी धर्माचें अभ्युत्थान करीत आहे. इंग्रज लोकांना येथून हांकलून देण्याचा त्याचा विचार आहे. तसेंच मॅड मुल्लानें त्या लोकांना आणखी

असेंहि सांगितलें होतें कीं, आपल्या मदतीला खुद्द देवानें सैन्य पाठविलें असून त्या सैन्यांतील पायदळ, घोडेस्वार, तोफखाना वगैरे डोंगराच्या आड दडून बसले आहेत. परंतु तें सैन्य पाहण्यासाठीं तुम्ही मात्र कोणी तिकडे जातां कामा नये, असेंहि तो सांगत असे. शिवाय एके रात्रीं इंग्लिश सैन्य आणि रानटी लोकांच्या टोळ्या यांची चकमक उडाल्या-नंतर दुसरे दिवशीं त्या मॅड मुल्लानें आपल्या लोकांना सांगितलें कीं, "पहा, देवाचा अद्‌भुत चमत्कार किती आहे तो पहा! रात्रीं माझ्या हातावर इंग्रजांच्या तोफेचा एक गोळा पडला. परंतु माझ्या हाताला कांहींएक झालें नाहीं!" असें म्हणून तो आपला हात सर्व लोकांना दाखवूं लागला व त्याचा पुष्कळ परिणाम झाला. अशा रीतीनें दैवी चमत्काराच्या थापा मारणें म्हणजे लोकांना निवळ फसविणें आहे. परंतु जेथें धर्मभोळे लोक आहेत, त्यांच्या हातून देशाभिमानाचीं कामें करावयाचीं आहेत, तेथें त्यांच्या धर्मभोळेपणाचा फायदा घेऊन त्यांना फसविल्यावांचून गत्यंतर नाहीं. दुसऱ्या कोणत्याहि उपायानें त्या लोकांमध्यें त्वेष उत्पन्न झाला नसता. सारांश, जसे लोक असतील त्याप्रमाणें त्यांना लढाईला उद्युक्त करण्याकरितां त्यांच्या पुढें तसे उद्देश ठेवावे लागतात.

परंतु हे सगळे तडजोडीचे मार्ग आहेत. हा खरा मार्ग नव्हे. भिन्न उद्देश पुढें ठेवून जेथें जेथें स्वतंत्रतेसाठीं खटपटी करण्यांत आल्या, तेथें तेथें बहुधा त्या खटपटींस यश आलेलें नाहीं. खोटे उद्देश हे कोणत्याहि लोकांना खरी स्वतंत्रता कधीं मिळवून देऊं शकत नाहींत. जेवढी इच्छा करावी तेवढेंहि मिळण्याची ज्या जगामध्यें मारामार, त्या जगांत त्या इच्छेपलीकडच्या गोष्टी कशा साध्य होणार? अशासाठीं यश येण्याकरितां सर्व लोकांचा एकच उद्देश असला पाहिजे, आणि तो उद्देश काय आहे हें सर्व लोकांना सारख्या रीतीनें समजलें पाहिजे. नेदरलंड्स, फ्रान्स, अमेरिका, ग्रीस, इटली इत्यादि राष्ट्रें जीं स्वतंत्र झालीं तीं अशा धरसोडीनें, आड पडद्यानें, किंवा तडजोडीनें झालीं नाहींत. आपण स्वतंत्र व्हावयाचें हा एक स्पष्ट उद्देश त्यांनीं आपल्या डोळ्यांसमोर ठेविला होता. व त्या उद्देशासाठीं त्यांनीं आपले सर्व दीर्घ प्रयत्न चालविले होते. आणि म्हणूनच त्यांना त्यांमध्यें यश आलें.

धर्माची प्रौढी मिरविण्यांत आणि महत्त्व गाण्यांत कित्येकांना स्वतःला मोठी प्रौढी आणि महत्त्व वाटत असतें. धर्माचें महत्त्व विशेष आहे याबद्दल वाद नाहीं. परंतु या कामांत धर्म कशाला पाहिजे आहे? जेथें बंदुकींत काडतुस घालून चाप ओढला कीं, गोळी उडते आणि त्या गोळीच्या टप्प्यांत असलेला मनुष्य जखमी होत आहे, तेथें धर्माचें करावयाचें काय आहे! धर्मासारख्या वरिष्ठ प्रतीच्या साधनाला असल्या कामीं लाविल्याच्या योगानें इष्ट हेतुहि सफल होत नाहीं, आणि धर्माची मात्र व्यर्थ विटंबना होते. यश आलें तर धर्माचें स्तोम माजविण्याला सोईस्कर असतें. परंतु त्याच्या उलट गोष्ट झाली, म्हणजे धर्मावरील विश्वास विनाकारण उडून जातो. यासाठीं असल्या कामांत धर्माला निरर्थक घुसडणें कधींहि शहाण-पणाचें नाहीं. धर्मापासून धार्मिक उन्नति होईल. परंतु त्याच्यापासून त्याच्या-पलीकडे दुसरें कांहीं साध्य होईल, असें नेहमींच म्हणतां यावयाचें नाहीं. धर्मापासून जर राजकीय उन्नति झाली, तर मग जगांतील कार्यकारणभाव-संबंध संपलाच! राजकीय उद्योगापासून राजकीय उन्नति होते आणि धार्मिक उद्योगापासून धार्मिक उन्नति होते. राजकीय उन्नतीसाठीं धार्मिक उन्नति आणि सामाजिक उन्नति या दोन्हीहि सारख्याच प्रमाणानें अन्यथासिद्ध आहेत. कोणत्या कारणापासून प्रत्यक्ष कोणतें कार्य उत्पन्न होईल, हें पाहून प्रयत्न केले असतां लोकांचे श्रम व्यर्थ जात नाहींत. धर्म, दैव, ईश्वर यांचें आनुकूल्य प्रत्येक कार्याला अवश्य पाहिजे आहे. परंतु त्यांच्यावर अति भार ठेवून स्वस्थ बसल्यानें कोणताहि कार्यभाग होत नाहीं. धर्म, दैव, ईश्वर हीं सामान्य कारणें आहेत आणि प्रत्येक कार्याचीं विशेष कारणें यांच्याहून अगदीं भिन्न आहेत. तीं तीं कारणें घडवून आणिलीं असतां त्यांच्यापासून तशीं तशीं कार्यें निर्माण होतात. हैड्रोजन आणि ऑक्सिजन एक केले म्हणजे पाणी होतें, आणि त्याच पाण्यांत साखर घातली म्हणजे तें गोड होतें; त्याचप्रमाणें योग्य प्रयत्न केला असतां यशहि येतें. यासाठीं आपण प्रयत्न केले पाहिजेत. प्रयत्नानें साध्य होणार नाहीं अशी गोष्ट या जगामध्यें कोणतीहि नाहीं. उद्योगासारखें अनुकूल आणि आळशीपणासारखें प्रतिकूल दैव दुसरें कोणतेंहि नाहीं.

## मंगळ : : : : : १३

काळ : स्वतंत्र लेख ता. २३-६-१९०५

● ग्रहांचीं स्तुतिपर स्तोत्रें पुष्कळ आहेत आणि अलीकडे तर ग्रहपूजेचें स्तोम पुष्कळच माजलें आहे. मराठींतलें हें पहिलें राजकीय ग्रहस्तोत्र म्हटलें पाहिजे.

रात्रीच्या प्रहरीं कोठल्या तरी उघड्या मैदानांत उभा राहून मी आकाशाकडे घटका घटका टक लावून पहात बसतों. त्या वेळीं माझ्या मनांत अनेक प्रकारचे तरंग उत्पन्न होतात. सूर्याचा अस्त झाल्यानंतर आकाशामध्यें जिकडे तिकडे अंधःकार माजतो; त्याप्रमाणें हल्लीं आपल्या हिंदुस्थानामध्येंहि प्रबळ अंधःकार माजलेला आहे, असें मला दिसून येतें. आकाशामध्यें तेजाचा एक किरणहि कोठें उरलेला नसतो, त्याप्रमाणें हिंदुस्थानच्या विस्तीर्ण मर्यादेमध्यें कोठेंहि आशेचा लेश उरला नाहीं, ही गोष्ट मला दृग्गोचर होते. अशा अनेक कारणांनीं रात्रीच्या वेळचें आकाश आणि हल्लींच्या वेळचें हिंदुस्थान यांच्यामधील साम्याची कल्पना मनामध्यें वृद्धिंगत होत जाते व त्या योगानें रात्रीच्या वेळचें आकाश पाहिलें म्हणजे प्रत्येक खेपेला हिंदुस्थानची मला आठवण होते. हिंदुस्थानाला भोगाव्या लागणाऱ्या हालअपेष्टा डोळ्यांपुढें मूर्तिमंत उभ्या राहतात व या संकटांतून हिंदुस्थानाला कोण सोडवील, अशाविषयींचे प्रश्न मनामध्यें उचंबळूं लागतात. अशा मनाच्या व्यग्र स्थितीमध्यें हिंदुस्थानाला सोडविणारा कोणी आहे काय, हें जणूं काय शोधण्यासाठीं माझी दृष्टि चोहोंकडे संचार करूं लागते. पृथ्वीतलावर कोणीहि दृश्यमान होत नसल्यामुळें ती साहजिकपणेंच आकाशतलाकडे वळते. पण आकाशांत तरी कोण आहे ? हिंदुस्थानच्या संकटनिवारणासाठीं

सध्यां कोणी कोठेंहि दिसत नाहीं. पण त्यांतल्या त्यांत जर कांहीं आशा असली तर ती आकाशांतच आहे. कारण, परमेश्वरावांचून अशा राष्ट्रीय संकटापासून सोडविण्याला अन्य कोण समर्थ आहे! पण त्याशिवाय दुसराहि एक विचार आहे. रात्रीच्या प्रहरीं आकाशाकडे पाहिलें म्हणजे असंख्य तारे दिसतात. परंतु त्या सगळ्यांमध्यें मंगळ ग्रह हा मला फार प्रियकर वाटतो. हा राजकीय ग्रह आहे. शौर्य, पराक्रम, तेज, क्रोध, आवेश, अभिमान, युद्धनैपुण्य, राजवैभव, इत्यादि अनेक उदात्त गोष्टींचा हा दाता आहे. युद्धांतील विजय आणि राष्ट्रांचे उत्कर्ष हे या महात्म्याच्या कृपादृष्टी-पासून उत्पन्न होत असतात. सर्व लोकांचें स्वास्थ्य आणि राष्ट्रांचें स्वातंत्र्य हे मंगळाच्या अनुकूल स्थितीचे परिणाम आहेत. या कारणांमुळें आकाशामध्यें रात्रीं लक्षावधि तारे चमकत असले तरी त्यांपैकीं कोणाचीहि पर्वा न करितां मी आपली दृष्टि मंगळावर स्थिर करितों. हा आपला तारा, हा आपल्या देशाचा भाग्यदायक, हा आपल्या लोकांचें सुखनिधान, अशा मंगळाबद्दल माझ्या मनामध्यें अनेक भावना उत्पन्न होतात. व त्या योगानें त्याच्यावर माझें प्रेम बसतें, आणि माझ्या आशा त्याच्याकडे धांव घेतात. आकाशांत लक्षावधि तारे चमकत आहेत, परंतु मला त्यांतील एकहि नको. माझी सर्व श्रद्धा एकट्या मंगळावर आहे. तो तारा रात्रीं आकाशामध्यें पाहिला आणि रात्रीसारखी आपल्या हिंदुस्थानची स्थिति लक्षांत आली, म्हणजे तर माझें मन त्या मंगळाकडे विशेषच धांव घेतें. रात्रीच्या शांत-पणांत आणि एकांतपणांत अशा भावनेनें त्या तेजःपुंज मंगळाच्या ताऱ्याकडे एकसारखें पाहूं लागल्यानें तो तारा माझ्या जवळ जवळ येत आहे आणि मीहि त्या ताऱ्याच्या जवळ जवळ जात आहें, असा भास उत्पन्न होतो. व असल्या एकनिष्ठेच्या ध्यानांत आम्हां दोघांमध्यें कांहीं भाषा सुरू होते. मंगळाला आपल्या विलक्षण आकर्षणानें जरी कित्येक राष्ट्रीय शुभदायक परिणाम घडवून आणितां येत असले तरी त्याला बोलतां येत नाहीं किंवा बोललेलें ऐकतां येत नाहीं, या गोष्टी मी विसरून जातों; मला उपासकाला माझें उपास्य दैवत प्रत्यक्ष भेटत आहे अशी मनाची धारणा होते; आणि मी त्या आपल्या उपास्य मंगळाची प्रार्थना करूं लागतों. मी त्याला म्हणतों कीं, "हे मंगळा, तूं स्वतंत्रतेचा तारा आहेस. युद्धांतील विजयावर तुझा

अंमल चालतो. राष्ट्रीय दिग्विजयाचा उगम तुझ्यापासून आहे. एखाद्या देशानें सुसंपन्न, वैभवशाली आणि स्वातंत्र्ययुक्त असावें, या गोष्टी म्हणजे केवळ तुझ्या एका कृपाकटाक्षाचा खेळ आहे. तूं ज्या देशाकडे क्रोधानें पाहाशील, त्याचीं सैन्यें रणांगणांतून पळून जातील आणि त्याचीं गलबतें समुद्राच्या तळाशीं दडून बसतील. कोणत्या राष्ट्रानें अभ्युदयाला यावें आणि कोणत्या देशांतील लोकांच्या पायांत गुलामगिरीच्या शृंखळा पडाव्या या गोष्टी प्रथमतः तुझ्या दरबारमध्यें ठरतात; आणि राष्ट्राच्या उन्नतीचे किंवा अवनतीचे पहिले हुकूम तुझ्या मंडळापासून सुटतात; असें तुझ्यामध्यें सामर्थ्य आहे. म्हणून हे स्वतंत्रतेच्या ताऱ्या, तुझ्याजवळ माझी अशी प्रार्थना आहे कीं, तूं अतःपर आमच्या या दीन झालेल्या हिंदुस्थान देशाकडे वक्र दृष्टीनें पाहूं नको. तूं या देशावर रागावूं नको, किंवा येथील लोकांविषयीं क्रोधाविष्ट होऊं नको. हा देश तुझा आहे, व तूं या देशाचा आहेस. कारण, आमच्या या देशांतील ज्योतिःशास्त्रवेत्त्यांनींच प्रथम तुझें महत्त्व जाणलें व तें लोकांमध्यें प्रसिद्धीस आणलें. हजारो तारे आकाशांत रोज उगवत होते आणि मावळत होते. पण त्यांची कोणीहि दाद घेत नव्हते. अरण्यांतील फुलांप्रमाणें या आकाशांतील फुलांनीं दररोज संध्याकाळीं प्रफुल्लित व्हावें आणि सकाळीं कोमेजून जावें, परंतु त्यांचा वास घ्यावयाला कोणी नाहीं, अशी कित्येक काळपर्यंत तुमची उपेक्षा चाललेली होती. अशा स्थितींत आमच्या वेदकालीन ऋषींनीं प्रथमतः तुमची वास्तपुस्त घेण्याची सुरुवात केली. सारें जग तुमच्याकडे ढुंकूनसुद्धां पाहात नव्हतें, अशा वेळीं या हिंदुस्थानच्या ऋषींनीं तुमच्याकडे पाहिलें, तुम्हांला जाणिलें आणि तुमचें महत्त्व सर्व जगाला जाणवून दिलें. तुमचे पहिले गौरव आमच्या हिंदुस्थानच्या लोकांनीं केले आणि नंतर मग ॲसीरियन, इजिप्शन, ग्रीक, रोमन, मुसलमान, खिस्ती वगैरे लोकांमध्यें तुमचा सल्ला घेण्याची चाल पडली. सारांश तुमच्या महत्त्वाचा जन्म हिंदुस्थानांत झालेला असल्यामुळें हे स्वतंत्रतेच्या आणि पराक्रमाच्या ताऱ्या, हिंदुस्थान हें तुमचें माहेरघर आहे. ह्याच्यावर तुम्ही कधींच अवकृपा करावयाची नव्हती. परंतु दुर्दैवानें आज आठनऊशें वर्षांमध्यें एक दोन वेळां खेरीज करून ही गोष्ट

तुमच्या कधींच लक्षांत आली नाहीं. असो, झालें तें झालें. परंतु आतां तरी, हे मंगळा, तू ह्या हिंदुस्थान देशाशीं कृतघ्नपणाचें अमंगळ वर्तन करूं नको. तूं आपल्या भ्रमणाच्या नियमाप्रमाणें कोठेंहि फिरत असलास, तरी तुझी कृपादृष्टि या हिंदुस्थान देशावर सदोदित राहूं दे. हिंदुस्थानांत यापुढें जीं नवीन मुलें निपजतील, त्यांच्या जन्मकाळीं तूं फार सावधगिरी ठेव. हिंदुस्थानचे भावी नागरिक जन्मास येत असतांना तूं नेहमीं त्यांच्या शुभस्थानीं ऐस. ह्या हिंदुस्थानच्या भावी योद्ध्यांच्या जन्मकालीं तूं आकाश-मंडळांतील कुंडलीमध्यें अशीं स्थानें हस्तगत करून ठेव कीं, त्याच्या योगानें ते तेजस्वी, स्वदेशाभिमानी, पराक्रमी, परासहिष्णु, स्वतंत्रवर्ती, आणि वैभवशाली असे निपजतील. आमच्याकरितां तूं आपलें दशमस्थान दुसऱ्या कोणालाहि घेऊं देऊं नकोस. हे स्वतंत्रतेच्या ताऱ्या, ज्योतिःशास्त्रज्ञांना तुझें माहात्म्य कळलें आहे, त्याच्यापेक्षां तें कितीतरी जास्त असेल ! तेव्हां अशा आमच्या मानवी अज्ञानाच्या स्थितीमध्यें तूं अमक्याच स्थानांत ये, आणि अमक्यांत येऊं नको, असें नियमन करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. म्हणून तुला अशी विनंति आहे कीं, इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, रशिया, जपान, अमेरिका हीं राष्ट्रें अभ्युदयाला आलीं तेव्हां तूं ज्या स्थानांत होतास, त्याच स्थानांत तूं हिंदुस्थानाकरितां ये. सर्व लोक तुझा गौरव करितात, तसा आम्हीहि करूं. रोमन लोक फार पराक्रमी होते आणि त्यांनीं तुला आदिदैवत मानलें होतें. त्यांचा पहिला राजा जो रोम्युलस त्याचें जनकत्व त्यांनीं तुजकडे दिलें होतें. आणि त्यांच्या स्वतंत्रतेचें घर असें जें रोम शहर, त्या शहराची त्यांनीं तुला संरक्षक देवता केलें होतें. तसा तूं आमच्या देशाचा संरक्षक हो. रोमन लोकांकडून तूं जसे पराक्रम घडवून आणिलेस, तसे तूं आमच्या लोकांकडून घडवून आणीव. हे स्वतंत्रतेच्या ताऱ्या, तूं जें मनांत आणशील तें होईल. तुला अशक्य असें कांहीं एक नाहीं. म्हणून तुझी आम्ही प्रार्थना करितों कीं, तूं आमच्या देशाकडे कृपादृष्टीनें पाहा. आणि राष्ट्रीय उन्नतीच्या शिडीवर आमच्या लोकांना एकेक पायरी चढवीत लवकर वर ने. ” अशी मी मंगळाची दररोज प्रार्थना करितों व दुसरे दिवशीं तो क्षितिजावर आला, म्हणजे ‘ कालच्या माझ्या म्हणण्याचें काय झालें ? ’ असा प्रश्न मी त्याला विचारतों. या रोजच्या प्रार्थनेमुळें मंगळ

आतां अनुकूल होत चाललेला आहे, व आपण हिंदुस्थानांतील लोक जसजशीं पराक्रमाचीं कृत्यें करण्याची उमेद धरूं, त्याप्रमाणें तो आपल्याला अधिकाधिक अनुकूल होत जाईल, याबद्दल कोणालाहि शंका बाळगण्याचें कारण नाहीं. कारण, जसा मंगळाचा आपल्या कृत्यांच्या गतीवर परिणाम होतो, त्याचप्रमाणें आपल्या कृत्यांचाहि मंगळाच्या गतीवर परिणाम होतो !

---

## इमाम इस्माईल : : : : १४

काळ : अग्रलेख, ता. १७।११।१९०६

● कॉकेशस पर्वताचा सह्याद्रीला संदेश.

कॉकेशस पर्वताचें नांव पुष्कळांच्या ऐकण्यांत आलें असेल. परंतु त्या पर्वताचा पराक्रम फारच थोड्यांना माहीत असेल. काळा समुद्र आणि कॅस्पियन समुद्र यांच्या दरम्यान हा प्रसिद्ध पर्वत पसरलेला आहे. यानें एशिया खंडांतील इराण, अफगाणिस्तान, हिंदुस्थान वगैरे देशांवर पुष्कळ उपकार केलेले आहेत. या महात्म्यानें आपणा हिंदुस्थानांतील लोकांना परंपरेनें कसें ऋणी करून ठेविलें आहे, याच्याबद्दल आपल्याला कांहीं माहिती नसणें, म्हणजे एक प्रकारचा कृतघ्नपणा आहे. हें आपणा सर्वांना माहितच आहे कीं, युरोपियन लोक एशियाखंडाचे तुकडे तोडून खाण्याला पुष्कळ दिवसांपासून वखवखलेले आहेत; आणि त्या सगळ्यांत इंग्लिशांच्या खालोखाल रशियन लोकांचा प्रयत्न विशेष आहे. आपल्या देशाच्या दक्षिण भागांतून कॉकेशस पर्वत ओलांडून इराण देशावर हल्ला करावा व तेथून अफगाणिस्थानांतून हिंदुस्थानांत येऊन आपल्या वडिलार्जित हिंदुस्थानची इंग्लिशांपासून कांहीं, अगर जमल्यास सगळीहि, वांटणी घ्यावी, असा

रशियन लोकांचा पुष्कळ दिवसांपासून इरादा होता व आहेहि. हल्लीं रशियानें हिंदुस्थानांत येण्याकरितां बऱ्याच ठिकाणीं भिंतीला नवीन नवीन भोंकें पाडलीं आहेत. परंतु पन्नास पाउणशें वर्षांच्या पूर्वी रशियाचें लक्ष कॉकेशसच्या वाटेकडेच विशेष लागलेलें होतें. त्या वेळीं या कॉकेशस पर्वतानें इराणच्या उत्तर सरहद्दीवरून हिंदुस्थानची बाजू पुष्कळ संभाळली होती.

हिंदुस्थानचा रशियापासून त्या वेळीं बचाव झाला, म्हणून हिंदुस्थान सर्वस्वीं सुरक्षित होतें असें मात्र नाहीं. कॉकेशस पर्वत एका रशियन लोकांना हिंदुस्थानापासून दूर राखीत होता, तों इकडे दुसरे इंग्लिश लोक हिंदुस्थानांत शिरून त्यांनीं बहुतेक हिंदुस्थान आपल्या बगलेंत मारलेंच होतें ! कॉकेशस पर्वत तिकडे परकीय लोकांना प्रतिबंध करीत असतां इकडे इंग्लिश लोकांनीं हिंदुस्थानाला परतंत्र करून येथील सौख्य, सत्ता, संपत्ति, सौभाग्य आणि स्वतंत्रता यांचें बहुतेक हरण करून टाकलें होतें. कॉकेशस पर्वताप्रमाणें इतर पर्वतांनीं, नद्यांनीं आणि समुद्रांनीं जर टिकाव धरला असता, तर हिंदुस्थानचें संरक्षण अशक्य नव्हतें. परंतु आरबी समुद्र, मलबारचा किनारा, सह्याद्रीच्या खिंडी आणि सातपुड्याचीं शिखरें यांनीं आपली कामगिरी बरोबर न बजाविल्यामुळें हिंदुस्थानचा सुरक्षितपणा इंग्लिशांच्या युक्त्यांपुढें कायम टिकला नाहीं. पण नुसते पर्वत किंवा समुद्र कोणत्याहि देशाच्या स्वतंत्रतेचें संरक्षण करूं शकत नाहींत. समुद्रांच्या लाटांपेक्षांहि जुलुमाच्या तिटकाऱ्यानें जास्त खवळणारीं अंतःकरणें आणि त्या पर्वतांच्या दगडांपेक्षांहि जास्त दुर्भेद्य असे स्वतंत्रतेच्या प्राप्तीविषयींचे दृढनिश्चय हेच आपल्या देशावर येणाऱ्या परचक्रांचें निवारण करण्याला समर्थ असतात. नुसत्या मातीच्या किंवा पाण्याच्या समुच्चयामध्यें कांहींहि सामर्थ्य नसतें. त्याच्यामागें जीं माणसें असतात त्यांच्या करामतीवर सर्व कांहीं अवलंबून असतें. सह्याद्रीच्या खोऱ्यांतून जेव्हां तानाजी, सूर्याजी, येसाजी, बाजी, शिवाजी यांच्यासारखीं स्वदेशाच्या स्वतंत्रतेच्या जिवाला जीव देणारीं माणसें होतीं, त्या वेळेला औरंगजेबासारख्या साम्राज्याधिपतीच्या लाखोगणती सैन्यालाहि दाद न देतां स्वतंत्रतेनें सह्याद्रीच्या प्रत्येक शिखरावर आपलें देऊळ बांधलें होतें ! परंतु तीं माणसें तेथून नाहींशीं झाल्याबरोबर तेथें कठोरपणा जाऊन नम्रपणा आला, प्रतिबंध जाऊन आदरसत्कार

आला, पराक्रम जाऊन पराभव आला, आणि स्वतंत्रता जाऊन परतंत्रतेचा फेरा आला! सारांश शौर्य, धैर्य, पराक्रम, तेजस्विता, अपमानासहिष्णुता, दृढनिश्चय, उदात्त कल्पना, जुलुमाचा द्वेष, स्वराज्याची लालसा, स्वदेशाचा अभिमान, उत्कृष्ट देशभक्ति आणि स्वतंत्रतेच्या संपादनाची व संरक्षणाची अत्युत्कट उत्सुकता हे गुण मनुष्याचे आहेत. आणि अशा गुणांची माणसें आपल्या सह्याद्रीप्रमाणें थोडे दिवसांपूर्वी कॉकेशस पर्वतामध्यें राहात होतीं. आणि म्हणूनच त्या पर्वताला इतिहासामध्यें एक प्रकारचें विशेष महत्त्व आलेलें आहे.

लोकांच्या अंगच्या गुणांनीं पर्वतांना महत्त्व येतें. पण पर्वतांपासूनहि लोकांच्या अंगामध्यें कित्येक गुण उत्पन्न होत असतात. आणि तसे या कॉकेशस पर्वतामधील सरकेशियन लोकांमध्यें आलेले होते. नेहमीं डोंगर चढावयाचें, वाऱ्याच्या सोसाट्यांत फिरावयाचें, अरण्यांतील हिंस्र पशूंबरोबर झगडावयाचें, आणि सृष्टिजानित पदार्थांवर उपजीविका करावयाची, अशा स्थितीमध्यें कोणते सद्गुण मनुष्याच्या अंगामध्यें उत्पन्न होणार नाहींत! परंतु स्वतंत्रतेची प्रीति हा गुण सरकेशियन लोकांमध्यें विशेप होता. हे लोक पुरातन काळापासून त्या प्रांतामध्यें राहणारे आहेत. हे आपल्या लहान लहान टोळ्या करून डोंगरांतून, दरींतून आणि कधीं कधीं मैदानावरहि राहतात. तरी पण त्यांच्यामध्यें एकी फार आहे. कोणत्याहि कार्याकरितां एकत्र जमून सर्वांच्या विचारानें तें कार्य तडीस नेण्याचा गुण त्यांच्यामध्यें आहे. डोंगरांतील आपल्या लहानशा शेताची लागवड करावी, आपल्या जवळून वाहणाऱ्या लहानशा ओढ्याचें पाणी प्यावें, आणि आपल्या डोक्यावर जें लहानसें आकाश असेल, त्यांतील हवेचा आणि उजेडाचा उपभोग घ्यावा, अशा आनंदांत त्यांचे दिवस जात असत. ते आपल्यां डोंगरांमधून मोठ्या सुखानें राहत असत; कारण त्यांच्यावर कोणाचाहि जुलूम नसे. त्यांचें एक गांव म्हणजे एका कुटुंबासारखें असे; कारण त्यांच्यामध्यें गृहकलह पेटविणारे कोणीहि नव्हते. आणि ते अरण्यामध्यें असूनहि अतिशय सुखी असत; कारण, त्यांची स्वतंत्रता कायम होती. या लोकांना गाण्याचा आणि नाचण्याचा फार शोक असे. ईश्वर-निर्मित पशुपक्ष्यांप्रमाणें हे लोक त्या सर्व अरण्यभर जिकडे तिकडे नाचत

बागडत असत; आणि डोंगरांतील निरनिराळ्या ठिकाणीं बसून स्वतंत्रतेचीं मधुर गाणीं गात असत. त्या प्रदेशांत असा एकहि डोंगर नसेल कीं, ज्यानें हीं स्वतंत्रतेचीं उत्तेजनपर गाणीं पाठ करून प्रतिध्वनीच्या रूपानें फिरून म्हणून दाखविलीं नाहींत. त्या पर्वताचीं सर्व शिखरें आणि इतर रमणीय स्थळें स्वदेशाभिमानाच्या आणि स्वतंत्रतेच्या कवितांनीं सदोदित गजबजून गेलेलीं असत. या सरकेशियन लोकांत स्वतंत्रतेची प्रीति इतकी कांहीं बाणलेली होती कीं, स्वदेशाच्या स्वतंत्रतेसाठीं वाटेल तें करण्याला तयार होणें हा गुण ज्या वराच्या अंगामध्यें असेल तो वर जास्त उत्सुकतेनें पसंत करण्याची वहिवाट उपवर मुलींमध्यें पडून गेलेली होती. व याच मुली पुढें आया झाल्या म्हणजे त्या आपल्या दुधाबरोबरच आपल्या मुलांना स्वदेशभक्तीचें अमृत हळू हळू पाजीत असत. इतकी स्वतंत्रतेची प्रीति जरी या लोकांच्या मनामध्यें वास करीत होती, तरी त्यांच्यावरहि आपल्या हिंदुस्थानाप्रमाणें दुर्दैवाचा घाला येऊन पडला.

रशियन लोकांची राज्यविस्ताराची हाव फार विलक्षण आहे. नायट्याच्या वर्तुळाप्रमाणें रशियाचें राज्य हळूहळू पण जास्त जास्त वाढत चाललेलें होतें. कॉकेशस पर्वतामधील निरनिराळ्या जातींच्या लोकांना पादाक्रांत करून इराणमध्यें आपलें बोट शिरवावें अशी रशियाची महत्त्वाकांक्षा होती. त्यामुळें सरकेशियन लोकांच्या स्वतंत्रतेवर रशियाची गदा येऊन पडूं लागली. आज एक प्रांत गेला, उद्यां दुसरा प्रांत गेला, असें होतां होतां बहुतेक कॉकेशस पर्वताला रशियन लोकांचा वेढा पडला. रशियन लोकांचे मिशनरी आले, व्यापारी आले, शिपाई आले, असे एकापाठीमागून एक येऊन त्यांनीं सरकेशियन लोकांची स्वतंत्रता नाहींशी करून टाकली. रशियन बादशहाचीं मोठमोठीं सैन्यें कॉकेशस पर्वताच्या तळाशीं येऊन हल्ले करूं लागलीं. उन्हाळ्याच्या दिवसांत स्वारी करावी आणि बर्फ पडूं लागलें म्हणजे माघारें जावें, अशा डावपेचांनीं रशियानें कॉकेशसचा प्रांत काबीज करण्याची करामत सुरू केली.

आपल्या देशावर हें परतंत्रतेचें संकट येत असलेलें पाहून सरकेशियन लोक खडबडून जागे झाले. आपली स्वतंत्रता आपल्याला सोडून चालली असतां स्वस्थपणें बसणारे असे लोक कोठें तरी आढळतील काय ? स्वतंत्रता

गेली म्हणून माणसांचें काय जातें? त्यांना पहिल्यासारखें खातां येतें, पितां येतें, त्यांच्या डोळ्यांना पहिल्यासारखें दिसतें, त्यांचे हात पहिल्यासारखे काम करितात आणि त्यांचे पाय पहिल्यासारखे चालतात. तरी पण स्वतंत्रता गेलेली मनुष्यांना खपत नाहीं हें खरें. मग तिच्यामध्यें अशी काय जादू असेल ती असो! स्वतंत्रता गेली तर लोकांना अन्न नकोसें होतें, रमणीय वस्तु दृष्टीसमोर नकोशा होतात, मधुर आलापांवरील आसक्ति नाहींशी होते, गोड पदार्थहि कडू लागूं लागतात, आणि सूर्य उगवलेला असला तरी अंधःकार नाहींसा होत नाहीं. अशी विलक्षण स्थिति उत्पन्न करण्याचें सामर्थ्य ज्या स्वतंत्रतेमध्यें आहे, ती कॉकेशस पर्वतामधून जाऊं लागली, त्या वेळीं तिनें तेथील लोकांचीं अंतःकरणें पेटवून सोडलीं, यांत कांहीं मोठेंसें आश्चर्य नाहीं. स्वतंत्रता घडघडीत नाहींशी होत असतां कित्येक लोक स्वस्थ झोंपा घेत असतात, व आपल्याच हातानें तिला बाहेर घालवीत असतात, हें मात्र आश्चर्य आहे!

सरकेशियन लोक हे मूळचेच स्वतंत्रतादेवीच्या मंदिरांतील निस्सीम उपासक असल्यामुळें आपली सत्ता दुसऱ्यांच्या हातांत जावी, आपल्या घरांत चोरांनीं शिरावें, आपल्यावर कोठल्या तरी लोकांनीं येऊन राज्य करावें, कराच्या मिषानें लोकांनीं आपले पैसे लुटून न्यावे, कायद्याच्या नांवाखालीं दुसऱ्या देशांतील लोकांनीं आपल्यावर जुलूम करावे, दुसऱ्यांनीं आपल्याला लुटावें आणि आपण उपाशीं मरावें, आणि आपली स्वतंत्रता घालवून आपण दुसऱ्यांचे गुलाम बनावें, या गोष्टी त्यांना मुळींच रुचल्या नाहींत. ते लोक असें म्हणत असत कीं, शत्रूच्या स्वाधीन होण्यापेक्षां आम्ही आपल्या घरांदारांना आग लावून देऊं, आणि कॉकेशस पर्वताच्या उंच व अवघड अशा शिखरांवर जाऊन बसून आमच्यांतील शेवटचा मनुष्य जिवंत आहे तोंपर्यंत आम्ही आपल्या स्वतंत्रतेचें संरक्षण करूं. आपल्यांतील रजपूत लोकांप्रमाणें जे सरकेशियन लोक आपल्या स्वतंत्रतेच्या शत्रूंशीं जिवावर उदार होऊन लढले त्यांचे पोवाडे जितके गावे तितके थोडे आहेत. सरकेशियन लोकांमध्यें स्वदेशभक्तीचा आधींच संचार झालेला होता आणि त्यांतून या वेळीं त्यांच्यांतील कवी स्वतंत्रतेच्या कवितांनीं आणि आशाजनक आशीर्वादांनीं त्यांना जास्तच उत्तेजन देत होते. कॉकेशसपर्वतांतील कवींनीं

आपली कविता रशियन लोकांना विकली नव्हती. ते आपल्या स्वतंत्रतेशीं निमकहराम झालेले नव्हते. आपला देश परतंत्र करून दुसऱ्या देशाच्या राजाचे पोवाडे गाणाऱ्या दासीचें काम करण्याला आपली कविता लावावी इतके ते स्वदेशद्रोही आणि कृतघ्न झालेले नव्हते. ' हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम् । ' या आपल्या भगवद्गीतेंतील तत्त्वाप्रमाणेंच सरकेशियन कवी स्वतंत्रतेचीं गाणीं करून त्यांत आपल्या देशबांधवांना असा उपदेश करीत कीं, तुम्ही शत्रूंशीं लढाई करण्याकरितां चला. तुम्ही तरुण आहां, आणि तरुण लोकांना लढाई प्रियकर असते. जर तुम्ही मेलां, तर तुम्ही स्वदेशासाठीं धारातीर्थी देह ठेवणारे पवित्र महापुरुष म्हणून तुमची प्रख्याति होईल, आणि जर तुम्ही जिवंत राहिलां, तर स्वतंत्र झालेल्या देशांतील स्वातंत्र्याचा तुम्हांला स्वतंत्र रीतीनें अनुभव घ्यावयाला सांपडेल ! अशा प्रकारच्या वीररसोत्पादक उपदेशांनीं कोणाच्या अंगामध्यें वीरश्री उत्पन्न होणार नाहीं ? असा कांहीं प्रसंग आला म्हणजे ते लोक एकत्र जमा होत व ज्यांच्या अंगामध्यें शस्त्र धरण्याची ताकद आहे असे सर्वजण शत्रूवर तुटून पडण्यासाठीं पुढें सरसावत, व कोणी तरी पुढारी नेमून आणि शत्रूंवर कसा छापा घालावयाचा हें ठरवून सर्वजण आपापल्या कामाला लागत. यांच्या पलटणी लढावयाला निघाल्या म्हणजे त्यांचीं निशाणें पुढें फडकत असत, व मागून सर्व लोक चालत असत. ते फार जलद कूच करीत असत. आणिं आपल्याबरोबर खाण्यापिण्याच्या जिनसांचें ते बिलकूल ओझें बाळगीत नसत. ते बहुतकरून रात्रीच्या मोठमोठ्या मजला मारून जात असत आणि पहाटेस शत्रूला गांठून त्याचा विध्वंस करीत असत. ते इतक्या गुप्तपणानें शत्रूच्या छावणीजवळ जात असत कीं, ते आल्याचें शत्रूला कधींसुद्धां कळत नसे. याप्रमाणें त्यांच्या अंगामध्यें लढण्याचें पुष्कळ कौशल्य होतें. व त्यांतच वर दिलेल्या प्रकारच्या देशभक्तिजनक कवितांनीं त्यांची स्वातंत्र्यप्रीति विशेष जागृत झाली होती.

तरीपण त्यांच्यामध्यें कित्येक बाबतींत तंटे होते. आणि त्यामुळें रशियन लोकांपुढें त्यांचा टिकाव निघेना. अशा प्रसंगीं त्यांची स्वतंत्रता कायम राखण्याकरितां जसा मनुष्य पाहिजे होता तसा परमेश्वरानें त्यांना एक पाठवून दिला. त्याचें नांव इमाम इस्माईल हें होय. सरकेशियामधील हिमरी या

नांवाच्या एका खेडेगांवांत इसवी सन १७९७ मध्यें याचा जन्म झाला. लहानपणापासूनच याचा स्वभाव मोठा मानी असे, आणि त्याला स्वतंत्रतेची फार आवड असे. त्याच्या बरोबरीचीं लहान मुलें भलभलते निरुपयोगी खेळ खेळत असत, पण त्यांच्यांत कधींहि न मिसळतां हा कुराण वाचीत बसे. त्याची शरीरप्रकृति फारशी सुदृढ होती असें नाहीं, तरीपण त्याला सर्व प्रकारचे श्रम सहन करण्याची संवय होती. व धैर्य जास्त वाढविण्यासाठीं तो मुद्दाम आपल्याला धोक्यांमध्यें आणि संकटांमध्यें घालून घेत असे. त्याची धर्मांकडे विशेष प्रवृत्ति असून त्या धर्माच्या जोरावर आपण स्वदेशाच्या स्वतंत्रतेचें संरक्षण करूं, अशी त्याला खात्री वाटत होती. या वेळीं काशिमुल्ला या नांवाचा एक मनुष्य सरकेशियन लोकांचा पुढारी होता. यानें आपल्या देशांतील मुसलमान लोकांमध्यें धर्माचें एक नवीन तत्त्व उत्पन्न करून त्या तत्त्वाच्या जोरावर सर्वांना एक केलें होतें. व त्यानें लोकांमध्यें एक प्रकारचा शौर्याचा व सामर्थ्याचा संचार उत्पन्न केला होता. तसेंच काशिमुल्लानें आपल्या भोंवतीं कित्येक अनुयायी जमा केले होते. त्यांना तो मुरीद असें म्हणत असे. आणि इमाम इस्माईल हा त्यांपैकींच एक होता. एके वेळीं काशिमुल्ला हा ज्या किल्ल्यांत होता, त्या किल्ल्याभोंवतीं रशियन लोकांचा सेनापति ज. रोझन यानें पंचवीस दिवसपर्यंत वेढा कायम ठेविला. तेव्हां सरकेशियन लोक अगदीं जेरीस आले. काशिमुल्ला त्यांना लढण्याविषयीं उत्तेजन देत होता. परंतु त्या लोकांना मरण्याशिवाय दुसरा मार्गच शिल्लक उरलेला नव्हता. काशिमुल्लाच्या अंगाला जखमा लागल्या होत्या व त्याच्या अंगांतून रक्ताचे ओघळ वाहत होते. तरी अशा स्थितींत तो गुडघे टेकून परमेश्वराची प्रार्थना करीत होता व हातांत तरवार धरून तो त्यांना उत्तेजन देत होता. त्या प्रसंगीं काशिमुल्ला व त्याचे सर्व मुरीद मरण पावले. त्यांतच इस्माईल यास दोन-तीन जखमा झाल्या होत्या. व तोहि मेलाच असावा, अशी सर्वांची समज होती. परंतु त्यांतून तो कसा जगला व त्या किल्ल्यांतून त्यानें आपली सुटका कशी करून घेतली, हें फक्त एका परमेश्वरालाच माहीत ! अशाच तऱ्हेनें त्याची फिरून आणखी एकदां विलक्षण रीतीनें सुटका झाली. आणि तेव्हांपासून त्याच्यावर परमेश्वराची निखालस कांहीं तरी कृपादृष्टि असली पाहिजे अस

लोकांचा समज झाला, व याच्यापासूनच आपला देश उद्धरेल अशी सर्व लोकांची त्याच्यावर श्रद्धा बसली. याप्रमाणें लोक त्याला अनुकूल झाले. व इस्माईलचेहि पराक्रम दिवसेंदिवस वृद्धिंगत होऊं लागले. तेव्हां त्याचें पारिपत्य करणें जरूर आहे असें वाटून रशियाच्या झारनें ज. ग्रॅब या सेनापतीला त्यांजवर पाठविलें. ज. ग्रॅब यांनीं येऊन इस्माईल ज्या किल्ल्यांत होता त्या किल्ल्याला वेढा दिला. वेढ्याचें काम चार महिने चाललें होतें, तरी इस्माईलनें दाद दिली नाहीं. रशियन लोकांचें पंधराशें सैन्य होतें तें मरून सुमारें शंभर राहिलें. तरी जनरल ग्रॅब यांनीं नेट धरलाच होता. त्यामुळें तो किल्ला अखेरीस रशियन लोकांच्या हस्तगत झाला. किल्ल्यांत घुसल्यानंतर म्हातारे, बायका, मुलें वगैरे सर्वांची कत्तल करण्यांत आली. व किल्ल्यावर आतां एकहि मनुष्य जिवंत राहिला नाहीं अशी खात्री झाल्यानंतर रशियन लोक त्या प्रेतांच्या राशीमध्यें इस्माईलचें प्रेत शोधूं लागले. परंतु तें त्यांना कोठेंहि सांपडेना. कॉकेशस पर्वताची स्वतंत्रता कायम राखण्याकरितां परमेश्वरानें इस्माईलला या जगांत पाठविलें होतें. त्यानें प्रेतांच्या राशींतून रशियन लोकांच्या हातीं प्रेत होऊन सांपडावें असा परमेश्वराचा इरादा नव्हता. तो रशियन लोकांच्या हातावर तुरी देऊन केव्हांच निघून गेला होता! किल्ल्याच्या डोंगरावर एक बाजूला एक गुहा होती. त्या गुहेंत आपल्या अनुयायांसह इस्माईल आधींच जाऊन बसलेला होता. परंतु त्या गुहेंत बसलेल्या लोकांना रशियन लोकांची नजर चुकवून निसटून जाणें फार कठीण होतें. परंतु इस्माईलचे अनुयायी त्याच्यासाठीं वाटेल तें करण्याला तयार होते. त्यांनीं झाडांचे बुंधे व कित्येक फळ्या एकावर एक बांधून एक मोठा तराफा तयार केला, व त्या गुहेच्या खालून जी नदी वाहात होती, त्या नदींत तो सोडून त्याजवर बसून इस्माईलचे अनुयायी निघाले. ते पाहिल्याबरोबर रशियन लोकांनीं गोंगाट केला व ‘तो पहा इस्माईल पळून चालला आहे’ असें ओरडूं लागले, व रशियन लोकांनीं तो तराफा पकडून त्याजवरील प्रत्येक मनुष्याची कत्तल केली. तेव्हां आतां आपण इस्माईलला मारलें, याबद्दल त्यांना शंकाच उरली नाहीं. पण इस्माईल परमेश्वराच्या कृपेनें सुरक्षित होता. रशियन लोक या तराफ्याच्या मागें लागले असतां आपल्याकडे कोणाचेंहि लक्ष नाहीं असें

पाहून कोणी एका मनुष्यानें गुहेंतून नदींत उडी टाकली, आणि त्या नदींतून पोहून पलीकडच्या कांठावरील जंगलात तो नाहींसा झाला. तो कोण होता हें सांगण्याची आवश्यकता नाहीं. अशा रीतीनें या किल्ल्यांत इस्माईलचा जरी एकंदरींत पराभव झाला, तरी त्याच्या आश्चर्यकारक कर्तबगारीमुळें लोकांत त्याचें वजन जास्तच वाढलें.

याप्रमाणें इस्माईलची सुटका झाल्यानंतर तेथून तो डार्गो या नांवाच्या एका अतिशय अवघड किल्ल्यामध्यें जाऊन राहिला. त्या किल्याच्या भोंवतीं मोठमोठीं अरण्यें होतीं व किल्ल्यावर जाण्याची वाट अतिशय बिकट होती. त्या ठिकाणीं इस्माईल आपलें सैन्य गोळा करून घेऊन राहिला असतां ज. ग्रॅब यानें त्या किल्ल्याच्या पायथ्याशीं आपलें सैन्य आणिलें. त्यांच्यावर कोणींहि गोळीबार करूं नये अशी इस्माईलनें आपल्य लोकांना सक्त ताकीद दिली होती. त्यामुळें रशियन सैन्य निर्भयपणानें बरेंच पुढें चालून आलें. आणि तें सैन्य जेव्हां पूर्णपणें आपल्या माऱ्यांत आलें तेव्हां आपले सगळे शिपाई घेऊन इस्माईल किल्ल्यावरून खालीं उतरला व रशियन सैन्याला चोहोंकडून वेढून त्यानें त्यांतील बहुतेकांची कत्तल उडविली. पुढें एकदां खुद्द इस्माईलवरच असा प्रसंग आला. रशियाच्या दोन सैन्यांनीं त्याला दोन्ही बाजूंनीं अडविलें. परंतु त्या वेळींहि शत्रूच्या हातीं न सांपडतां रशियन सैन्याची फळी फोडून तो अचानक रीतीनें निघून गेला.

अशा रीतीनें अनेक लढायांमध्यें शत्रूंवर छापे घालून आणि शत्रूंच्या हातून मोठ्या शिताफीनें निसटून जाऊन त्यानें आपल्या देशाची पुष्कळ कामगिरी बजाविली. अखेरीस गुनीब या नांवाच्या किल्ल्यांत निरुपाय होऊन त्याला शत्रूच्या स्वाधीन व्हावें लागलें. रशियन लोकांनीं त्याला कैद करून सेंट पीटर्सबर्ग येथें पाठविलें. तेथून तो मक्केला जात असतां वाटेंत मरण पावला. अशा प्रकारचें या पराक्रमी आणि स्वदेशाभिमानी पुरुषाचें विलक्षण चरित्र आहे.

स्वतंत्रतेची प्रीति हा एक अलौकिक गुण आहे. हा गुण कॉकेशस पर्वतांतील लोकांच्या अंगामध्यें होता, म्हणूनच त्यांच्यामध्यें इस्माईलसारखा स्वदेशाभिमानी योद्धा निर्माण झाला. सर्व जमीन तयार होते तेव्हां त्यामध्यें एखादें झाड चांगलें भरभराटीस येतें. इस्माईल आणि त्याचे अनुयायी

सरकेशियन लोक यांनीं आपल्या उदात्त आणि अद्भुत चारित्रानें कॉकेशस पर्वताला सर्व पर्वतांमध्यें अतिशय पवित्र करून ठेविलें आहे. स्वतंत्रतेनें त्या पर्वतावर आपलें देऊळ उभारलें आहे. स्वतंत्रतेसाठीं लढणाऱ्या लोकांच्या रक्तांनीं तेथील दगड भिजलेले आहेत. स्वतंत्र लोकांच्या स्वतंत्र विचारांच्या श्वासोच्छ्वासानें तेथील वातावरणांतील परमाणु सुगंधित झालेले आहेत. स्वातंत्र्याच्या लढाईमध्यें आपल्या इष्टमित्रांचे देह सार्थकीं लागले म्हणून गळणाऱ्या आनंदाश्रूंच्या मिश्रणानें तेथील स्वच्छ झऱ्यांचें पाणी सूर्याच्या तापामध्येंहि आटल्यावांचून कायम राहिलें आहे. गुलामगिरीच्या खंडनाच्या कामीं झिजलेल्या तरवारींचीं बोथट झालेलीं पातीं स्वातंत्र्य-सुखाच्या परमावधीच्या गोष्टी मुकाट्यानें बोलत आहेत. बंदुकीच्या गोळ्यांनीं झाडांना पडलेलीं भोकें पतन पावलेल्या योद्धयांची आठवण करून देत आहेत. आणि मागील स्वतंत्रतेचीं गाणीं पुढील पराक्रमांना उत्तेजन देत आहेत. असें जें स्वतंत्रतेचें पुण्यक्षेत्र कॉकेशस पर्वत त्या कॉकेशस पर्वता-वरील पुण्यकारक वायूचा एक कण जरी श्वासोच्छ्वासाच्या द्वारानें जगांतील गुलामांच्या शरीरामध्यें प्रवेश करील, तर त्याच्यापासूनहि स्वतंत्रतेचीं विलक्षण कार्यें घडून येतील. अशा या स्वतंत्रतेकरितां लढणाऱ्या शूर शिपायांच्या पवित्र पादस्पर्शानें पवित्रतर झालेल्या कॉकेशस पर्वतावरील मृत्तिकेचा एक कण जर गुलामगिरींत उत्पन्न होणाऱ्या एखाद्या शरीराची माती कुंभकार ब्रह्मदेव मळीत असतां तिच्यांत येऊन मिसळला तर तो कण गुलामगिरीचीं शतशः कारागृहें फोडून स्वतंत्रतेच्या स्वच्छ वातावरणामध्यें येऊन मिसळल्यावांचून कधींहि राहणार नाहीं. आणि त्या कॉकेशस पर्वतावर स्वदेशाच्या स्वतंत्रतेसाठीं मरणाऱ्या मनुष्यांचें रक्त ज्या पाण्यामध्यें मिसळलें आहे, त्या पाण्याचा एक बिंदु जर एखाद्या गुलामाच्या रक्ताशीं संमिश्र होईल, तर तें त्यांचें रक्त गुलामगिरीच्या बंधनाविरुद्ध खवळल्यावांचून कधींहि राहावयाचें नाहीं !

---

# दासबोध : : : : १५

काळ : अग्रलेख, ता. २-२-१९०६

आज या विषयासंबंधानें लिहिण्याचें कारण देशबंधु शंकर श्रीकृष्ण देव बी. ए., एल्‌एल्. बी., वकील, धुळें यांनीं प्रसिद्ध केलेल्या दासबोधाचें नवीन पुस्तक हें होय. आजपर्यंत दासबोधाचीं पुस्तकें नव्हतीं असें नाहीं. पुस्तकें पुष्कळ होतीं व त्यांचीं पारायणेंहि पुष्कळ झालेलीं आहेत. परंतु दे. देव यांच्या पुस्तकामध्यें खरोखरच पुष्कळ नवीनपणा आहे. शुद्ध पुस्तक ही एक प्रकारची महत्त्वाची आवश्यकता आहे. आणि आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या रामदासी पोथ्यांमधून शुद्ध पाठ कोणते आहेत हें शोधून काढण्याविषयीं कोणीं फारसें लक्ष न दिल्यामुळें स्वाभाविकपणेंच पुष्कळ चुकीचीं पाठांतरें ग्रंथांत समाविष्ट झालीं होतीं. हीं अशुद्ध पाठांतरें हद्दपार करण्याच्या कामाकडे दे. शंकरराव देव यांचें लक्ष गेलें ही मोठी आनंदाची गोष्ट आहे. रामदासस्वामींचे पट्टशिष्यकल्याणमहाराज, यांचा डोमगांवीं जो मठ आहे त्या मठांत श्रीसमर्थांनीं कल्याण महाराजांकरवीं लिहविलेली व स्वतः ठिकठिकाणीं शोध घातलेली एक अस्सल पोथी आहे. या पोथीवरून दे. शंकरराव देव यांनीं आपली हल्लींची प्रत तयार केली आहे, इतकें सांगितल्यानंतर त्यांतील शुद्ध पाठांच्या योग्यतेबद्दल निराळी तारीफ करण्याचें कारण नाहीं. कल्याणस्वामीसारख्या लेखकांनीं लिहून जी खुद्द श्रीरामदासांनीं तपासली, त्या पोथींत अशुद्धाला वाव कोठून मिळणार ? सारांश, हल्लीं देवांनीं प्रकाशित केलेला दासबोधाचा ग्रंथ हा रामदासस्वामींचा अस्सल आणि शुद्ध ग्रंथ होय असें म्हणण्यास हरकत नाहीं.

एका रत्नाकरितां खाण खणीत असतां दुसरीं अनेक रत्नें मिळतात, आणि एका तीर्थाला जात असतां वाटेंत दुसऱ्याहि अनेक तीर्थांचें दर्शन

होतें. तद्वत् दे. शंकरराव देव हे दासबोधाच्या प्राचीन पुस्तकाकरितां शोध करीत असतां त्यांना रामदासी पंथाचीं दुसरींहि अनेक अप्रकाशित प्रकरणें आणि कागदपत्रें सांपडलीं आहेत. श्रीसमर्थांचीं अप्रकाशित प्रकरणें इतकीं सांपडलीं आहेत कीं, शंकररावजींच्या अदमासाप्रमाणें नुसते त्यांचेच पांचसहाशें पानांचे दोन भाग होतील. भक्तिरहस्य व सुगमोपाय हे श्रेष्ठानीं केलेले दोन ग्रंथ उपलब्ध झाले आहेत. व कल्याणस्वामींचीहि कांहीं कविता मिळाली आहे. हीं सर्व अप्रकाशित प्रकरणें व पूर्वींचीं अप्रकाशित प्रकरणें निराळ्या सहा सात भागांमध्यें प्रसिद्ध करण्याचा शंकररावजींचा हेतु आहे. आजपर्यंत खाणींतील रत्नांप्रमाणें उजेडांत न आलेले ग्रंथ मर्मज्ञ लोकांपुढें आणून दे. शंकरराव देव हे मराठी वाङ्मयाचें भांडागार जास्त मौल्यवान करीत आहेत, याबद्दल त्यांचे जितके आभार मानावे तितके थोडे आहेत. हा त्यांचा स्तुत्य हेतु परमेश्वर शेवटास नेवो, अशी इच्छा प्रकट करून आम्ही मुख्य विषयाकडे वळतों.

दासबोध हें नांव समर्थांनीं आपल्या ग्रंथाला कोणत्या हेतूनें ठेविलें असेल तें असो. शंकररावजी देव यांनीं शोधकबुद्धीनें लिहून या ग्रंथाला जोडलेल्या उपोद्घातामध्यें या प्रश्नाचा ऊहापोह केलेला नाहीं. दास म्हणजे रामदास त्यांनीं लोकांना केलेला बोध ज्या ग्रंथामध्यें ग्रथित आहे, तो दासबोध होय, असा सरळ अर्थ प्राप्त होतो. अथवा याच्याशिवाय दुसरीहि कांहीं निराळ्या अर्थाची कोटी सांप्रदायिक लोक बसवूं शकतील. यांपैकीं रामदासांनीं केलेले बोध हाच अर्थ खरा आणि सरळ आहे. परंतु दासबोधामध्यें जीं कित्येक प्रकरणें आहेत, त्यांना अनुलक्षून, "दास म्हणजे गुलाम झालेले जे लोक, त्यांना केलेला बोध" असा क्षणभर अर्थ केल्यास तो अगदींच गैरवाजवी होईल असें नाहीं. कारण, गुलाम झालेल्या लोकांनीं आपल्या गुलामगिरीच्या पाशांतून कसें मोकळें व्हावें याविषयींचा बोध खरोखरच या ग्रंथांत सांगितलेला आहे. या दासबोधाच्या आंत दुसरा एक दासबोध आहे. या सामान्य दासबोधाच्या अंतर्गत असा एक विशेष दासबोध आहे. या मोठ्या दासबोधांत एक लहान दासबोध आहे. रामदासांनीं केलेल्या बोधांत दुसऱ्यांचे दास होऊन बसलेल्या लोकांनींहि बोध घेण्यासारखा कांहीं भाग आहे. दासबोधांत सगळ्याच विषयांचें विवेचन आहे. त्यांत रामदासांनीं वेदांतां-

चेंहि बरेंच निरूपण केलें आहे. परंतु आपल्यांत वेदांत आधींच पुष्कळ झाला आहे. तेव्हां ही दृग्गोचर होणारी सृष्टि ब्रह्माचा सत्य परिणाम आहे, किंवा रज्जूवर सर्प आणि शुक्तीवर रजत भासतें तद्वत् ही सगळी विवर्ताची फसवेगिरी आहे. याच्याबद्दलची कधींहि न संपणारी काथ्याकूट करीत न बसतां आपण ज्या हल्लींच्या त्रिविध—नव्हे, शतविध—तापांमध्यें दुसऱ्यांचे दास होऊन पडलों आहों, त्या तापांपासून आपली मुक्तता होण्याकरितां कांहीं बोध मिळेल तर पाहावा, अशा इच्छेनें आपण या ग्रंथाच्या परीक्षणाकडे वळणें हेंच समयोचित होणार आहे. दे. देव यांनीं प्रसिद्ध केलेला दासबोध जुनाच आहे. परंतु त्यांनीं त्याला जोडलेली प्रस्तावना अगदीं नवीन तऱ्हेची आहे. त्यांनीं समर्थांचें चरित्र आपल्या प्रस्तावनेंत खुद्द समर्थांकडून बोलविलें आहे. आणि त्यामुळें इतरांनीं लिहिलेल्या सांगोपांग चरित्रापेक्षां या चरित्राला विशेष प्रकारची यथार्थता आलेली आहे. समर्थांच्या ग्रंथांतून वचनें काढून त्यांच्याच शब्दांनीं त्यांचीं चरित्रकृत्यें आणि मतें ओघानें जुळवून आणण्यांत दे. शंकरराव देव यांनीं फारच मार्मिकपणा दाखविला आहे. या रामदासांच्या तोंडून वदविलेल्या त्यांच्या चरित्रापासून दास झालेल्या लोकांनीं बोध घेण्यासारख्या बहुत गोष्टी आहेत. या गोष्टी आजपर्यंत दासबोधामध्यें कोठेंतरी इतस्ततः संकीर्ण होऊन पडलेल्या होत्या. वाळवंटांत अस्ताव्यस्त रीतीनें सोन्याचेहि कण पडलेले असले तरी ते फारसे आल्हादकारक होत नाहींत. पण तेच एकत्र करून एखाद्या कुशल सुवर्णकारानें त्यांचें एखादें सुंदर आभरण बनविलें, तर त्याची आपण जी वाखाणणी करितों, तीच दे. शंकरराव देव यांची केली पाहिजे. दे. देव यांनीं आपल्या उपोद्घाताचे जे तीन चार विभाग केलेले आहेत त्यांपैकीं पहिल्या विभागांत समर्थांचें चरित्र देतांना दास झालेल्या लोकांना बोध घेतां येईल अशा प्रकारच्या दासबोधाच्या सुवर्णकणांचें एकीकरण करून त्यांनीं जो सुवर्णमय दागिना तयार केला आहे, तो प्रत्येकानें आपल्या हृदयीं बाळगण्याजोगा आहे. अशा त्या दासबोधांतील रहस्य काय आहे, हें आपण पाहूं.

जे रामाचे दास झाले ते दुसऱ्या कोणाचेहि दास होऊं शकत नाहींत. कोणाहि जुलमी राजाचा त्यांच्यावर अंमल चालत नाहीं. दुसऱ्यांना गुलाम

बनविणारे राजे त्यांच्यापुढें गुलाम होतात. अशा योग्यतेचे जे रामदास, जे पृथ्वीवर असूनहि स्वर्गातील सुखाचा अनुभव घेत होते, आणि जे संसार-सागरांत सांपडल्यासारखे दिसत असूनहि वस्तुतः जीवनमुक्त होते, त्यांना स्वतःला दासपणाचें दुःख स्पर्शीहि करूं शकणार नाहीं, हें उघडच आहे. पण ते दुसऱ्याकरितां जन्मास आले होते व जिवंत राहिले होते. म्हणून त्यांना दासबोध करणें भाग पडलें. ते स्वतंत्र होते. परंतु हिंदुस्थानांतील लोक त्या वेळीं परतंत्र झालेले होते. ते राजांचे राजे होते. परंतु हिंदुस्थानां-तील लोकांचें राज्य यवनांनीं हिरावून नेलें होतें. त्यांच्या भिक्षेच्या झोळींत राज्यें लोळत पडलेलीं होतीं, पण हिंदुस्थानांतील लोकांच्या हातांतील राज्यें जाऊन त्यांच्या गळ्यांत भिक्षेच्या झोळ्या पडल्या होत्या ! अशा वेळीं आप्पलपोटेपणानें आपल्या एकट्याच्याच जीवाची मुक्तता करून घेऊन या जगांतून पळून जाण्याच्या ऐवजीं रामांनीं आपल्याबरोबर सर्व अयोध्या उद्धरिली, त्याप्रमाणें त्यांच्या दासांनींहि सर्व हिंदुस्थान मुसलमान लोकांच्या गुलामगिरीपासून उद्धरून सोडण्याचा निश्चय केला. "खनाळामध्यें जाऊन राहे। तेथें कोणीच न पाहे। सर्वत्रांची चिंता वाहे। सर्वकाळ ॥" या ओवींत सांगितल्याप्रमाणें जेथें आपल्याला कोणी पाहत नाहीं, अशा डोंगराच्या निवांत आणि निर्जन खनाळामध्यें जाऊन समर्थ सदा सर्वकाळ हिंदुस्थानां-तील आपल्या सर्व देशबांधवांची चिंता वाहात होते. हे लोक स्वतंत्र कसे होतील, परकीय लोकांचें येथील राज्य कसें लयाला जाईल, आणि स्वधर्माची व स्वराज्याची गादी स्वदेशामध्यें कशी संस्थापित होईल, ही विवंचना रामदासांना रात्रंदिवस लागलेली होती. जाणत्या माणसांनीं चिंताग्रस्त होऊन बसण्यासारखीच ती वेळ होती. उदंड दुर्जन अशा म्लेच्छांचें बहुता दिवसांचें बंड जिकडे तिकडे माजून राहिलें होतें. म्लेंच्छांनीं राज्य हरण केलें, अयोग्य माणसांनीं गुरुत्व हरण केलें, आणि आपल्यापाशीं कांहींच उरलेलें नव्हतें ! "अरत्रीं ना परत्रीं" अशी आपली स्थिति होऊन गेली होती. हल्लींच्या-प्रमाणेंच त्या वेळींहि निरनिराळ्या मतांचा गलबला माजून जाऊन कोणी कोणाला पुसेनासें झालें होतें. फार काय, देवांचीसुद्धां मनुष्यासारखीच दुर्दशा उडून गेली होती. कोणा देवांचीं शरीरें जखमीं आणि छिन्नविच्छिन्न झालीं होतीं, कोणी देव पाण्यांत फेंकले गेले होते, आणि कोणी पायाखालीं तुडविले

जात होते, ही स्वधर्माची आणि स्वदेशाची भयंकर स्थिति पाहून समर्थांना चैन पडेनासें झालें व त्यांनीं परमार्थाकडून क्षणभर आपली दृष्टि काढून ती राजकारणामध्यें घातली.

साधुसंतांचें, लोकांना मार्ग दाखविणारांचें, व लोकांना उपदेश करणारांचें काम हातांत तरवार घेऊन शत्रूला जिंकावयाचें नसतें. भारती युद्धामध्यें कृष्णानें फक्त भगवद्गीता सांगितली. त्यानें आपल्या हातांत कधीं शस्त्र धरलें नाहीं. उलट मी शस्त्र धरणार नाहीं अशी प्रतिज्ञा करून कृष्णानें पांडवांचा पक्ष स्वीकारिला होता. कृष्णानें आपल्याकडे फक्त सूत्रचालकपणा ठेविला होता. पण अर्जुनाच्या रथावर बसून कृष्ण फक्त अर्जुनाच्या घोड्यांचीं सूत्रें चाळवीत नसून तो सर्व भारती युद्धांतील कारस्थानांचीं सूत्रें चाळवीत होता. अशा लोकानीं शस्त्रच कशाला धरावयाला पाहिजे आहे ? शस्त्रांतच काय जास्त आहे ? भगवंताची भगवद्गीता हें सगळ्या शस्त्रांचें शस्त्र आहे. कुरुक्षेत्रांत जमा झालेल्या भारतीय योद्धयांच्या हातांत असलेलीं सर्व शस्त्रें लुलीं पडलीं होतीं. तीं असून नसून सारखीं झालीं होतीं. त्या सगळ्या शस्त्रांच्या धारा फिरून तीक्ष्ण कोणीं केल्या ? भगवद्गीतेनें ! आणि अशीच स्थिति रामदासांच्या वेळीं हिंदुस्थानांत झालेली होती. हिंदुस्थानांतहि त्यावेळीं हत्यारें होतीं. बंदुका होत्या. तरवारी होत्या. इंग्रजांप्रमाणें मोगलांनीं त्या युक्तीनें काढून घेतल्या नव्हत्या. पण नुसत्या बंदुका आणि तरवारी असून त्या काय कामाच्या होत्या ? उत्तेजित अंतःकरणांच्या शूर हातांवांचून बंदुका आणि तरवारी हें निवळ लोखंड होय. आणि खाणीमध्यें काय थोडें लोखंड असतें ! तें कोणाला मारीत नाहीं ! " हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम् । " " म्लेंच्छ दुर्जन उदंड । बहुतां दिवसांचें माजलें बंड । या कारणें अखंड । सावधान असावें ।। " " धर्मासाठीं मरावें । मरोनि अवघ्यांस मारावें । मारता मारतां घ्यावें । राज्य आपुलें ।। " असलीं अवतारी पुरुषांचीं प्रासादिक वचनें गांडीव धनुष्यामध्यें गांडीवपणा आणितात, तरवारीला तीक्ष्ण करतात, आणि बंदुकीला बत्ती देतात. रामदासांनींहि त्यावेळीं हेंच केलें. आणि केव्हांहि झालें तरी असेंच करावें लागतें. निखाऱ्यावर ज्याप्रमाणें राख धरते, त्याप्रमाणें प्रत्येक राष्ट्रांतील लोकांच्या मनावर काल-

गतीनें एक प्रकारचें अज्ञानपटल येत असतें. तें दूर करण्याला ज्ञानवंत साधू लागत असतात. त्यांनीं तें दूर केलें म्हणजे राष्ट्रांतील लोक पाहिजे तें करण्याला तयार होतात. राख फुंकून टाकली म्हणजे तिच्या खालीं लाल आणि झळझळीत असा निखारा पाहिजे त्याला भाजून काढण्याकरितां तयार असतोच ! रामदासस्वामींनीं फक्त ही राख फुंकून टाकली. आणि त्याबरोबर सर्व हिंदु राष्ट्र तयार झालें. परंतु त्या वेळीं हें निखाऱ्यावरील राख फुंकण्याचें काम फारसें सोपें नव्हतें. हल्लींच्याप्रमाणें पूर्वी मोगल बादशहांनीं भाषण-स्वातंत्र्य आणि मुद्रणस्वातंत्र्य यांचे हक्क लोकांना दिलेले नव्हते. त्यामुळें लोकांना उपदेश करण्याचें कामहि कांहीं तरी पांघरुणाखालींच करावें लागत होतें. आणि असल्या कामाला धर्मासारखें उत्तम पांघरूण कोणतेंहि नाहीं, हें मिशनरी लोकांच्या उदाहरणावरून चांगलें सिद्ध होत आहे. रामदासांनीं याच मार्गाचें अवलंबन केलें, व पांघरुणाची पद्धत स्वीकारली. राजकारणाला परमार्थनिरूपणाचें पांघरूण घातलें, लहान दासबोधाला मोठ्या दासबोधाचें पांघरूण घातलें, आणि आपल्या त्या वेळच्या राजकीय गुप्त मंडळ्यांना धार्मिक मठांचें पांघरूण घातलें. या पांघरुणाखालीं महाराष्ट्रामध्यें काय गौडबंगाल चाललें आहे, याची कल्पना दिल्लीच्या किल्ल्यांतील जनान-खान्यांत मजा मारणाऱ्या बादशहांच्या लक्षांत आली नाहीं. ते सहज चकले गेले. आणि मदोन्मत्त व पतनोन्मुख सगळे लोक केव्हां तरी असेच चकणार ! रामदासाच्या गुप्त मठांचें जाळें महाराष्ट्रभर पसरलें. " महंतें महंत करावे । युक्तिबुद्धीनें भरावे । जाणते करून विखरावे । नाना देशीं ॥" असा क्रम झपाट्यानें सुरू झाला. या महंतांनीं निरनिराळ्या ठिकाणीं आपल्या भोंवतीं मोठेमोठे समुदाय जमा केले. हे सगळे स्वदेशाचे व स्वतंत्रतेचे गुप्त हेर होऊन " कुग्रामें अथवा नगरें । पहावीं घरांचीं घरें । भिक्षामिसें लहान थोरें । परीक्षून सोडावीं ॥ " असा क्रम त्यांनीं चालविला. आणि " कष्टेंविण फळ नाहीं । कष्टेंविण राज्य नाहीं । केल्याविण होत नाहीं । साध्य जनीं ॥ " हें तत्त्व रामदासांनीं सर्वांच्या अंतःकरणांत पेरून ठेवलें असल्यामुळें स्वराज्याच्या प्राप्तीसाठीं कष्ट करण्याला ते लोक तयार झाले. जेसूट लोकांनीं युरोपखंडांत स्वजनांचा बुद्धिभ्रंश करण्याकरितां आपल्या पवित्र पथाचा दुरुपयोग केला; परंतु रामदासांनीं आपल्या भगव्या वस्त्राचा

आणि भिक्षेच्या अन्नाचा पवित्र पंथ काढून त्याच्या द्वारें महाराष्ट्राला स्वतंत्र करून सोडलें. गुप्त मंडळ्यांची कल्पना युरोपियन लोकांना सुचण्याचे आधींच रामदासांनीं ती महाराष्ट्रांत मठांच्या रूपानें प्रत्यक्ष घडवून आणिली. आणि श्रीकृष्ण परमात्म्याप्रमाणें रामदासांनीं फिरून एकदां या भरतखंडाच्या गादीवर धर्माची संस्थापना केली. अशा त्या रामदास महाराजांचा हिंदुस्थानांत सदोदित जयजयकार असो !

---

## काउंट टॉलस्टॉय यांचीं दोन विलक्षण मतें १६

काळ : पत्रकर्त्यांचे स्फुट विचार १ व ४ : ता. २-२-१९०६

● मराठी वाङ्मयांत टॉलस्टॉयच्या मतप्रणालीची चर्चा प्रथम काळानेंच केलेली दिसते. रशियन राज्यक्रान्ति व तिचे प्रणेते या विषयाकडे त्या वेळीं इतरांपेक्षां काळकर्त्यांचेंच विशेष लक्ष होतें.

' यावद्भ्रियेत जठरं तावत्स्वत्वं हि देहिनाम् । अधिकं योऽभिमन्येत स स्तेनो दंडमर्हति ॥ ' या आपल्याकडील श्लोकामध्यें जें तत्त्व आहे त्या तत्त्वाचा फैलाव पाश्चिमात्य देशांतून अलिकडे अतिशय होऊं लागला आहे. Property is theft हें कित्येक अर्वाचीन पाश्चिमात्य पंडितांचें मत होऊन गेलेलें आहे. परंतु या मताची मजल येथेंच न थांबतां ती उत्तरोत्तर झपाट्यानें पुढें जात आहे. मोठाले द्रव्यसंचय म्हणजे फक्त चोरीच नसून ते खूनहि आहेत असें काउंट टॉलस्टॉय हे रशियांतील लोकांपुढें हल्लीं प्रतिपादन करीत आहेत. Property is murder हें जें काउंट टॉलस्टॉय

यांचें मत; त्याच्या समर्थनार्थ ते पुढें लिहिलेल्या प्रकारच्या विचारसरणीचा उपयोग करितात. एका संभाषणामध्यें काऊंट टॉल्स्टॉय यांनीं ते ज्या घरांत होते त्या घराचा इतिहास सांगतांना असें सांगितलें कीं, हें माझें घर ही एक प्रकारची मिळकत आहे, आणि हीसुद्धां मला खुनापासूनच मिळालेली आहे. माझा पणजा खून करण्याच्या कामांत मोठा वस्ताद होता. त्यानें पुष्कळ लोकांचे रक्तपात केले, म्हणून त्याच्या बहाद्दरीबद्दल त्याला पूर्वीच्या राजांनीं ही मिळकत बक्षीस दिली आहे. या जागेंत पूर्वीं गरीब शेतकरी राहात होते. परंतु माझ्या पणज्योंन लढाईमध्यें पुष्कळ लोकाचे खून केल्यामुळें येथील गरीब लोकांना हांकलून देऊन ही जागा माझ्या पणजाला खुनांच्या बाक्षिसा-बद्दल देण्यांत आली. पण काऊंट टॉल्स्टॉय असें म्हणतात कीं, फक्त लढाईतील योद्धेच खुनावर आपली उपजीविका करितात असें नसून डॉक्टर, वकील वगैरे लोकसुद्धां खुनावरच श्रीमंत झालेले असतात. या गोष्टीच्या प्रतिपादनासाठीं त्यांनीं आपल्या स्वतःचेंच उदाहरण घेऊन असें सांगितलें आहे कीं, मी सुद्धां खुनावरच चरितार्थ चालविणारा आहें. मी नेहमीं कादं-बऱ्या लिहून पैसे मिळवितों. पण या कादंबऱ्यांबद्दल पैसे कोण देतात? श्रीमंत लोक. पण त्यांच्यापाशीं हे पैसे आले कसे? त्यांनीं गरीब लोकांवर बळजबरी करून आणि अनाथ लोकांचे खून करूनच हे पैसे मिळविलेले असतात, आणि तेच पैसे परंपरेनें माझ्याकडे येतात. लबाडीशिवाय, जुलुमाशिवाय, बळजबरीशिवाय आणि खुनाशिवाय कोणीहि मनुष्य नाहीं. He who labours honestly can never build a fine house, अशी एक म्हण आहे. आणि त्या म्हणीमध्यें सुद्धां हेंच तत्त्व आहे, निव्वळ प्रामाणिकपणानें मिळवावयाचें असें म्हटल्यास प्रत्येक मनुष्याला फक्त जेवढें जरूर तेवढेंच मिळवितां येणें शक्य आहे, आणि असें जर आहे तर आवश्यकतेपेक्षां जास्त ज्याच्यापाशीं असेल, त्यानें तें चोरूनच मिळविलें असलें पाहिजे असें सिद्ध होतें.

* * *

आपण स्वस्थ बसलों तर जगाचें कसें होईल, लोकांना कोण लुटील आणि लुबाडील, त्यांना कोण जिंकील आणि गुलाम करील, त्यांचे रक्तपात आणि खून आपल्यावांचून दुसरा कोण समर्थ घडवून आणील, अशी

ख्रिस्ती लोकांना काळजी पडते ! व लोकांचें हें संकट दूर करण्याकरितां आणि त्यांच्यावर हे परोपकारांचे डोंगर रचून ठेवण्याकरितां अनेक दयार्द्र ख्रिस्ती लोक एकत्र जमतात आणि परोपकाराच्या कंपन्या काढतात. सरकार सरकार म्हणून म्हणतात तीसुद्धां अशा कंपन्यांपैकींच एक कंपनी होय. या संस्थेबद्दलहि काउंट टॉलस्टॉय यांचें फारसें अनुकूल मत नाहीं. या संस्थे-संबंधानें त्यांनीं पुढीलप्रमाणें उद्गार काढले आहेत. ते म्हणतात कीं :—

There is no such thing as a state, as a government. It is a humbug, this state. What you call a government is mere phantasmagoria. What is a state ? Men, I know; peasants and villagers these I see. But governments, nations, states, what are these but fine names invented to conceal the plundering of honest men by dishonest officials and the murdering of peaceful men under the phrases of mobilization and war ? If men would not be so silly as to bow down and worship this false idol, government, how simple all things would become ! All our difficulties come from that. We obey not Christ, but the government. Every thing wrong comes from that.

या इंग्रजी वाक्यांच्या द्वारें टॉलस्टॉय यांनीं असें प्रतिपादन केलें आहे कीं, सरकार वगैरे ज्या संस्था आहेत त्या सब् झूट आहेत. ज्याला सरकार सरकार म्हणून म्हणतात, तो एक निवळ बागुलबोवा आहे. माणसें अस्तित्वांत आहेत; शेतकरी आणि त्यांचीं खेडीं हीं दिसूं शकतात. पण सरकार म्हणजे काय आहे ! लबाड अधिकाऱ्यांनीं प्रामाणिक लोकांना लुटावें, आणि सैन्याच्या हालचाली व लढाया यांच्या नांवांखालीं गरीब लोकांचे खून करतां यावे, यासाठीं सरकार, संस्थान, राज्य वगैरे मोहक नांवें शोधून काढण्यांत आलेलीं आहेत. याच्यापेक्षां दुसरें कांहीं नाहीं. या खोट्या नांवांपुढें लोक मूर्खपणानें आपल्या माना वांकाविण्याला आणि त्यांना मान देण्याला तयार झाले नसते, तर जगाचा व्यवहार किती तरी साध्या आणि

सरळ रीतीनें चालला असता! लोक देवाची आज्ञा न पाळतां सरकारची आज्ञा पाळूं लागले आहेत. आणि त्यामुळें त्यांजवर हे सर्व अनर्थ कोसळत आहेत. काउंट टॉलस्टॉय असें समजतात कीं, लोकांना सरकारशीं कांहीं करावयाचें नसतें; व सरकार नसलें तरी लोकांचें ठीक चालण्यास कांहीं हरकत पडणार नाहीं. सेंट पीटर्सबर्ग आणि मॉस्को येथील सरकारें एखादे दिवशीं धरणीकंपाच्या धक्क्यानें पृथ्वीच्या पोटांत गडप झालीं म्हणून शेतकरी वगैरे लोकांचें काय अडावयाचें आहे! उलट त्यांचा जुलुमाचा त्रास चुकून करांच्या पैशांचा फायदाच होईल. सरकारचा वास्तविक लोकांना कांहीं एक उपयोग नसतो. परंतु आपलें अस्तित्व आवश्यक आहे असें भासविण्याकरितां सरकार लोकांच्या कामांत उगीच कांहीं तरी लुडबूड करीत असतें. जी गोष्ट लोकांना निरुपयोगी असते किंवा उपयोगी असल्यास जी लोकांनींहि सहज केली असती, अशी गोष्ट करून सरकार लोकांना म्हणतें कीं, पाहा आम्ही होतों, म्हणून आम्हीं ही गोष्ट केली; आम्ही नसतों तर तुम्हाला ही गोष्ट कोणीं करून दिली असती? यासाठीं आम्ही तुम्हांला पाहिजे बरें! पण हा युक्तिवाद अगदीं खोटा आहे. काउंट टॉलस्टॉय यांचीं हीं मतें म्हणजे एक प्रकारचे सामान्य सिद्धांत आहेत. आणि ते कित्येक देशांत कदाचित् खरेहि असतील. खुद्द काउंट टॉलस्टॉय यांच्या रशिया देशांत हे सिद्धांत अक्षरशः लागू पडत असतील व जेथें जेथें लोक सज्ञान झाले असून सरकार आपला जुलुमी अंमल चालवीत असेल, तेथें तर हे सिद्धांत अत्यंत आवश्यकतेचे आहेत. परंतु तेथें हे सिद्धांत खरे ठरले म्हणून ते प्रत्येक ठिकाणींच खरे होतील असें नाहीं. हिंदुस्थानासारख्या देशांत, उदाहरणार्थ सरकार निरुपयोगी आहे, असें कोणालाहि म्हणतां यावयाचें नाहीं.

---

